ई - पुस्तक : कृष्ण सखा माझा

लेखन : श्रीपरमानंदस्वामी (श्री. अविनाश मोरेश्वर लिमये)

संपर्क : ०२२-२४३६ १५१४ । ९९६९८ ७६८५०.

संपादन : सचिन काकडे, मुंबई.

ई - प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

हक्क : सौ. अनुपमा अविनाश लिमये
१३, नवलकर बिल्डिंग, न.चि. केळकर रोड,
दादर, मुंबई ४०० ०२८.

www.esahity.com
esahity@gmail.com
eleventh floor, eternity
eastern express highway
thane, 400604.

# समर्पण

सगुण प्रेमभक्तिचा आनंददायी मार्ग दाखविणाऱ्या
सद्गुरुनाथ श्रीअवधूतस्वामी यांच्या पवित्र चरणी
त्यांच्याच कृपेने लाभलेले हे भक्तिभावाचे सुमधूर फळ,
सप्रेम समर्पण.

\- श्रीपरमानंदस्वामी



# पुस्तक परिचय

नारदऋषी आणि लक्ष्मी यांच्या संवादातून उलगडत जाणारे हे कृष्णचरित्र (कृष्ण सखा माझा - भाग एक) अतिशय बोधप्रद आहे. कृष्णचरित्र हे अनेक चमत्कारांनी भरलेले आहे, असेच नेहमी वर्णन केले जाते. परंतु, श्रीपरमानंदस्वामी यांनी लिहिलेले हे कृष्णचरित्र वाचताना, त्या प्रसंगांमधील तर्कसंगतता वाचकांना विचार करायला लावणारी आहे. ते वाचताना हे प्रसंग असेच घडले असणार असेच वाटते. उदाहरणार्थ, कृष्णाची बंदीशाळेतून मुक्तता, यमुनेला आलेला पूर, नंदराजाच्या कन्येला घेऊन वसुदेवाचे मथुरेला येणे इत्यादीमधील चमत्कारांपेक्षा त्यामधील तर्कसंगत विचार मनाला भावतात आणि बुद्धीलाही पटतात. तसेच 'चमत्कार' या विषयाबद्दल नारद व लक्ष्मी यांचा संवादही लोकांना विचार करायला लावणारा आहे.

आगामी कृष्ण सखा माझा - भाग दोन मध्ये ....... नामकरण संस्कार, कृष्णाच्या बाललीला, कृष्णाचा परमसखा पेंद्या, गोपिकांचे लज्जारक्षण, इत्यादी.....

सौ.प्रतिमा प्रविण आठवले

# भाग-१

## अनुक्रमणिका -


१. गाऊया कृष्ण गुण कथा

२. नारायण-नारद भेट

३. कृष्ण चरित्राचे रहस्य

४. कृष्णजन्म

५. कृष्णाची बंदीशाळेतून मुक्तता

६. नंद-वसुदेव भेट

७. कंसाचे क्रौर्य

८. कृष्णजन्माचा आनंदोत्सव




# गाऊ या कृष्णगुण कथा

भगवान नारायणाने स्वतःच निर्मिलेल्या या सृष्टीमध्ये विशिष्ट कारणासाठी व कार्यासाठी अनेक अवतार घेतले. त्यामध्ये त्रेतायुगातील 'रामावतार' व द्वापारयुगातील 'कृष्णावतार' हे विशेषत्वाने प्रगट झाले. सकृत्‌दर्शनी रामचरित्र व कृष्णचरित्र ही दोन चरित्रे बाह्यांगानी अत्यंत वेगळी दिसली तरी ती अवतारचरित्रे ही एकाच नारायणाची होती. त्यामुळे त्या अवतारांत घडलेले कार्य जरी भिन्न होते, तरी त्यामागील कार्यशक्ती ही एकच होती. एवढेच नव्हे, तर त्या कार्याचा मूळ हेतू सुद्धा एकच होता. त्या त्या वेळच्या काळानुसार आवश्यक असलेले कार्य घडण्यासाठी तसे तसे अवतारचरित्र प्रगट झाले. परंतु सामान्य जीवांचा उद्धार करून त्यांना आत्मकल्याणाचा मार्ग दाखवावा, हा त्यामागील हेतू एकीएकच होता.

त्रेतायुगामध्ये सद्‌गुरुशिष्य परंपरा खंडीत होऊ लागल्यामुळे, आत्मप्राप्तीचे ज्ञान व त्याचा मार्ग या दोन्हीचा लोप होण्याची वेळ आली. त्या वेळेसच रामावतार झाला आणि स्वतः सद्‌गुरुंना शरण जाऊन आत्मज्ञान प्राप्त करून घेऊन, तसा आत्मानुभव घेतलेल्या प्रभूरामाचे दिव्य चरित्र प्रगट झाले. आत्म्याच्या अधिष्ठानावरील आत्मधर्माला प्रमाण मानून आपले जीवन जगणाऱ्या प्रभू रामाच्या अंतःकरणाची अवस्था मात्र अप्रगटच राहिली. सद्‌गुरुकृपेने आलेल्या अनुभवातून आत्मचिंतन घडता घडता, रामाच्या अंतःकरणाच्या अवस्थेला प्रगट करणारा ''हा राम माझा'' हा ग्रंथ लिहिला गेला आणि २००० साली श्रीदत्तजयंतीच्या शुभदिनी तो प्रकाशितही झाला. रामावताराचे रहस्य अनुभवाने जाणून घेतल्यावर कृष्णावताराचे रहस्यही जाणून घेणे आवश्यकच ठरले आणि केवळ सद्‌गुरुकृपेनेच ते शक्यही होऊ शकले.

रामावतारामध्ये गंभीर व धीरोदात्त चरित्रामुळे रामाच्या अंतःकरणातील प्रेमस्वरूप अवस्था अप्रगटच राहिली. रामाचे माहात्म्य जाणून घडलेल्या भक्तिने त्याच्या अंतःकरणापर्यंत पोहोचल्यावरतीच त्याची प्रेमस्वरूप अवस्था लक्षात येत असे आणि रामाच्या प्रेमाचा अनुभव घेणे शक्य होत असे. कृष्णावतारात मात्र, आधी कृष्णाचे सर्वांवरील असलेले प्रेम व आपलेपणा सहजतेने प्रगट होत राहिले. परंतु, त्याच्या अंतःकरणातील त्याचे माहात्म्य मात्र अप्रगटच राहिले. कृष्णाचे प्रेम अनुभवून, त्याच्या भक्तिनेच त्याच्या अंतःकरणापर्यंत पोहोचल्यावरतीच, त्याचे माहात्म्य जाणणे शक्य होत असे. राम व कृष्ण या दोन

अवतारचरित्रांतील हा मुलभूत फरक लक्षात घेतल्यावरतीच, त्या चरित्रांकडे पहाण्याची योग्य दृष्टी प्राप्त होते आणि बाह्यांगाने अत्यंत वेगळ्या वाटणाऱ्या त्या चरित्रांचा एकच आनंद अनुभवावयास मिळतो.

कृष्णचरित्र एवढे व्यापक आहे, की त्याचा अभ्यास करून ते जाणून घेण्याचा प्रयत्न करणे, म्हणजे एका छोट्या घोटात सागराचे सर्व जल प्राशन करण्याचा प्रयत्न करण्यासारखेच आहे. परंतु त्या सर्व चरित्रातील कृष्णाच्या अंतःकरणाची अवस्था जी एकीएकच होती, ते त्याचे स्वरूप जाणून घेणे मात्र शक्य आहे आणि तेच खरे आवश्यक व आनंदाचे आहे. कृष्णाचा अवतार हा द्वापार युगाच्या शेवटी शेवटी झाला. त्यावेळी अधर्म पराकोटीचा माजला होता आणि आत्मधर्माला ग्लानी येऊन स्वधर्माचरणाचाही ऱ्हास झालेला होता. मनामधील विषयवासनेचे मूळ अत्यंत खोलवर गेलेले होते आणि शब्दज्ञानाचा सुकाळ झालेला होता. एकीकडे दुष्प्रवृत्तीचे लोक सत्तांध व मदोन्मत्त झालेले होते, तर दुसरीकडे सत्प्रवृत्तीचे लोक मनाने दुर्बल होऊन, त्यांचे स्वत्व हरवून बसलेले होते. अशावेळी सज्जनांचे रक्षण करून दुर्जनांचे निर्मूलन करण्यासाठीच कृष्णाचा अवतार झाला होता.

कृष्णचरित्राची सुरुवात गोकुळापासून झाल्यामुळे 'कृष्णचरित्र म्हणजे गोकुळ' असेच जणू समीकरण होऊन राहिले. परंतु त्यातही कृष्णाच्या गोकुळातील बाललीला, त्याच्याकडून घडलेले अनेक चमत्कार आणि त्याच्याकडून प्रगटलेले अचंबित करणारे व काही वेळा अविश्वसनीयही असे वाटणारे पराक्रम, एवढेच कृष्णचरित्र लोकांना माहीत आहे आणि तेवढेच कृष्णचरित्र लोकांच्या मनाला भावते. कृष्णाकडून घडलेल्या अनेक खोड्या व थट्टामस्करी हा मात्र काहीजणांच्या दृष्टीने कौतुकाचा, तर काहीजणांसाठी टीकेचा विषय झाला. परंतु कृष्णचरित्राकडे भक्तिमार्गाच्या दृष्टीनेच पहाणे अत्यंत योग्य आहे आणि असे पहाणे हेच खरे कृष्णाचे अंतःकरण जाणण्यासाठी अत्यंत आवश्यक आहे. कृष्णाचे अंतःकरण जाणून घेतले असताच, कृष्णचरित्राच्या रहस्याचे यथार्थ आकलन होईल आणि कृष्णचरित्राचा खरा आनंद अनुभवता येईल.

अवतारचरित्रांकडे पहाण्याची अशी शुद्ध, निर्मळ व प्रेमळ दृष्टी ही केवळ सद्गुरुकृपेनेच प्राप्त होऊ शकते आणि अशी कृपा सद्गुरुभक्तिनेच फळाला येते. सद्गुरुकृपेचा असा प्रसाद लाभण्याचे परमभाग्य मला माझे परमपूज्य पिता व सद्गुरुनाथ श्रीअवधूतस्वामी यांच्या सहवासात, त्यांच्याच कृपेने लाभले. गुरुशिष्य नात्यामध्ये त्यांनी व्यापक परमेश्वराचे आत्मज्ञान प्रगट करून, मला माझ्या ईश्वरस्वरूप आत्म्याची ओळख करून दिली. श्रीअवधूतस्वामींच्या जीवन चरित्राकडे पहाता पहाता आणि त्यामध्ये प्रत्यक्ष सहभागी होता

होता, त्यांच्या परमेश्वरी अनुभवाच्या सत्यतेची निःसंशय खात्री पटली. परंतु मला झालेल्या आत्मज्ञानाचे रूपांतर प्रत्यक्ष माझ्या अनुभवात होण्यासाठी मात्र, सद्गुरुनाथांनी सगुण प्रेमभक्तिचा नवविधा मार्ग प्रगट करून, तोच मला दाखवला. या त्यांच्या माझ्यावरील कृपेला मात्र कुठलाही अंत वा पारावार नाही आणि कुठलीही तुलना नाही. 'सद्गुरुनाथांचे परमेश्वरी माहात्म्य जाणून, त्यांच्यावरील व्यक्तिगत प्रेमाने घडलेली त्यांचीच भक्ति' हेच या प्रेमभक्तिमार्गाचे मूळ आहे. त्याची सुरुवातही सद्गुरुनाथांच्या माझ्यावरील व्यक्तिगत प्रेमाने आणि त्यांनीच दिलेल्या सख्यत्वाच्या आत्यंतिक जवळीकतेतूनच आहे. त्यामुळेच श्रीवधूतस्वामींचे व माझे फक्त गुरुशिष्याचेच नाते राहिले नाही, तर त्याच्याही परते असलेले 'देव व भक्त' असे आत्यंतिक प्रेमाचे व जवळीकतेचे संबंध निर्माण झाले.

श्रीवअधूतस्वामींनी निर्याण अंगीकारण्याच्या काही काळच आधी राधा व कृष्ण यांच्या प्रेमभक्ति संबंधाचे रहस्य प्रगट करणारे संगीत 'राधाकृष्ण' हे नाटक लिहिले होते. त्या नाटकाचे श्रीअवधूतस्वामींच्या सहवासात घडलेले वाचन, संवाद व मनन आणि त्यांच्या निर्याणानंतर त्या नाटकाचे रंगमंचावर प्रत्यक्ष झालेले अनेक प्रयोग पाहून, कृष्णाच्या गोकुळातीलच नव्हे, तर सर्वच चरित्राकडे पहाण्याची सम्यक व सखोल दृष्टी प्राप्त झाली. कृष्णाच्या चरित्रातील एक मुलभूत व मुख्य सूत्र जाणवले आणि ते म्हणजे कृष्णाने अगदी लहानपणापासून सर्वांशी साधलेली प्रेमाची जवळीकता व सर्वांना दिलेले सख्यत्व. श्रीअवधूतस्वामींच्या सहवासात हाच अनुभव मी घेतला आणि त्यांच्या निर्याणानंतरही त्यांच्याच कृपेने घडणाऱ्या परंपरेच्या कार्यामध्येही हाच अनुभव घेत राहिलो. हा अत्यंत आनंददायी अनुभव घेत असतानाच घडलेल्या आत्मचिंतनातूनच, कृष्णाचे सगुण चरित्र अंतःचक्षूंसमोर साकार होऊ लागले. अंतःकरणामध्ये या स्वानंदाची एवढी दाटी होऊ लागली, की त्या अनुभवाला शब्दरूप घेणे भागच पडले. त्यामुळेच माझ्या अंतरातील तो 'कृष्ण सखा' बाह्यांगानेही मनोहारी व चित्ताकर्षक रूपाने प्रगट होऊ लागला.

कृष्णाचे चरित्र व लीला यांच्याकडे केवळ भाबड्या भाविकतेने किंवा केवळ चिकित्सक बुद्धीने न पहाता, स्वानुभवाच्या शोधक, पण रसिक दृष्टीने पहाणे घडू लागले आणि कृष्णचरित्रातील कृष्णाचे भावपूर्ण अंतःकरण, त्याच्या रहस्यासहित सुस्पष्टपणे दिसू लागले. कृष्णाच्या त्या अंतःकरणाचे वर्णन कृष्णप्रेमाने घडता घडता, कृष्णाच्या अंतःकरणातील प्रेमभाव अनेक अंगाने व विविध रंगाने सहजपणे साकार होऊ लागले. कृष्णचरित्रातील अनेक दैवी पराक्रमांचे व चमत्कारांचे प्रसंग कथनीय नसून, कृष्णचरित्रातील अनेक

भावपूर्ण प्रेमाचे प्रसंग हेच वर्णनीय आहेत, असे जाणवू लागले आणि तीच कृष्णचरित्रातील मुख्य स्थाने झाली. एवढेच नव्हे, तर डोळस दृष्टीने पहाता पहाता, अनेक चमत्कारसदृश्य प्रसंगांतील वस्तुस्थिती लक्षात येऊ लागली आणि ती तशीच प्रगटही होऊ लागली. प्रसंगाच्या अशा वस्तुनिष्ठ वर्णनामुळेच, कृष्णचरित्रावर असलेल्या श्रद्धेतील निव्वळ भाविकतेमुळे आलेले अंधत्व दूर होते आणि त्या चरित्रावरील श्रद्धा अधिक दृढ होते. त्याचबरोबर कृष्णचरित्रावरील प्रेम अधिकाधिक वाढू लागते आणि कृष्णाचे माहात्म्यही अधिकाधिक जाणवू लागते.

ईश्वरप्राप्तीचे जे अनेक मार्ग आहेत, त्यांपैकी विशेषत्वाने असलेला आणि काळानुसारही केवळ तोच शक्य असलेला, असा सगुण प्रेमभक्तिमार्ग प्रगट करण्यासाठीच कृष्णाचा अवतार झालेला होता. कृष्णाच्या या कार्याची सुरुवात गोकुळापासूनच झाली. सगुणभक्तिच्या नवविधा मार्गामध्ये खरे तर, सख्यभक्ती ही आठव्या पायरीवर आहे. परंतु कृष्णाने आधीच सर्वांना सख्यत्व देऊन, कृष्णाचे ईश्वरी प्रेम अनुभवण्याची संधी सर्वांना उपलब्ध करून दिली. त्यातून ज्यांच्या ठिकाणी कृष्णाविषयी व्यक्तिगत प्रेम निर्माण झाले आणि ज्यांनी कृष्णाचे माहात्म्यही जाणले, त्यांच्यासाठी कृष्णरूपानेच सगुण भक्तिचा मार्ग मोकळा झाला. अशा सगुणप्रेमाने व भक्तिने कृष्णाशीच कायमची ऐक्य पावून राहिलेली राधा, ही सगुणभक्तिमार्गाच्या यशस्वितेचे कायमचे प्रतीक व रूपकही होऊन राहिली. गोकुळातील कृष्णचरित्रामध्ये राधा व कृष्ण यांचे प्रेमभक्तिचे संबंध हेच मुख्य सूत्र ठरले.

‘एक सामान्य जीव, त्यातूनही स्त्री आणि तीही विवाहित स्त्री, म्हणून राधेला कृष्णाची भक्ति करताना अनेक मानसिक, कौटुंबिक व सामाजिकही संघर्षाला तोंड द्यावे लागले. अनेकांच्या टीकेला व निंदेलाही राधेला सामोरे जावे लागले. तरीही राधेचे कृष्णावरील प्रेम व श्रद्धा जराही विचलित न होता, ती कायमपणे वाढतच राहिली आणि राधा शेवटी कृष्णाशीच भक्तिभावाने ऐक्य पावली’ हा राधेचा जीवन इतिहास सगुण प्रेमभक्तिमार्गामध्ये येणाऱ्या अनेक अडचणींचा निर्देश करणारा आहे. त्याचप्रमाणे सर्व संकटांत जराही न डगमगता, सर्व अडचणींतून मार्ग काढीत काढीत पुढे जाता जाता देवाशी कसे ऐक्य पावता येते, याचे मार्गदर्शन करून भक्तांच्या ठिकाणचा आत्मविश्वास वाढवणारा असाही हा इतिहास आहे. म्हणूनच पुढेही अनेक संतमहात्म्यांनी सगुण प्रेमभक्तिमार्गाने जाताना याच ‘राधाकृष्ण’ प्रेमाचा आधार घेतला. त्यांच्या

रूपकानेच आपले सगुण प्रेम, भक्तिभाव व आनंदाचा अनुभवही प्रगट केला आणि सगुण प्रेमभक्तिचे माहात्म्य गर्जवून दुमदुमत ठेवले.

कृष्णाने त्याचे सख्यत्व खरे तर, त्याच्या गोकुळानंतरच्या चरित्रामध्येही सर्वांना दिले. अर्थात गोकुळामध्ये ही संधी विशेषत्वाने व जास्त प्रमाणात उपलब्ध झाली हे खरे आहे. तेव्हा या 'कृष्ण सख्याचे' सर्व चरित्रच या सख्यत्वाच्या सूत्रातून पहाणे अत्यावश्यक आहे. कारण तेव्हाच कृष्णाच्या संपूर्ण चरित्राचा उलगडा होऊन, त्याचा योग्य अन्वयार्थ लागू शकेल आणि तेव्हाच कृष्णचरित्राचा खरा व पूर्ण आनंद अनुभवता येईल. या दृष्टीने लिखाण घडता घडता एकीकडे पृष्ठांची संख्याही वाढतच राहिली आणि दुसरीकडे नित्याच्या सहवासातील अनेक प्रेमी व भक्तजनांच्या ठिकाणी या 'कृष्ण सख्या'शी भेट घेण्याची आतुरताही वाढतच राहिली. त्यांना कृष्णाच्या सख्यत्वापासून जास्त काळ दूर ठेवणेही अशक्य होऊ लागले आणि अयोग्यही वाटू लागले.

'शरयू प्रकाशन' संस्थेचे डॉ.चंद्रशेखर आष्टीकर यांनी यावरती एक चांगला उपाय शोधून काढला. 'कृष्णाच्या गोकुळापर्यंतच्या जीवनचरित्राच्या ठिकाणी थोडावेळ थांबण्याचे करावे आणि तेवढा भागच प्रथम प्रकाशित करावा' अशी त्यांची प्रेमाची सूचना सर्वच दृष्टींनी सुयोग्य वाटली आणि त्याप्रमाणे कृष्णचरित्राच्या वर्णनाच्या वाटचालीत एक 'थांबा' घेण्याचे ठरवले. अर्थात पुढील कृष्णचरित्राचे लिखाण हे त्याचा कळस गाठेपर्यंत घडतच रहाणार आणि तसे घडतही आहे. अंतःकरणाच्या स्वानुभवाच्या अवस्थेतून उत्स्फूर्तपणे घडणाऱ्या कृष्णचरित्राच्या गायनाला व लिखाणाला थांबवता येणे मलाही शक्यच नाही. ते माझ्याही हातात नाही. कारण ते हृदयात सतत स्फुरतच रहाते आणि ते तसेच रहाणारही.

एकदा निर्णय झाल्यानंतर डॉ.चंद्रशेखर आष्टीकर व सौ.शरयू आष्टीकर या उभयता पतीपत्नींनी तसा ध्यासच धरला. म्हणूनच हा ग्रंथ अत्यंत सुंदर, सुरेख व आकर्षक अशा, ग्रंथाच्या विषयाला साजेशा रूपात प्रकाशित होत आहे. त्यांना सर्वांगाने, सर्वभावाने प्रत्यक्ष साथ देणारे श्री.किशोर तथा भाऊ ठाकरे हेही खरोखरच अभिनंदनास पात्र आहेत. या सर्वांना प्रेमपूर्वक शुभाशीर्वाद तर आहेतच. ईश्वराच्या भक्तिचे आनंददायी फळ प्राप्त करून घेऊन, मिळालेले आशीर्वाद ते सार्थ ठरवतील याची पूर्ण खात्री आहे.

आणखीन एका विशेष गोष्टीचा आवर्जून उल्लेख करायचा म्हणजे, श्री.प्रसाद आठवले यांनी अत्यंत प्रेमभावाने व सेवाभावाने केलेले या ग्रंथाचे अक्षरसंयोजन! व्यक्तिगत प्रेमाने व श्रद्धेने केलेले हे त्यांचे योगदान अत्यंत कौतुकास्पद व स्पृहणीय आहे. त्यांना या योगदानात आपलेपणाने हातभार लावलेल्या त्यांच्या पत्नी सौ.स्नेहल आठवले याही कौतुकास पात्र आहेत. त्यांचा स्नेहही असाच वाढत राहो हीच सदिच्छा. विशेष प्रेमाचे असलेले श्री.प्रविण आठवले व सौ.प्रतिमा आठवले यांनीही विशेषत्वाने सहाय्यभूत होऊन अर्पण केलेला त्यांचा प्रेमभाव अतिशय आनंदीत करणारा असाच आहे. 'परमानंद परिवारा'तील या 'आठवले परिवारा'ला अत्यंत प्रेमपूर्वक शुभाशीर्वाद. त्यांचे असलेले प्रेमभक्तिभावाचे संबंध असेच अधिकाधिक वृद्धिंगत व दृढ होत राहोत.

श्री.प्रकाश तारी यांनी अत्यंत प्रेमाने व सेवाभावाने काढलेले व रंगवलेले अत्यंत सुंदर मुखपृष्ठ हे या ग्रंथाचे एक आकर्षण व वैशिष्ट्य ठरलेले आहे. श्री.प्रकाश तारी व त्यांना प्रेमाने सहाय्यभूत झालेल्या त्यांच्या पत्नी सौ.मंगल तारी या उभयतांना प्रेमाशिर्वाद आणि त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन.

असा हा 'कृष्णसखा' सर्वांचा सखा होऊन रहावा. त्याचे प्रेम व सख्यत्व सर्वांनाच मिळावे आणि त्यांना ते लाभावेही. त्याच्याविषयी सर्वांच्याच ठिकाणी भक्तिभाव निर्माण व्हावा आणि त्या भक्तिचा आनंद सर्वांनाच नित्य अनुभवता यावा एवढीच ईश्वरचरणी प्रेमाची प्रार्थना! आता एकच सांगणे,

''अवधूतनाथा, महिमा हा तुझा
तूची राम माझा, तूची कृष्ण माझा''

श्री परमानंद स्वामी

*****

# नारायण-नारद भेट

नारायणाचा अत्यंत प्रिय भक्त नारद हा नारायणाच्या प्रेरणेनुसार भूतलावर मुक्तपणे विहार करीत होता. नारायणाच्या संकल्पाने निर्माण झालेल्या सृष्टीतील सर्व घडामोडी अवलोकन करून त्याचा अभ्यास करणे व त्याचा साद्यंत समाचार नारायणाला जाऊन कळवणे हे तर नारदाकडून सहजपणे घडत होतेच, पण तरीही जेव्हा जेव्हा व जशी जशी संधी मिळेल तेव्हा तेव्हा किंवा वेळप्रसंगी तशी संधी मुद्दाम निर्माण करूनही, नारायणाच्या थोरवीचे गायन करणे व त्याच्या भक्तिचे माहात्म्य प्रगट करणे, हा त्याचा केवळ छंद नव्हे, तर स्वभावच होऊन राहिला होता. नारदाच्या अंतःकरणात नारायणाची प्रेमळ व आनंददायी मूर्ती स्थिर होती. त्या मूर्तीच्या अस्तित्वाच्या जाणिवेनेच आनंदाचा अनुभव सहजपणे नारदाच्या हृदयात स्फुरत होता आणि त्यातून निर्माण होणाऱ्या प्रेमाच्या आनंदलहरी नारदाच्या मनालाही पूर्णपणे व्यापून रहात होत्या. हृदय आनंदानुभवाच्या परिपूर्ण अवस्थेत, तर मन नारायणाच्या प्रेमभावाने संपूर्ण भरून वाहण्याच्या अवस्थेत! असे हे नारदाच्या अंतःकरणात निर्माण झालेले द्वैतच नारदाला उत्कट भक्तिभावाने सदैव युक्त करून ठेवीत होते.

हृदयात नारायणाशी पूर्णपणे ऐक्याचा आनंदानुभव आहे आणि तरीही मनाच्याठायी त्या नारायणाविषयीचे आत्यंतिक प्रेम पुन्हा वेगळेपणाने रहात होतेच. ते वेगळेपण मनाला सहन होत नसल्यामुळे त्या प्रेमयुक्त मनाची ओढ हृदयातील नारायणाकडेच होती. ऐक्य पावण्यासाठी वेगाने व आवेगाने धावणारे भक्तिभावपूर्ण झालेले मन, हृदयस्थ नारायणाशी ऐक्य पावून सर्व विभक्तपण लयाला नेत होते आणि तेथेच विलीन होत होते. त्या ऐक्याच्या संयोगातूनच वेगळेपणाने प्रेम अनुभवण्याची उत्कट उर्मी पुन्हा निर्माण होत होती व मन प्रेमयुक्त अवस्थेत कायम राहूनही पुन्हा वेगळे होत होते, ते पुन्हा ऐक्याचा आनंददायी अनुभव घेण्यासाठीच!

ज्याप्रमाणे सागराच्या जलाठायी त्या जलाच्याच लहरी निर्माण होतात, त्या लहरी एखादेवेळेस प्रचंड लाटांचे रूपही धारण करतात. परंतु जेवढ्या सहजतेने या लहरी निर्माण होतात, तेवढ्याच सहजतेने पुन्हा त्या सागराच्याठायीच विलीन पावतात. पुन्हा निर्माण होतात, काही काळ सागराठायीच वेगळेपणाने खेळतात व पुन्हा सागरातच विलीन होतात. किंबहुना अशा असंख्य व अनंत लहरी मिळूनच सागराचे रूप आहे. लहरी

विरहीत सागर असूच शकणार नाही. अतिशय सूक्ष्म का होईना, पण सागराच्याठायी लहरी या असणारच. त्या लहरी या सागराच्या ठायीच्या चैतन्यशक्तीच्या द्योतकच आहेत. अगदी तसेच नारायणाचे सगुण प्रेम व त्याच्या सगुण भक्तिचा आनंदानुभव यांचे हे द्वैत आहे.

आनंदाचा अनुभव ऐक्यभावातून आहे, तर प्रेमाचा अनुभव द्वैतभावातून आहे आणि या आनंदाच्या ऐक्यभावाला व प्रेमाच्या द्वैतभावाला नेहमी सलगतेने जोडून ठेवणारा असा भक्तिभाव आहे. हा भक्तिभाव द्वैताच्या उत्कट प्रेमातून निर्माण होतो व ऐक्याच्या आनंदानुभवात विलीन पावतो. म्हणूनच हा भक्तिभाव हे प्रेमभावाच्या जागृतीचे लक्षण आहे, तर आनंदानुभवाच्या निश्चितीचे ते एकमेव कारण आहे.

असे हे ऐक्याचा अनुभव देणारे प्रेमानंदाचे द्वैत नारायणाचा सर्वश्रेष्ठ भक्त असलेल्या नारदाच्या अंतःकरणात सदैव स्फुरत होते. प्रेमातून, प्रेमासाठी व प्रेमाचे निर्माण झालेले हे द्वैत त्याच्या अंतःकरणात प्रेमाने सदैव खेळत असे व खेळता खेळता आनंदाच्या अनुभवात विलीन होत असे. परंतु त्या आनंदाच्या अनुभवावर त्याचे निरतिशय प्रेम जडले असल्यामुळे, तो स्वानंद पुन्हा पुन्हा अनुभवावा असा उत्कट भावही सहजपणे त्याच्या ठिकाणी निर्माण होत होता. त्या उत्कट भावातूनच प्रेमाचे द्वैत त्याच्या ठिकाणी पुन्हा पुन्हा सहजतेने निर्माण होत होते व त्याची परिणती पुन्हा पुन्हा आनंदानुभवात होत होती. या प्रेमानंदाचे मीलन एवढे अखंड होते, की खरे तर तेथे भक्ति म्हणून काही वेगळी आहे अशी दाखवण्यासाठी किंवा पहाण्यासाठी सुद्धा वेगळी उरली नव्हती.

आनंदसागराच्या मध्ये वसलेल्या एखाद्या प्रेमनगरीसारखीच जणू त्याच्या अंतःकरणाची अवस्था झाली होती. त्या नगरीच्या सर्व बाजूंनी एकीएक सागरच पसरलेला आहे. आनंदसागरातून किनाऱ्याकडे यावे तर प्रेमनगरीत येणे घडत आहे आणि प्रेमनगरीपासून दूर व्हावे तर आनंदसागरात बुडणे घडत आहे, अशा अंतःकरणाच्या विलक्षण पण विलोभनीय अवस्थेत असलेली नारदाची मूर्ती विशेषच शोभनीय दिसत होती.

अशा अंतःकरणाच्या आनंदनिर्भर व देहभानविरहित अवस्थेत सहजपणे विहरत असता, नारदाच्या मनाच्या ठिकाणी एकाएकी एका आगळ्या वेगळ्या प्रेमाचीच भावना निर्माण होऊ लागली. त्या प्रेमभावनेचा नाजूक व हळुवार स्पर्शही मनाला एका वेगळ्याच सुखाचा अनुभव आणून देऊ लागला. त्याच्या मनाच्या ठिकाणी एक अनाकलनीय व अनामिक, पण हवीहवीशी वाटणारी अशी हुरहुर निर्माण होऊ लागली आणि

त्याच्या मनाला बेचैन करू लागली. स्वतःच्या अंतःकरणातच द्वैतभाव व ऐक्यभाव यांचा प्रेमानंद अनुभवता अनुभवता, त्याला एकदम बाह्यांगाच्या प्रत्यक्ष द्वैताचीही आवश्यकता वाटू लागली. मन नारायणाच्या प्रेमाने पूर्णपणे युक्त असूनही त्या मनाच्या ठिकाणी काहीतरी अपुरेपणा जाणवू लागला. त्याच्या ठिकाणी निर्माण झालेल्या सगुण प्रेमाच्या भुकेचेच हे सुलक्षण होते हे त्याच्याच लक्षात आले. ही प्रेमाची लागलेली भूक प्रत्यक्ष सगुण प्रेमाच्या अनुभवानेच शमन होणार आहे हे तर तो जाणतच होता, त्यामुळे नारायणाचे स्मरण त्याला तीव्रतेने होऊ लागले. परंतु नारायणाच्या प्रेमाचे कितीही स्मरण असले व त्या प्रेमाचा कितीही उत्कट ध्यास लागलेला असला, तरी नारायणाच्या सगुण प्रेमाच्या प्रत्यक्ष अनुभवाला दुसरा कोणताही पर्याय नाही आणि त्यासाठी नारायणाची प्रत्यक्ष प्रेमभेट घेणे हाच एकमेव उपाय आहे, हे नारदाला निश्चितपणे ठाऊक होते. त्यामुळेच नारायणाच्या दर्शनाची व भेटीची ओढ त्याच्या ठिकाणी प्रकर्षाने वाढू लागली.

आपल्या मनाच्या अवस्थेत असा अचानक झालेला बदल कशामुळे झाला असावा, असा विचार करीत नारदाने आपले नेत्र हळूहळू उघडले. एखाद्या सुंदर कमळाच्या कोमल पाकळ्यांप्रमाणे उलगडणाऱ्या त्याच्या नेत्रांतून, तेथे आधीच साठून राहिलेले प्रेमाश्रू अनिर्बंधपणे वाहू लागले आणि त्याच्या अंतःकरणात दाटून राहिलेला नारायणाविषयीचा प्रेमभाव मोकळा होऊ लागला. त्याचे देहभान थोडे थोडे जागृत होऊ लागले व बाह्यसृष्टी हळूहळू त्याच्या दृष्टीस येऊ लागली. आणि एकदम त्याच्या लक्षात आले, तो ''गोकुळ-वृंदावनाच्या'' परिसरात आला होता. सगुण प्रेमभक्तिने भारीत होऊन राहिलेल्या त्या वातावरणाचाच त्याच्या मनावर असा परिणाम होत होता हे त्याने ओळखले. नारायणाच्या सगुण प्रेमाचे व त्यातून घडणाऱ्या त्याच्या प्रत्यक्ष भक्तीचे माहात्म्य, जे नारदाच्या अंतःकरणात पूर्णपणे भरून राहिले होते ते एकदम दाटून आले. अंतःकरणाच्या त्या भावपूर्ण अवस्थेत मनातील प्रेमभावही उत्कट झाला व प्रत्यक्ष नारायणाच्या निकट जाण्यासाठी अतिशय आतुरला. मग नारदाचे तनही नारायणापासून दूर रहाण्यास तयार होईना. प्रेमाच्या आवेगाने नारायणापाशी आधीच जाऊन पोहोचलेल्या मनानेच त्या नारदाच्या देहालाही वेग दिला आणि निमिषार्धात नारद वैकुंठात येऊन पावला.

नारायणाची भेट घेण्यासाठी धावतच पुढे आलेल्या नारदाने नारायणाकडे पाहिले मात्र, आणि चकित होऊन त्याने स्वतःला सावरले. नारायणाच्या एका आगळ्या वेगळ्या रूपाचेच दर्शन त्याला घडले. लक्ष्मीसह झोपाळ्यावर बसलेला नारायण लक्ष्मीसमवेत बोलण्यात अतिशय रंगलेला व गुंगलेला होता असे

दिसत होते. नारायणाने अतिशय प्रेमाने लक्ष्मीचे हात आपल्या हातात घेतले होते व तिच्याशी काहीतरी विनोदाने बोलत होता. काहीतरी गमतीशीर तिला सांगत होता. लक्ष्मीही नारायणाच्या नर्म विनोदाला स्त्रीसुलभ हसून व थोडीशी लाजूनच सहज प्रतिसाद देत होती. प्रेमाच्या सुखसंवादात रमलेल्या अशा त्या नारायणाच्या व लक्ष्मीच्या दर्शनाने नारदही आश्चर्यचकित झाला, एवढेच नव्हे तर तो सुखावलाही. नारायणाच्या त्या सुंदर रूपाचे दर्शनसुख मनसोक्तपणे घेता यावे म्हणून नारद थोडासा आडोशामागे झाला व तेथूनच नारायणाला अत्यंत प्रेमाने व कौतुकाने न्याहाळीत राहिला.

असा बराच काळ गेला. नारायणाच्या आनंदाच्या सुखात सहभागी झालेली लक्ष्मी नारायणाला तिच्या प्रेमभावाने सुखवीत होती. त्या उभयतांना आता दुसऱ्या कशाचेही भान राहिले नसावे असा विचार नारदाच्या मनात येतो न येतो तोच नारायण अत्यंत सहजपणे उद्‌गारला, ''अरे नारदा, असे आडून आमच्याकडे पाहून त्याचा आनंद घेण्यापेक्षा प्रत्यक्ष आमच्या आनंदातच सहभागी हो ना!'' असे केवळ बोलूनच नारायण थांबला नाही, तर बोलत बोलत तो स्वतः पुढे आला. नारदाचे दोन्ही हात धरून त्याने नारदाला आत आणले आणि आपल्याजवळ अत्यंत प्रेमाने बसवून घेतले.

नारायणाने केलेल्या प्रेमस्वागताने नारदही भारावून गेला व अधिकच भावपूर्ण झाला. त्या भावाच्या भरातच तो बसलेल्या जागेवरून त्वरित उठला व त्याने नारायणाला साष्टांग प्रणिपात केला. नारायणानेही हर्षभरित होऊन नारदाला प्रेमाने उठवले व दृढ आलिंगन दिले. भक्तिभावाने नारायणाच्या हृदयाचे अंगच होऊन राहिलेला नारद व आनंदानुभवाने नारदाचे हृदयच होऊन राहिलेला नारायण, या उभयतांचे ते अलौकिक मीलन पाहून लक्ष्मीचेही अंतर भरून आले व नेत्राद्वारे सहजपणे वाहू लागले. स्वानुभवाने ती जाणत होती, की एका क्षणात प्रेमाच्या अलोट वर्षावाचा अनुभव आणून देणारे बाह्यांगाचे असे मीलन तेव्हाच घडू शकते, जेव्हा उभयतांच्या हृदयात ऐक्याचा अनुभव सततचा असतो. अंतःकरणातील प्रेमभाव क्षणाक्षणाला वाढून दाटत असतो आणि म्हणूनच बाह्यांगाच्या एका साध्याशा निमित्तानेही क्षणार्धात तो उत्कटतेने प्रगट होतो. नारायणाच्या व नारदाच्या आनंदाच्या अनुभवात आपल्या प्रेमभावाने आधीच समरस झालेली लक्ष्मी, त्या आनंदात प्रत्यक्ष सहभागी होण्यासाठी पुढे आली.

सर्वप्रथम तिने त्या देवभक्तांच्या अपूर्व व अनुपम जोडीला दोन्ही कर जोडून प्रेमपूर्वक वंदन केले असता, तिच्या मुखातून नारायणाच्या प्रेमाने व त्याच्या थोरवीने भरलेले असे त्याच्या भक्तिमाहात्म्यपर शब्द सहज ओघाने प्रगट होऊ लागले.

''हे भक्तप्रिय नारायणा, तुला त्रिवार वंदन असो. त्रिवारच का? खरे तर, वारंवारच तुला वंदन आहे. साऱ्या त्रिभुवनात नित्य वंदनीय असा तूच एकीएक आहेस. एवढेच नव्हे, तर तू सदासर्वकाळी स्मरणीय, पूजनीय आणि भजनीय आहेस. तुझ्या ठिकाणी नित नावीन्याने घडणाऱ्या आनंददायी लीला पाहता पाहता आणि जाणता जाणता, जेव्हा पाहणे संपतच नाही आणि जाणणे पुरे होतच नाही, तेव्हा तुझ्या चरणांवर मस्तक ठेवून विनम्रभावाने तुला वंदन करणे हा एकच पर्याय शिल्लक रहातो. बरे, असे वंदन पुन्हा पुन्हा करूनही प्रेमभावाची पूर्तता होत नाही ती नाहीच. तो तर अधिकच वाढून रहातो. कुठल्याही कृतीने त्या भावाची पूर्ती होण्याऐवजी तो त्यामुळे अधिकच वाढतो, हेच तर तुझ्याविषयीच्या प्रेमभावाचे विशेषत्व आहे. पण म्हणूनच तुझ्याविषयीच्या प्रेमभावाने मन नित्य दाटून भरलेले रहाते. तेथे तुझे वेगळेपणाने स्मरण करणेही शिल्लक रहात नाही आणि त्याची आवश्यकताही रहात नाही. कारण तुझ्या प्रेमलीला स्मरता स्मरता, त्यांचे मूळ असलेल्या तुझ्या प्रेमस्वरूप अंतःकरणाचेच स्मरण होते. त्या तुझ्या प्रेमस्वरूपात रममाण झालेल्या मनाच्या ठिकाणी स्मरण-विस्मरण हे द्वंद्वही पूर्णपणे लयाला जाते. तरीही तुझ्या प्रेमलीलांचे गुणगायन करून तुला सुखवावे अशी ऊर्मीही त्याच मनाच्या ठिकाणी निर्माण होते. तुझ्या गुणवर्णनात नित्य रंगलेल्या मनाकडून तुझी मानसपूजा नित्य घडत रहाते आणि म्हणूनच प्रत्यक्ष भेटीत तुझे प्रत्यक्ष पूजन सहजतेने व भावपूर्णतेने घडते. षोडषोपचारे केलेल्या पूजनाने जरी तू संतुष्ट झालेला दिसतोस, तरी शब्दरूपी सुमनाद्वारे केलेल्या तुझ्या पूजनानेच तू खरा प्रसन्न होतोस, हे गूज तुझे भक्तच जाणत असतात. म्हणूनच तुझे खरे भक्त तुला बाह्यांगाने तोषवूनही तुझ्या अंतराला नेहमीच प्रसन्न करीत असतात.

तुझ्याविषयीच्या आत्यंतिक प्रेमातून स्फुरलेल्या शब्दांनी तुझ्या अंतःकरणाचे वर्णन करू पाहणारी आमची वाणी, योग्य शब्दांच्या अभावामुळे अबोलच होऊन रहाते. पण त्याचबरोबर त्या वर्णनाद्वारे तुझ्या अंतःकरणातील आनंदानुभवाची नित्याची अवस्था व आमच्या मनाच्याठायी तात्कालिक झालेली भावपूर्ण अवस्था या दोन्ही अवस्थांतील अंतर जाणवते व मनाला अधिकच व्याकूळ करते. पण या व्याकुळतेमुळे मनाला कोणत्याची प्रकारची उदासीनता वा उद्विग्नता न येता, तुझ्या अवस्थेशी ऐक्य पावण्याचाच भाव

उत्कट होतो.  या उत्कट भावातूनच तुझी अंतर्बाह्य जवळीकता साधणे घडू लागते.  त्यातूनच तुझ्या अंतःकरणाशी ऐक्य पावण्याचा मार्ग मनाला दिसू लागतो.  त्या मार्गाने पुढे जाऊन, तुझ्या अंतराजवळ येऊन पावण्याचे मनोबळही तुझ्या प्रेमाकर्षणानेच प्राप्त होते.  हे जे सत्य माझ्या स्वानुभवाचे आहे, तेच आता मी तुझ्या व नारदाच्या भेटीच्या रूपाने साकार झालेले पहात आहे.

आपण उभयता एकांतात परस्परांच्या प्रेमाने युक्त होऊन भेटत असताना, तू तुझ्या स्वानंदाचे सुख माझ्यावर प्रेमाचा वर्षाव करून अनुभवीत होतास, तर माझ्याकडून तुझ्या प्रेमाला प्रतिसाद सहजपणे व उत्स्फूर्तपणे दिला जात होता आणि त्याद्वारे माझेही तुझ्यावरील प्रेम प्रगट होऊन, त्या प्रेमाचा आनंद मी अनुभवीत होते.  माझ्या प्रेमानुभवात मी सर्वांगाने एकरूप झालेली असल्यामुळे मी तर स्वतःला पूर्णपणे विसरलेच होते.  तुझ्या प्रेमवर्षावात सर्वांगाने चिंब भिजलेल्या अवस्थेत मी माझी म्हणून वेगळी राहिलेच नव्हते, तर सर्वभावाने तुझीच होऊन राहिले होते.  पण तुझे अंतःकरण अत्यंत व्यापक व सखोल असल्यामुळेच तू मात्र माझ्याशी तुझ्या अंतःकरणाच्या एका अंगानेच रममाण झाला होतास.  हेच तर तुझ्या अंतःकरणाच्या अवस्थेचे माहात्म्य आहे.  कारण त्या अशा अवस्थेमुळेच तू एकाच वेळी अनेक भक्तांशी रममाण होऊ शकतोस आणि त्या प्रत्येकाला मात्र तुझ्याशी पूर्णपणे एकरूप झाल्याचा आनंद अनुभवता येतो.

आत्ताचीच गोष्ट पहा ना!  तुझ्या प्रेमभेटीत पूर्णपणे रमलेल्या व रंगलेल्या मला, नारदाचेच काय पण दुसऱ्या कोणाचेही आगमन झालेले लक्षातच आले नसते.  परंतु नारद प्रत्यक्ष पुढे, तुझ्या दृष्टिक्षेपात आलेला नसतानाही तुला मात्र त्याचे येणे तात्काळ जाणवले.  अर्थात यात नवल ते काहीच नाही!  प्रिय भक्तांच्या हृदयात नित्य वास करून असलेल्या तुलाच भक्तांच्या आगमनामुळे दरवळलेला प्रेमाचा सुवास सर्वात आधी जाणवणार हे अगदी साहजिकच आहे.''

नारायणाच्या अंतःकरणाचे वस्तुनिष्ठ वर्णन करणारी लक्ष्मीने केलेली स्तुती ऐकून नारायणही अत्यंत मोकळेपणाने हसला आणि नारदानेही स्मितहास्यपूर्वक मान डोलावून आपली संमती प्रगट केली.  लक्ष्मीने पुढे येऊन नारदाला प्रेमादराने प्रणिपात केला असता नारदानेही प्रेमपूर्वक तिचे 'शुभ' चिंतिले.  नारायणालाही वंदन करण्यासाठी लक्ष्मी त्याच्या जवळ आली असता, नारायणाने तिचे दोन्ही कर प्रेमाने आपल्या हातात धरले व तिला प्रेमाने आपल्याजवळ बसवून घेतले.  तेवढ्यात शेषही तेथे आला.  त्यानेही भक्तिभावाने नारायणाच्या चरणांना वंदन केले.  नारदाकडे सुस्मित नजरेने पहात त्याने नारदालाही प्रेमादरपूर्वक नमस्कार

केला आणि तो नारायणाच्या चरणाशी विनम्रभावाने बसून राहिला. नारायणाच्या प्रेमाने भारीत झालेले नारद, लक्ष्मी व शेष आणि त्या सर्वांच्या प्रेमाने भावपूर्ण झालेला नारायण, यामुळे सर्व वातावरणातच जणू प्रेमभावाची दाटी झाल्यासारखे झाले होते. आकाशात जलाने संतृप्त असलेल्या मेघांची अचानक दाटी व्हावी आणि त्यातून एकदम जलधारांची बरसात सुरू व्हावी, अगदी त्याचप्रमाणे अंतःकरणात प्रेमभाव दाटून आलेल्या नारदाच्या मुखातून शब्दरूपाने प्रेमाचा जणू वर्षावच सुरू झाला.

''हे लक्ष्मीप्रिय नारायणा, हे नारायणप्रिय लक्ष्मी, तुम्हा उभयतांना माझा पुन्हा पुन्हा नमस्कार असो. तुमचा अखंड जयजयकार असो. पृथ्वीतलावर कोणत्याही आदर्श व अनुरूप अशा पती-पत्नीच्या जोडीला 'लक्ष्मी-नारायणाचा जोडा' असे संबोधण्याचा जो प्रघात आहे तो अगदी यथार्थच आहे. खरे तर, पृथ्वीतलावरील कोणीही प्रत्यक्ष तुम्हाला पाहिलेले नाही. पौराणिक ग्रंथाद्वारे त्यांनी तुमच्याविषयी काही वाचले वा ऐकले असेल तेवढेच त्यांना माहीत आहे. तरीही त्यांच्या मुखातून तुमचाच उल्लेख सहजपणे येतो. पण मी तर तुम्हाला प्रत्यक्षच भेटत असतो. तुमचे प्रत्यक्ष जीवन अगदी जवळून पाहण्याची संधीही मला तुमच्या माझ्यावरील आत्यंतिक प्रेमामुळेच मिळत असते. तुम्ही मला परका न मानता अगदी तुमच्या जवळचा समजता आणि तसेच नेहमी माझ्याशी वागता, हा तर मी माझा बहुमानच समजतो. सर्व नात्यापरते असणारे हे प्रेमाचे संबंध निर्माण होण्यासाठी मूळ कारण जरी हा नारायण असला तरी हे लक्ष्मी, तूही त्यासाठी सहाय्यभूत आहेस हे मी जाणून आहे. म्हणूनच हे माहात्म्य जरी नारायणाचे आहे तरी तुझेही कौतुक आहे. नारायणाच्या प्रेमाला व कौतुकाला तू पात्र होऊन राहिली आहेस यातच तुझे धन्यत्व आहे. कारण नारायणासारखा धनी मिळणे जेवढे दुर्मीळ व परमभाग्याचे आहे, तेवढेच त्या धन्याच्या सहवासात राहून व प्रेमाने त्याची सेवा करून स्वतःचे जीवन धन्य करणे हेही दुर्मीळ म्हणून कौतुकास्पद आहे.

हे लक्ष्मी, मागे एकदा तू मला म्हणाली होतीस की माझ्या येथील आगमनाने व भेटीने या नारायणाची कळी तात्काळ खुलते. पण आज तर मी येथे पहात आहे की तुझ्या सहवासात अनुभवलेल्या प्रेमाने या नारायणाचे मुखकमल मी येण्याआधीपासूनच अगदी पूर्ण फुललेले व अत्यंत प्रसन्न आहे. हे रहस्य काय आहे याचा उलगडा तुमच्या दोघांपैकी कोणी कृपा करून करेल काय?''

प्रेमाच्या हक्काने विनोदयुक्त बोलणाऱ्या नारदाचे बोलणे ऐकून नारायण अत्यंत मोकळेपणाने हसला. लक्ष्मी थोडीशी लाजून हसली, तर सर्वसाधारणतः नेहमी गंभीर असलेल्या शेषाच्या मुखावरही काही स्मितरेषा

झळकल्याच! लक्ष्मी व नारायणही एकमेकांकडे सहेतुक पाहून प्रेमाने हसले. थोडावेळ कोणीच काही बोलले नाही. पण लगेचच लक्ष्मी नारदाला उद्देशून बोलू लागली.

''हे नारदा, तू तर अशा तऱ्हेने प्रश्न विचारीत आहेस की जणू काय तुला काहीच ठाऊक नाही. अरे, हे रहस्य तुला माहीत नसणार तर दुसऱ्या कोणाला माहीत असणार? सर्वात प्रथम तूच तर हे रहस्य जाणलेस आणि अनेकांनाही तूच ते प्रगट करून दाखवलेस. मलासुद्धा हे नारायणाला प्रसन्न करण्याचे रहस्य तुझ्याकडूनच कळले व हळूहळू आकलनही झाले. आता तर ते माझ्या प्रत्यक्ष अनुभवाचेही होत आहे.

अंतःकरणाचेठायी नित्य स्वानंदात रमलेल्या नारायणाला आनंदीत करणे म्हटले तर कठीणच आहे. पण ते जर साधले तर ते अत्यंत सोपेही आहे. आपण जर आपल्या मनातील नारायणाविषयीच्या कल्पनेने किंवा त्याच्याविषयीच्या आपल्या बुद्धीच्या ज्ञानाने त्याला आनंदीत करण्याचा प्रयत्न करू लागलो, तर तो एक व्यर्थ खटाटोपच ठरतो हा माझाही पूर्वीचा अनुभव होता. कारण त्यात आपण नारायणाच्या अंतःकरणापेक्षा स्वतःच्या मनाला व बुद्धीलाच प्राधान्य देतो आणि प्रमाणही मानतो. त्यामुळे आपल्या सर्व प्रयत्नातील व कृतीतील 'मी'पणा कायम रहातो. एवढेच नव्हे, तर तो 'मी'पणाच वारंवार पुढे येतो आणि सारखा नारायणाच्या व आपल्या आड येतो. त्या 'मी'पणाचे क्लेश आपल्यालाही होतात व नारायणालाही होतात. त्या 'मी'पणाला आपल्याला सोडवत नाही आणि नारायणाने तो दूर करण्याचा प्रयत्न केला तरी ते आपल्याला आवडत नाही. तेव्हा हा आड येणारा 'मी'पणा बाजूला करण्याचे बळ आपल्यालाच यावे लागते आणि ते बळ प्रयत्नपूर्वक घेतले असताच येते असा माझा अनुभव आहे.

त्यासाठी सर्वात प्रथम व महत्त्वाची गोष्ट म्हणजे नारायणाला त्याचा स्वानंद उपभोगू देणे ही होय. कुठल्यातरी कृतीला व प्रसंगाला निमित्त करून तो स्वतःचे स्वतःवरील प्रेम अनुभवून स्वानंद भोगीत असतो. त्या त्याच्या कृतीत अत्यंत सहजता असते. त्यात कोणतीही कृत्रिमता नसते. त्याची ही सहजकृती अतिशय सूक्ष्म व तरल असते. त्यामुळे त्याच्या बाह्यकृतीत एखादे वेळेस अचानक बदल झालेला दिसतो. हाच क्षण आपल्या दृष्टीने नाजूक व महत्त्वाचा असतो. कारण नारायणाच्या बाह्य कृतीत रंगलेले आपले मन या क्षणांतील बदलामुळे गोंधळून जाते आणि त्या बदलानुसार चटकन बदलायला तयार होत नाही. मनाच्या मूळ प्रकृती स्वभावानुसार या बाह्य बदलाचा कमी-जास्त त्रास मनाला होतो. एवढेच नव्हे, तर त्या स्वभावाच्या अहंकारामुळे मनाला एक प्रकारचा घट्टपणाच येतो व मनाची बदलण्याची लवचिकताच नाहीशी होते. तरीही

कराव्या लागणाऱ्या बदलांमुळे स्वभावाचा अहंकार दुखावला जातो व मनाला अत्यंत यातनाच होतात. परंतु या नारायणाविषयीचा प्रेमभाव सबळ असेल तर हे मनाचे क्लेश सुसह्य होतात. एवढेच नव्हे, तर स्वभावाचा अहंकारही त्या प्रेमभावाने हळूहळू गळून पडतो आणि भक्तिभावाने तर तो अहंकार पूर्णपणे लयालाच जातो. मग एकीएक भक्तिभावाने युक्त झालेल्या मनाचे प्रेमसूर नारायणाच्या अंतःकरणातील प्रेमनादाशी जुळायला जरासुद्धा वेळ लागत नाही. असे सुसंवादी झालेले मन नारायणाच्या प्रेमाचा आनंद सहजपणे व पूर्णपणे अनुभवते. या आपल्या आनंदानुभवामुळेच नारायणही आनंदीत होतो व त्याची प्रसन्नता त्याच्या मुखावर विलसते. तेव्हा नारायणाच्या प्रसन्नतेचे रहस्य आपल्या भक्तिभावात आहे. आपल्या भक्तिभावाचे रहस्य आपल्या ठिकाणी त्याच्याविषयी निर्माण झालेल्या अनन्य प्रेमात आहे. आता या अनन्य प्रेमाचे लक्षण मनाने, भावाने व प्रत्यक्ष कृतीनेच नारायणाच्या अंतःकरणाशी, त्याच्या बाह्यरूपाशी व त्याच्या त्या त्या वेळच्या कृतींशी एकरूप होण्यामध्ये आहे, हे रहस्य तर नारदा, मला तूच उलगडून सांगितले आहेस. आता तूच मला 'ते रहस्य काय' म्हणून पुन्हा का विचारीत आहेस, याचेच रहस्य खरे तर मला तुझ्याकडून जाणून घ्यावेसे वाटत आहे.''

लक्ष्मीच्या बोलण्याने तिच्या नारायणावरील प्रेमाचे रहस्य तर सर्वांना कळलेच, पण सर्वांच्या मुखावर प्रेमाचे हास्यही झळकले. नारायणाच्या प्रेमाने सर्वांचीच अंतःकरणे भरून आली. सर्वांच्याच ठायी दाटलेला भाव मात्र शब्दरूप होऊन नारदाच्या मुखातून साकार होऊ लागला. प्रेमरसाने ओथंबलेल्या एकेका शब्दातून नारदाच्या अंतरात नित्य पाझरत असलेले नारायणाविषयीचे प्रेम जणू निर्झर होऊन स्त्रवू लागले. नारायणाच्या सगुण प्रेमाच्या प्रभावाने नारायणाविषयीचा भक्तिभाव हाच ज्याचा स्वभाव होऊन राहिला आहे असा नारद, स्वाभाविकपणे नारायणाच्या प्रेमभक्तिचे माहात्म्य गाऊन वर्णन करू लागला.

''हे प्रियतम नारायणा, आमच्यासारख्या सामान्यांवर खरोखरीच तुझे अनंत उपकार आहेत. आम्हाला भक्त म्हणून पाहून आमच्या संगे तू तुझा आनंद पूर्णपणे उपभोगीत असलास, तरी आम्ही तुझ्यापासून खरे विभक्तच आहोत हे तू जाणून असतोस. तुझ्या आनंदाच्या अनुभवाशी आम्ही आमच्या अवस्थेनुसार एकरूप होऊ शकत नाही हे सत्य तुला माहीत असल्यामुळे, आमची अवस्था वरच्या स्तरावर यावी असा प्रयत्न तू प्रामाणिकपणे करीत असतोस. सामान्यजन बाह्य सुखालाच आनंद समजतात आणि म्हणून त्यांचे त्या बाह्य सुखावरच प्रेम असते. त्याच ठिकाणी त्यांचे मन कायमचे जडून बसलेले असते. या सुखासक्तीमुळेच त्यांचे

मन दुर्बल होऊन राहिलेले असते. अशा त्यांच्या सुखासीन वृत्तीला तू प्रेमाने व कौशल्याने तुझ्याकडे वळवतोस. त्यासाठी सर्वप्रथम तू सामान्यातील सामान्यांनाही तुझ्या स्वानंदानुभवात बाह्यांगाने सहभागी करतोस. त्यांना आपला सखा मानून आपले सख्यत्व देऊ करतोस आणि त्यांना प्रेमाच्या बाह्य सुखाचा अनुभव आणून देतोस.

या बाह्यसुखातील आगळे-वेगळेपण काहीजणांच्या लक्षात येते व सुखासाठी संसाराकडे धावणारे त्यांचे मन त्यापासून हळूहळू परावृत्त होऊन तुझ्याकडे वळू लागते. तुझ्या सहवासात तुझ्या आनंदाच्या सुखाचा अनुभव घेता घेता, ते त्यांचे सर्व दुःख तेवढा वेळ विसरतात आणि त्यांचे मन थोडावेळ शांत होते. पण त्यातूनही काही भाग्यवंताना, तू ज्या प्रेमाने त्यांना तुझ्या आनंदात सहभाग देतोस, ते तुझे त्यांच्यावरील प्रेम त्यांना जाणवते. त्यामुळे तुझ्या सहवासात मिळणाऱ्या बाह्य सुखाचाच केवळ मोह न धरता, तुझ्या प्रेमालाच ते भुलतात आणि त्यांचे मन तुलाच वश होऊन रहाते. तुझ्या प्रेमालाच त्यांचे मन लाचावते. तुझे प्रेम अनुभवणे हीच त्यांची एकीएक आवडी होऊन रहाते. त्यामुळे सांसारिक सुखाची नावडी त्यांच्या ठिकाणी सहजपणे व पूर्णपणे निर्माण होते. संसारापासून पूर्ण परावृत्त झालेले त्यांचे मन तुझ्याच ठिकणी जडून रहाते आणि तूच एकमेव त्यांच्या अधिकाधिक आवडीचा होत रहातोस.

अशा तुझ्या प्रेमात रंगलेल्या भाग्यवान जीवांपैकी काहीजणांच्या मनाठायी तुझ्या प्रेमाचा संग जडतो व तुझ्याविषयीच्या प्रेमाचे मूळ त्यांच्या मनात निर्माण होते. त्यामुळे तुझ्या केवळ प्रेमाचे सुख अनुभवीत न रहाता, त्यांच्या मनात तुझ्याही सुखाचा व स्वास्थ्याचा विचार येऊ लागतो. तुझ्या आवडींचा विचार करता करता व त्या आवडींमागील कारणे जाणून घेता घेता, तुझ्या मनाची अवस्थाच त्यांना अधिकाधिक दिसू लागते. तुझ्यावरील निष्ठा व श्रद्धाभावाने तुझ्या मनाची अवस्थाच ते प्रमाण मानतात आणि त्या तुझ्या अवस्थेला अनुसरणे त्यांच्याकडून प्रयत्नपूर्वक घडू लागते. पण असे अनुसरणे त्यांच्या मनाच्या मूळ स्वभावाविरूद्ध असल्यामुळे स्वाभाविकपणे त्यांच्या मनाला सुरुवातीला अत्यंत क्लेश होतातच. परंतु तरीही तुझ्यावरील अखंड प्रेम व अभंग श्रद्धा यातून निर्माण झालेल्या तुझ्याविषयीच्या प्रीतीभावाची मात त्यांच्या स्वभावावर होत रहाते. त्यामुळे तुझे प्रेम अनुभवण्याच्या आड येणारा त्यांचा स्वभाव तेवढा वेळ का होईना, पण निश्चितपणे बाजूला होतो आणि तुझे प्रेम त्यावेळी तरी पूर्णपणे अनुभवून तुला ते आनंदीत करतात.

तुला आनंदीत करावे, तुला आनंदात पहावे असा छंद मनाला लागून राहिला असता, काहीजणांच्याच असे लक्षात येते की तुला जरी ते आनंदीत करीत असले, तरी तुझ्या आनंदाच्या अनुभवापासून ते स्वतः मात्र वेगळेच रहात आहेत. तुझ्या आनंदातच आपला आनंद आहे असा जरी त्यांचा भाव असला, तरी तुझ्या आनंदाचे कारण काहीतरी वेगळेच आहे हे त्यांना निश्चितपणे जाणवते व त्यांच्या मनात एक प्रकारचा दुरावाच निर्माण करते. आणि, हाच दुरावा त्यांना सहन होत नाही, तर अधिकाधिक बेचैनच करतो. ही त्यांची बेचैनीच त्यांना स्वतः अंतर्मुख व्हायला व तुझे अंतःकरण जाणून घ्यायला भाग पाडते. त्यातूनच तुझे अंतर व त्यांचे अंतर यातील सर्व विभक्तता नाहीशी करण्याचा प्रबळ व उत्कट भक्तिभाव त्यांच्या ठिकाणी निर्माण होतो.

हे नारायणा, या भक्तिभावापोटीच केवळ तुझ्या मनासारखेच नेहमी वागत असताना देखील, स्वतःच्या मनातील विचार व भावना ते तुझ्याकडे मोकळेपणाने प्रगट करीत रहातात. तू कृपावंत होऊन व स्वतः पुढाकार घेऊन त्यांना दिलेल्या सख्यत्वामुळेच हा प्रेमाचा मोकळेपणा त्यांच्या ठिकाणी निर्माण झालेला असतो. परंतु त्याचबरोबर तुझे माहात्म्यही त्यांच्याठायी पूर्णपणे ठसलेले असल्यामुळे, त्यांच्या मोकळेपणाच्या बोलण्यात कुठल्याही मर्यादेचे उल्लंघन होत नाही किंवा तुझ्याविषयीचा कोणत्याही प्रकारचा अनादर व्यक्त होत नाही. स्वतःच्या मनाची दुर्बलता व कमसरसता त्यांना ठाऊक असतेच. पण तरीही तुझ्या माहात्म्याचे मनावर दडपण घेऊन स्वतःच्या मनाचे दोष झाकून ठेवणे त्यांना मानवत नाही. तुझ्या त्यांच्यावरील प्रेमापोटी तुझ्यापासून मनात काही लपवून ठेवावे हे त्यांना योग्य वाटत नाही. म्हणूनच त्यांच्या मनाची अवस्था सहजपणे तुझ्याकडे प्रगट होत रहाते. परंतु त्याचबरोबर तुझ्या प्रेमामुळे तुझ्या मनासारखे करण्याचा त्यांचा भाव प्रभावी होतो आणि त्यांचा स्वतःचा प्रकृतीस्वभाव तेवढा वेळ बाजूला होतो. त्यांच्या कृतीमुळे तुला होणारा आनंद पाहून तेही तेवढा वेळ आनंदीत होतात. पण मग नंतर त्यांच्याही लक्षात येते की त्यांना झालेला आनंद हा केवळ तुला झालेल्या आनंदामुळे नव्हता, तर तेवढा वेळ त्यांचा स्वभावही त्यांच्यापासून दूर झालेला असल्यामुळेच त्यांना तुझ्या आनंदाच्या अनुभवाचा स्पर्श होऊ शकला होता आणि म्हणूनच तेवढा वेळ ते आनंदीत झाले होते.

एकदा का हे आनंदाचे कारण त्यांच्या लक्षात आले की तुझ्या आनंदाचा अनुभव स्वतःही घेण्याचे सूत्रच त्यांच्या हाती येते. ते सूत्रच ते प्रयत्नपूर्वक धरून ठेवतात आणि त्या सूत्राच्या आधारेच तुझ्याजवळ

येण्याचा व राहण्याचा त्यांचा प्रयत्न सतत चालू राहतो. तुझ्याशी साधलेल्या या जवळीकतेतूनच एक गोष्ट त्यांना निश्चितपणे जाणवते, की तुझा आनंदाचा अनुभव तर तुझ्यापाशी नित्यच असतो, परंतु त्या आनंदाशी एकरूप होण्याच्या आड जर काही येत असेल तर तो त्यांचा स्वभावच होय. तुझ्या प्रेमाने व तुझ्या प्रेमासाठी तो त्यांचा स्वभाव थोडा वेळ जरी बाजूला होत असला, तरी तो केवळ तुझ्या प्रेमाच्या प्रभावामुळेच होय. त्या स्वभावाचे मूळ मात्र त्यांच्या अंतरात कायम अत्यंत खोलवर व दृढतेने असते. या मूळ स्वभावामुळेच त्यांच्याठायी विभक्तता आहे याची त्यांना पूर्ण जाणीव होते आणि ही विभक्तता दूर करण्याचाच त्यांचा निश्चय होतो. ही विभक्तता फक्त तुझ्या प्रत्यक्ष प्रेमभक्तिनेच दूर होऊ शकेल याची त्यांना पूर्ण खात्री असते. म्हणूनच, तुझीच भक्ति करण्याचा एकीएक ध्यास त्यांना लागून रहातो आणि त्या ध्यासापोटीच तशी भक्ति त्यांच्याकडून प्रत्यक्ष घडूही लागते.

या भक्तिभावाचे पहिले, मूळ व मुख्य लक्षण म्हणजे तुझ्याविषयीचे आत्यंतिक प्रेम हे होय. तुला पाहणे, तुझ्याशी बोलणे, तुला प्रत्यक्ष भेटून तुझे सर्वांगाचे प्रेम अनुभवणे आणि नित्य त्या प्रेमानुभवाच्या स्मरणात व ध्यासात रहाणे हे तुझ्या भक्तांकडून एवढे सहजपणे व उत्स्फूर्तपणे घडत असते, की जणू त्यांना तुझ्याशिवाय दुसऱ्या कशाचेच भान नसते. त्यांच्या जीवनात तुझ्याशिवाय दुसऱ्या कशालाच महत्त्व असत नाही. त्यांच्या दृष्टीने तुझ्याशिवाय दुसऱ्या गोष्टींना अस्तित्वच नसते. आणि, असलेच तर त्यांची किंमत शून्य असते. परंतु या प्रेमाला तुझ्या माहात्म्यावरच्या श्रद्धेची पूर्णपणे जोड असल्यामुळे त्या प्रेमात कोणत्याही प्रकारचा आंधळेपणा नसतो हे महत्त्वाचे. श्रद्धेमुळे प्रेम सखोल होते व त्याला कणखरता येते. तेथे भावनिक दुर्बलता रहात नाही. तर, प्रेमामुळे श्रद्धा व्यापक व बळकट होते. त्यात कोणताही संकुचितपणा रहात नाही.

अशा प्रेम व श्रद्धा यांच्या युतीतून त्या भक्तांठायी तुझ्याविषयीची निष्ठा वाढत रहाते. तुझ्यावरील एकनिष्ठ भावानेच त्यांच्याकडून त्यागाची पराकाष्ठा सहजतेने घडते. हा त्याग केवळ बाह्यांगाचाच व केवळ बाह्य गोष्टींचाच न घडता, त्या भक्तांकडून त्यांच्या मनाच्या व बुद्धीच्या दोषांचाही त्याग हळूहळू त्यांच्या नकळत घडत रहातो. त्यामुळेच त्यांच्या प्रकृतीस्वभावाचा अहंकारही गळून पडतो आणि तुझ्यातील व त्यांच्यातील आंतरिक दुरावाही दूर होऊ लागतो. तुझ्यावरील आत्यंतिक प्रेम, श्रद्धा व निष्ठा यातून

भक्तांच्याठायी निर्माण झालेल्या भक्तिभावामुळे त्यांच्या ठिकाणची सर्व विभक्तता विरघळून जाते आणि तुझ्याशी ऐक्य पावल्याचा आनंद ते अनुभवते होतात.

अशा तऱ्हेने सुरुवातीला तू त्यांना आपणहून देऊ केलेले सख्यत्व ते सार्थ ठरवतात. तू त्यांच्यावर ठेवलेल्या विश्वासाला ते जागतात. तुझ्या प्रेमाला व माहात्म्याला नित्य स्मरतात. तुझ्यावर जडलेल्या प्रीतीमुळे तुझ्या भक्तीला ते पात्र होतात. त्यांच्या भक्तिभावाचा स्वीकार करून तू त्यांना धन्य करतोस. तुझ्या प्रेमाने नित्य भरून वाहणाऱ्या अंतःकरणामुळे ते जीवनात सदैव निश्चल, निर्भय व आनंदी असतात आणि त्यांचे जीवन खऱ्या अर्थाने कृतार्थ होऊन रहाते.''

नारायणाच्या प्रेमभक्तिचे माहात्म्य नारायणाचा प्रिय सखा नारद स्वानुभवाने दीर्घ काळ वर्णन करीतच राहिला असता. त्याचे बोलणे तसे सहजासहजी थांबलेही नसते. परंतु नारायणाच्या सगुण भक्तिची यथार्थ थोरवी वर्णन करता करता नारदाच्याठायीचे नारायणाविषयीचे प्रेम मोकळे होता होता अधिकच भरून आले. त्याचा कंठ दाटून आला आणि त्याचा शब्दप्रवाह कुंठीत होऊन राहिला. शब्दांचे द्वार बंद झाले तरी त्याचा आंतरिक प्रेमप्रवाह मात्र खंडीत होऊ शकला नाही. अनुभवाचे वर्णन शब्दांनी जरी कितीही केले, तरी शब्द प्रत्यक्ष अनुभव आणून देऊ शकत नाहीतच. परंतु शब्दांमुळे आधी घेतलेल्या अनुभवाचे स्मरण होते व तो अनुभव पुन्हा घेण्याचा ध्यास मात्र निश्चितपणे लागतो. हा ध्यासच प्रत्यक्ष कृती करून अनुभव घेण्यास मनाला प्रवृत्त करतो आणि इंद्रियांना उद्युक्त करतो. अगदी अशीच अंतर्बाह्य अवस्था नारदाची झाली. नारद वेगाने आपल्या जागेवरून उठला आणि अत्यंत आवेगाने नारायणाच्या जवळ जाऊन त्याने नारायणाला प्रेमालिंगनच दिले.

नारदाच्या या उत्स्फूर्त व उत्कट भावातून घडलेल्या सहज कृतीने नारायणासह लक्ष्मी व शेष चकित तर झालेच, पण विशेष आनंदित झाले. नारायणाचे प्रसन्न मुखकमल अधिकच संतुष्ट झाले. नारायणाच्या प्रेमालिंगनाच्या सुखाच्या स्मरणाने लक्ष्मीच्या मुखावरील प्रेमभाव अधिक फुलून आला, तर नारायणाच्या प्रेमाने व माहात्म्याने युक्त असलेल्या शेषाच्या मुखातून शब्दरूपाने नारायणाचे प्रेम स्त्रवू लागले.

''हे नारायणप्रिय नारदा, तुला अभिवंदन असो. या नारायणाचे माहात्म्य तू नित नावीन्याने गात असतोस याचे मला पूर्वी फार नवल वाटत असे. पण आता माझ्या लक्षात आले आहे की, या माहात्म्याचे

नित्यत्व जसे नारायणाच्या अंतरात आहे, तसे या माहात्म्यातील नावीन्य तुझ्याठायी असलेल्या नारायणाविषयीच्या आत्यंतिक प्रेमामध्ये आहे. या प्रेमामुळेच तुला नारायणाच्या माहात्म्याची नवीन नवीन अंगे दिसत असतात व त्यांचे सौंदर्य वर्णन करून तू त्याचा आनंद अनुभवीत असतोस. ते वर्णन श्रवण केल्यामुळे आम्हालाही नारायणाच्या अंतःकरणाची विविध अंगे त्यांच्या सौंदर्यासह पहायला मिळतात व थोडीफार कळतातही! परंतु ही अंगे नारायणाच्या ज्या अंतरंगाची आहेत, ते नारायणाचे अंतरंग तुझ्याप्रमाणे आम्ही यथार्थपणे जाणत नसल्यामुळे, आमच्या आनंदाची मर्यादा व रूप हे सुखापुरतेच रहाते. अर्थात या सुखापरते नारायणाविषयीचे प्रेमही आमच्या ठिकाणी निश्चितपणे आहे. त्या प्रेमातून नारायणाशी प्रीतीही जुळलेली आहे. परंतु त्या प्रीतीतूनच वरती आलेला भक्तिभाव मात्र आमच्या ठिकाणी पूर्णपणे नाही. त्यामुळेच भक्तिभावातून स्वानुभवाचे होणारे नारायणाचे खरे माहात्म्य आम्ही जाणू शकत नाही. ही व्यथा जरी आमच्या अंतरात असली, तरी त्याचबरोबर तुझ्या मुखातून या नारायणाच्या सगुणकथा श्रवण करण्याची आतुरता आमच्याठायी सदैव असते. यात आमचा काही मोठेपणा नसून, हा गुणधर्म आमच्या ठिकाणी निर्माण झालेल्या या नारायणप्रेमाचा आहे. या प्रेमामुळेच नारायणाच्या सगुणकथा श्रवणाने त्याच्याविषयी अंतरात निर्माण झालेली प्रीती वाढत राहून उत्कट होते. या प्रीतीभावातूनच भक्तिभावाचे प्रेम वरती येणार व नारायणाचे माहात्म्य आमच्याही अनुभवाचे होणार याची मला खात्री आहे.

हे नारद महर्षे, नारायणाचे प्रेम तुझ्या अंतरात भरभरून वहात आहे, अशा अवस्थेतील तुझे येथे होणारे आगमन, तुझे नारायणाकडे अत्यंत प्रेमभराचे पाहणे, त्याच्याशी आत्यंतिक प्रेमाने बोलणे, एवढेच नव्हे तर, तुझ्याकडून सहजपणाने घडणारी प्रत्येक उत्कट कृती ही आनंदसागरात नित्य वास्तव्य करून असलेल्या नारायणाचे अंतःकरणही उचंबळून आणते, तर नारायणाच्या प्रेमात असलेल्या आमच्याही ठायी प्रेमाच्या लहरीवर लहरी निर्माण करते, यात नवल ते काय? त्यामुळेच तुझ्या येण्याने या वैकुंठात एका नवीन प्रकारच्याच उत्साहाचे व आनंदाचे वातावरण निर्माण होते.

हे नारदा, एक गोष्ट मात्र निश्चित आहे की, तुझ्याकडून नित्य नावीन्याने प्रगटणाऱ्या नारायणाच्या माहात्म्याचे मूळ कारण या नारायणाचीच थोरवी हे जरी असले, तरी काहीतरी बाह्यांगाचे निमित्तकारणही घडलेले असतेच. हे निमित्तकारणही तेवढेच महत्त्वाचे असते आणि तेही जाणून घेणे हेही तेवढेच आनंदाचे असते. कारण त्या बाह्य कारणाचे मूळही नारायणाच्या सगुण प्रेमातच असते. हे नारदा, आज येथे तुझे

आगमन झाल्यापासून तू नारायणाच्या सख्यत्वाविषयी विशेषत्वाने सांगत आहेस. तुझ्या सांगण्यातील अक्षर अन् अक्षर खरे आहे असे मीही माझ्या अनुभवाने सांगेन. कारण या नारायणाने प्रेमाने व विश्वासाने आपणहून आपल्याला सहवास व सख्यत्व देऊ केले, म्हणून तर आपल्याला नारायणाची जवळीकता लाभली आणि त्याचे प्रेम अनुभवण्याची संधी आपल्याला नित्य उपलब्ध झाली. परंतु आजच या सख्यत्वाचे माहात्म्य प्रकर्षाने तुझ्याकडून प्रगट होण्याचे काय कारण आहे बरे? तुझ्या भूतलावरील वास्तव्यात असे काय घडले? तू काय पाहिलेस किंवा ऐकलेस, की ज्यामुळे तुझ्याकडून या सख्यत्वाविषयी विशेषरूपाने बोलणे होत आहे? नारायणाच्या भक्तिची थोरवी या सख्यत्वाच्या अंगानेच सांगण्याचे काय प्रयोजन आहे? खरेच हे जाणून घेण्याची आमच्या ठिकाणी असलेली उत्कंठा वाढतच आहे. कारण जरी तुझ्याकडून हा विषय उत्स्फूर्तपणे प्रगट झालेला असला, तरी त्यात थोड्या प्रमाणात का होईना, पण कार्यकारण भाव हा असणारच! तेव्हा कृपा करून आमच्या सर्वांच्याच मनात असणारी ही आस पूर्ण करावी अशी नम्रपणे प्रार्थना आहे.''

शेषाच्या यथार्थ बोलण्याने नारायण व लक्ष्मी दोघांनाही संतोष झाला व त्यांना शेषाचेही कौतुक वाटले. लक्ष्मीने ते कौतुक आपली पसंतीची मान डोलवून व्यक्त केले, तर नारायणाची पसंती त्याच्या मुखावरील मनमोकळ्या हास्याद्वारे व्यक्त झाली. शेषाच्या बोलण्याला नारदाकडून काय व कसा प्रतिसाद प्रगट होईल, तो श्रवण करण्यासाठी आतुर झालेले नारायण, लक्ष्मी व शेष या तिघांच्याही नजरा नारदावरती एकाग्र झाल्या. त्या तिघांच्याही एकवटलेल्या भावाचा प्रभाव नारदावर होऊ लागला व तो त्याच्या मुखावरील बदलत्या भावावरून जाणवू लागला. उत्कट भक्तिभावाने फुलून आलेले त्याचे मुखकमल केवळ सुंदरच नव्हे तर तेजस्वीही दिसू लागले. मूळच्या गौरवर्णात मिश्रित झालेल्या लाल रंगामुळे त्याच्या मुखावरती अत्यंत सुरेख व नाजूक अशा गुलाबी रंगाचेच साम्राज्य जणू पसरून राहिलेले दिसत होते. आपल्याकडे एकाग्र नजरेने बघणाऱ्या त्या तिघांकडेही पाहून नारदाने स्मितहास्य केले. क्षणभरच त्याने आपले नेत्र मिटून पुन्हा उघडले मात्र, त्याच्या नेत्रावाटे प्रेमाश्रूंचे जणू पूरच लोटू लागले आणि मुखावाटे शब्दधारा प्रवाही होऊन वाहू लागल्या.

''हे भाग्यवान शेषा, तुझे खरोखरीच कौतुक आहे. या नारायणाची नित्य सेवा करण्याची संधी तुला अत्यंत भाग्यानेच लाभली आहे. पण या सेवेतून तुझ्या ठिकाणी नारायणाविषयी आत्यंतिक प्रेम निर्माण झाले

आहे हेच अतिशय महत्त्वाचे आहे. कारण तसे पराकोटीचे व्यक्तिगत प्रेम निर्माण होणे हे मुश्कील नसले, तरी अत्यंत दुर्मीळ मात्र निश्चितच आहे. कारण असे प्रेम निर्माण होण्यासाठी कोणताही बाह्यांगाचा कार्यकारणभाव कारणीभूत होऊ शकत नाही. नारायणाच्या प्रत्यक्ष अनुभवलेल्या व्यक्तिगत प्रेमातूनच असे प्रेम निर्माण होत असल्यामुळे, नारायणाचे प्रेम हेच त्या प्रेमाचे एकमेव व खरे कारण असते. ते प्रेम त्याच्या सहजधर्माने पुन्हा नारायणाकडे वाहून नारायणाच्या प्रेमातच विलय पावत असल्यामुळे, नारायणाचे प्रेम हेच त्या निर्माण झालेल्या प्रेमाचे कार्यही ठरते. उरते मात्र त्या नारायणाच्या प्रेमाची लीला आणि त्या लीलेचा उभयतांना झालेला एकीएक आनंद! तेव्हा या प्रेमाचे कारण व कार्य दोन्ही त्या नारायणाच्याच ठायी असल्यामुळे त्याची निश्चितता, सातत्य, नावीन्य व सर्वात महत्त्वाचा गुण म्हणजे आनंददायित्व हे कायम रहाते. या नारायणाविषयीच्या प्रेमातूनच नारायणाचे माहात्म्य अधिकाधिक व यथार्थपणे जाणून प्रत्यक्ष अनुभवण्याची आतुरता नित्य वाढतच असते. अरे, हा गुणधर्म त्या नारायणाच्या प्रेमाच्याच अंगी आहे. ते प्रेम स्वतः तर स्वस्थ बसत नाहीच, पण दुसऱ्यालाही उद्युक्त करीत रहाते.

तेव्हा असे नारायणाच्या सगुण प्रेमाचे मूळ ज्याच्या अंतरात अत्यंत खोलवर पक्केपणाने व पक्वपणाने आहे, त्याला ते प्रेम प्रगट होण्यासाठी बाह्यांगाचे कोणतेही कारण निमित्तमात्र ठरते. मग ते कारण कितीही साधे दिसले तरी त्याला मात्र त्याचे विशेषत्वच असते. कारण त्या निमित्तकारणाने त्याच्या ठिकाणचे मूळ कारण असलेले प्रेमच उचंबळून येते. त्या प्रेमातच, प्रेमाच्या लहरीवर लहरी अत्यंत वेगाने निर्माण होऊ लागतात आणि त्यामुळे येणारा आनंदानुभव परमोच्च अवस्थेला जाऊन तेथेच स्थिर होऊन रहातो. ही अवस्था प्रेमाच्या परमावधीतून प्राप्त झालेली असल्यामुळे त्याच अवस्थेच्याठायी सगुण प्रेम अनुभवण्याची ओढही तेवढ्याच प्रकर्षाने असते.

हे शेषा, हे लक्ष्मी, माझ्या बाबतीतही नेमके असेच घडले. या नारायणाच्या संकल्पानुसार, भूतलावर मी नारायणाच्या प्रेमाने युक्त होऊन नारायणाच्या भक्तीच्या आनंदात पूर्णपणे बुडालो होतो व मुक्तपणे विहार करीत होतो. खरे तर, माझे देहभान हरपलेलेच होते. कोणत्या देशातून वा प्रदेशातून माझा प्रवास होत आहे याचाही मला विसरच पडला होता. तोच अचानक माझ्याठायी प्रेमाच्या आगळ्या-वेगळ्याच लहरी निर्माण होऊ लागल्या व क्षणार्धात त्या लहरी माझ्या सर्व अंतरालाच व्यापून राहिल्या. मला एक प्रकारची सुखद अशी अस्वस्थता जाणवू लागली व मी हळूहळू देहभानावर येऊ लागलो. मी हळुवारपणे नेत्र उघडून त्या

परिसराकडे पाहू लागलो आणि मी लगेचच ओळखले, की मी गोकुळ-वृंदावनात आलेलो होतो. त्या जाणिवेनेच माझ्या सर्व चित्तवृत्ती उत्तेजित व प्रफुल्लित झाल्या व एका विशेष आनंदाची अनुभूती घेऊ लागल्या. कारण याच ठिकाणी नारायणाच्या कृष्णावतारातील अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण व आनंददायी अशा प्रेमलीला प्रगट झाल्या होत्या. याच ठिकाणी हा नारायण कृष्णरूपाने बालगोपालांबरोबर नानाविध खेळ खेळला होता, याच ठिकाणी त्याने गोपाळांसह गोड गोपालकाला केला होता आणि याच ठिकाणी कृष्णरूपाने गोपिकांसंगे रासक्रीडा करून, त्यांचा सगुण प्रेमभाव उत्कटतेला नेला होता. याच गोकुळात कृष्णरूपाने त्याने गोकुळातील सामान्यातील सामान्य अशा गोपगोपिकांना प्रेमाने सख्यत्व देऊन आपली जवळीकता दिली होती. याच गोकुळात कृष्णरूपाने त्याने पेंद्याचे निरागस प्रेम अनुभवून त्याचेही सख्यत्व अनुभवले होते. याच गोकुळात कृष्णरूपाने या नारायणाने राधेच्या सख्यभक्तिभावाचा स्वीकार करून, तिच्या ठायीची सर्व विभक्तता लयाला नेली आणि तिच्याशी ऐक्य साधून तिला आपल्याशी एकरूप करून ठेवले होते. खरोखरी, याच गोकुळात राधा-कृष्ण यांच्या रूपाने सगुण प्रेमभक्तिचा पाया घातला गेला आणि ती भक्ती उत्कटतेने वाढून ऐक्यत्वाच्या कळसावर पोहोचली होती. एवढेच नव्हे तर, कृष्णाकडून त्याच्या पुढील जीवनातून प्रगटलेल्या अतिशय अद्भूत व दिव्य अशा चरित्राचा पायाही त्याच्या याच गोकुळातील वास्तव्यात घातला गेला होता.

अरे शेषा, हे लक्ष्मी, एवढ्या सर्व स्मृती एका क्षणात माझ्या ठिकाणी जाग्या होऊन माझ्या अंतरात खेळू लागल्या मात्र, सर्व कृष्णचरित्रच मला माझ्या अंतःचक्षूंसमोर दिसू लागले. मनाच्या सर्व कल्पनांच्या पलीकडे असूनही मनाला अत्यंत भावणारे, बुद्धीच्या सर्व तर्कांच्या पलीकडे असूनही बुद्धीला पटणारे आणि सर्व व्यवधानांच्या पलीकडे असूनही चित्ताच्या ठिकाणी ध्यास निर्माण करणारे असे अत्यंत मनमोहक व चित्तवेधक असलेले, त्या कृष्णरूपातील या नारायणाचे दर्शन मला पुन्हा पुन्हा स्मरत राहिले आणि माझ्या अंतरातील आनंदाला उधाणच आणीत राहिले. पण त्या आनंद-सागरातील आनंदाच्या कल्लोळात मला शांतपणे पहुडलेली या नारायणाचीच मूर्ती प्रकर्षाने दिसत राहिली. म्हणूनच या नारायणाच्या प्रत्यक्ष प्रेमाचा अनुभव घेण्याच्या तीव्र आकर्षणाने मी वाऱ्यापेक्षाही जास्त वेगाने धावत येऊन या वैकुंठात नारायणाच्या चरणी येऊन पावलो. पण येथे नारायणाचे प्रत्यक्ष दर्शन मला आगळे-वेगळे असेच जाणवले आणि माझ्या आश्चर्यात अधिकच भर पडली. कारण येथे नारायण अत्यंत प्रेमाने त्याच्या प्रिय पत्नी लक्ष्मीचेच प्रेमसौख्य अनुभवताना मी प्रत्यक्ष पाहिला अणि त्याची ही प्रेमलीला पाहून माझा आनंद द्विगुणित झाला. कारण

सौख्यत्वातून सख्यत्वाकडे नेणाऱ्या आणि सख्यत्वाकडून ऐक्यत्वाकडे आणणाऱ्या या कृष्णावतारात प्रगटलेल्या वृत्तीचे मूळ येथे प्रत्यक्ष नारायणाच्याच अंतरात आहे, हे मला जाणवले. तेव्हा फळातील रस मला मुळाशीच व मुळापासून सेवन करायला मिळणार याचा मला अत्यंत हर्ष झाला. ही संधी मला नारायणाच्या कृपेनेच मिळत आहे हे जाणवून, या नारायणाविषयीचा माझ्याठायी नित्य असलेला कृतज्ञभाव अधिकच दाटून आला आणि काही प्रमाणातच तो नेत्रांद्वारे वाहिला गेला.

खरे तर, हा नारायणच खऱ्या अर्थाने सर्वांचा परम सखा आहे. सर्व जगासाठी असलेला तोच एकमेव जगन्मित्र आहे. एवढेच नव्हे, तर अंतरात नित्य वास करीत असणारा व सर्व प्राणिमात्रांची त्यांच्या सर्व अवस्थेत सदैव साथ करणारा असा हा नारायण आत्म्याच्या रूपाने सर्व प्राणिमात्रांचाच खरा स्नेही आहे. परंतु त्याची जाणीव फारच थोड्याजणांना असते. कारण ते आत्मस्वरूप हे केवळ तत्त्व असल्यामुळे निर्गुण व निराकार आहे. त्यामुळे त्याचा ध्यास धरणेच मुळी कठीण होते, मग त्याचा अनुभव घेणे तर फारच दूरचे ठरते. परंतु त्याच तत्त्वाचा प्रगटणारा सगुण सुंदर रूपाचा आविष्कार मात्र मनाला आकर्षित करतो व त्या रूपाचे ध्यान मनाठायी स्थिर होऊ शकते. त्याचे व्यवधान व अनुसंधान मनाठायी निर्माण होऊन त्याचाच ध्यासही मनाला लागून रहातो. असे नारायणाच्या सगुण रूपाचे माहात्म्य आहे. आणि असा सुंदर, मनोहारी व रमणीय रूपाचा आविष्कार हा या नारायणाच्या सृष्टीतील केवढातरी चमत्कारच आहे. असा चमत्कार एखाद्या वेळेसच घडतो, परंतु तो सृष्टीच्या इतिहासात अजरामर होऊन रहातो. त्या रूपाचे व चरित्राचे गोडवे सृष्टीच्या अंतापर्यंत नित्य गायिले जातात आणि त्याद्वारे सगुण प्रेमभक्तिमार्गाचे माहात्म्य व थोरवी नित्य गर्जत रहाते. एवढेच नव्हे तर, उत्कट भक्तिभाव निर्माण होऊन ईश्वराशी ऐक्य पावण्यासाठी अनेकांना ते चरित्र प्रेरणादायी ठरते, ईश्वरावर प्रेम करण्यासाठी ते चरित्र काहीजणांचे स्फूर्तीस्थान होते, तर ईश्वरी प्रेम अनुभवण्यासाठी ते चरित्र सर्वांसाठीच खात्रीचे असे श्रद्धास्थान असते. तेव्हा अनेकांना अनेक कारणांसाठी त्यांच्या त्यांच्या अवस्थेनुसार अशा अवतारचरित्राचा लाभ होतो आणि त्यांच्या त्यांच्या भावानुसार अनुभव घेऊन त्यांचा भाव वरच्या वरच्या अवस्थेप्रत जात अधिक उत्कट होत रहातो. असेच अद्‌भूत व अद्वितीय चरित्र नारायणाच्या कृष्णावतारात प्रगट झाले.''

नारदाचे बोलणे ऐकून शेष व लक्ष्मी यांच्याठायीची उत्सुकता अधिकच वाढली. त्यांची उत्कंठा तर अगदी शिगेला पोहोचली. नारदाचे सांगणे जरी त्यांना शब्दाने कळत होते व त्या सांगण्याचा मथितार्थही जरी

त्यांना बुद्धीने समजत होता, तरी त्याचा भावार्थ मात्र त्यांना पूर्णपणे आकलन होईना. परंतु नारायणाचा भूतलावर कृष्णरूपाने अतिशय अद्‌भूत असा अवतार झाला होता आणि त्याच्याच स्मृती नारदाच्या अंतःकरणात विशेषत्वाने जागृत झाल्या आहेत, एवढे मात्र त्या उभयतांच्या निश्चितपणे लक्षात आले. परंतु त्यासाठी गोकुळाचाच परिसर कारणीभूत का व्हावा बरे? हा विचार त्यांच्या मनात घर करून राहिलाच! त्याविषयी सविस्तरपणे नारदच सांगू शकेल याचीही त्यांना खात्री होतीच आणि तसे विस्तृतपणे व भावपूर्णतेने प्रगट करण्यासाठी नारदही अतिशय आतुर झालेला आहे हेही त्यांना ठाऊक होते. म्हणूनच नारदाच्या बोलण्यातील सूत्र धरून लक्ष्मीच नारदाशी बोलू लागली.

"हे नारायणप्रेमी नारदा, तूच या नारायणाचे खरे प्रेम अनुभवतोस. तुझ्याकडूनच या नारायणाची खरी भक्ती घडते आणि तूच खऱ्या अर्थाने या नारायणाला आत्मसात केले आहेस हे त्रिवार सत्य आहे. म्हणूनच या नारायणाच्या अवतारचरित्रातील त्याच्या अंतःकरणाची अवस्थाही तूच यथार्थपणे जाणतोस. एवढेच नव्हे, तर ती अवस्था तू तुझ्याच अंतःकरणात नित्य अनुभवत असतोस आणि हेच मला जास्त अद्‌भूत वाटते. कारण त्याविषयी नारायणाला काही विचारले तर त्यालाही काहीच सांगता येणार नाही. पण तुझ्याकडून मात्र त्याविषयी सविस्तर व सखोल असे सहजपणे प्रगट होते. कारण नारायण हाच तुझ्या अंतःकरणाचा एकमेव असा विषय झालेला आहे. तेव्हा आता तूच आम्हाला नारायणाच्या कृष्णावताराचे रहस्यासहित वर्णन करून सांगावेस अशी मी तुला विनंती करते. नारायणाच्या सगुण कथांचे केवळ वर्णन नव्हे, तर गायन करण्यास तू आतुरच आहेस याची मला पूर्ण खात्री आहे. काहीतरी बाह्य निमित्त कारणाचीच तू नित्य वाट पहात असतोस. कारण मूळ या नारायणाविषयीचा आत्यंतिक प्रेमभक्तिभाव तुझ्या अंतःकरणात नित्य दाटून राहिलेला असतो हे मलाही माहीतच आहे. तेव्हा त्या भक्तिभावाला शब्दरूपाने साकार करून त्याचा आनंद काही प्रमाणात का होईना, पण आम्हाला अनुभवण्याची संधी तू द्यावीस अशी मी तुला मनःपूर्वक प्रार्थना करते.

हे नारदा, मागच्या वेळेस जेव्हा तुझे वैकुंठात आगमन झाले होते, तेव्हा नारायणाच्या रामावतारातील सगुण चरित्राचे माहात्म्य तू आम्हाला, त्या चरित्राचे गायन करून सांगितले होतेस. त्यातील रामाच्या अंतःकरणातील आत्मस्वरूप अनुभवाची अवस्था हेच प्रमाण आहे हे तू सांगितलेले रहस्य माझ्या अंतरात पूर्णपणे व कायमचे ठसलेले आहे. परंतु रामावतारानंतर पुन्हा कृष्णावताराने प्रगट होण्याची जरुरी व ऊर्मी या

नारायणाच्याठायी कशी काय निर्माण झाली हे रहस्य आता तू माझ्यासाठी प्रगट करावेस. कृष्णावतारात त्याच्या चरित्रात असे काय विशेष होते, की त्याच्या केवळ स्मृतीही तुझ्या मनाची अवस्था भावपूर्ण करीत आहेत? त्यातूनही त्यासाठी बाह्य कारण हे त्या गोकुळच्या परिसराचेच का घडले? त्या गोकुळात असे काय विशेषत्वाने घडले की तुझे मन त्या आठवणींनी एवढे भावविभोर व्हावे?

हे कीर्तनभक्तिपरायण नारदा, या नारायणाचे गुणसंकीर्तन हा तुझा केवळ छंदच नसून, ते तर तुझे स्वभाव वैशिष्ट्यच आहे. त्यामुळे तुझा स्वभावही तुला कृष्णचरित्र वर्णन केल्याशिवाय स्वस्थ बसू देणार नाही आणि आमच्या मनालाही ते श्रवण केल्याशिवाय स्वस्थता लाभणार नाही हे खरेच आहे. तेव्हा तू आता कृष्णचरित्र गायनास त्वरितच सुरुवात करावीस हेच योग्य आहे. मी व शेष ते श्रवण करण्यास आतुर तर आहोतच, परंतु हा नारायणही त्याच्याच अवतारातील सगुण कथांचे गायन ऐकण्यास तेवढाच उत्सुक आहे हेच एक नवल आहे. अर्थात त्याच्या सहवासात मी नित्य रहात असल्यामुळे मला त्याचे आता तेवढेसे नवल वाटत नाही. परंतु माझ्यासाठी अजूनही मात्र ते एक गूढच आहे.''

लक्ष्मीच्या बोलण्याने संतुष्ट झालेल्या नारदाने नारायणाकडे दृष्टिक्षेप टाकला असता नारायणाच्या मुखावरील मिष्किल हास्य त्याला दिसले. नारायणाच्या नजरेतील संमतीचा भाव नारदानेही जाणला आणि नारदही विशेष खुशीत आला. नारायणाच्या समक्ष आणि त्याच्या प्रियजनांच्यासह त्याचेच सगुण माहात्म्य वर्णन करण्याची सुवर्ण संधी मिळणे याच्याहून दुसरे थोर भाग्य ते काय असणार याची जाणीव नारदालाही होती. त्यामुळेच त्याच्या अंतरात सदैव दाटून राहिलेल्या भक्तिभावाचा आनंद प्रत्यक्ष अनुभवण्यासाठी नारद त्याचे भाव शब्दरूपात बांधून मोकळे करू लागला.

''हे सुभगे लक्ष्मी, माझ्या मागच्या भेटीत आपल्यात घडलेले बोलणे व झालेला संवाद तुझ्याठायी साररूपाने व भावरूपाने ठसलेला आहे याचा मला अतिशय आनंद होत आहे. कारण ते खरेच अत्यंत कौतुकास्पद आहे. अगं, मी अनेकांना वेगवेगळ्या कारणानुसार भेटत असतो. अनेकजण या विश्वातील घडामोडींविषयी माझ्याशी बोलत असतात आणि जिज्ञासूवृत्तीने मला अनेक गोष्टी विचारीतही असतात. माझ्या स्वभावानुसार मीही त्यांच्याशी मोकळेपणाने बोलत असतो. परंतु या विश्वाचाही कोणी सूत्रधार व चालक असेल याची तर कोणालाच कल्पनाही नसते. मग त्याच्याविषयी आणि त्याच्या विश्वनिर्मितीच्या हेतूविषयी कोणी विचारही करीत असेल हे तर शक्यच नाही. कारण स्वतःचे सुखदुःख, स्वतःच्या भावना व

कल्पना या व्यतिरिक्त कोणालाही काहीही माहिती नसते. बरे, थोडीफार काही माहिती असलीच तर त्याचा विचार करण्याची मनाची कुवतच नसते. कारण संसाराच्या वासनात्मक विचाराने व दृष्टीने मन अत्यंत कमकुवत झालेले असते. म्हणूनच अशा सद्य परिस्थितीत तुझ्यासारखी एखादी व्यक्ती या विश्वाचे मूळ असलेल्या या नारायणाचे अंतःकरण जाणून घेण्याचा नुसता विचार करत नाही, तर ध्यास धरते याचे मला केवढेतरी अप्रूप वाटते. एवढेच नव्हे, तर नारायणाच्या विविध अवतारातील त्याच्या अंतःकरणाची अवस्था समजून घेण्याची तुझ्या ठिकाणी निर्माण झालेली आवडी तर भूषणास्पदच आहे. कारण असे तुझ्यासारखे भक्तिभावाचे भक्त हेच त्या नारायणाचे खरे भूषण आहेत. अशा तुझ्यासारख्या भक्तांमुळेच नारायणाच्या अंतरीचे सौंदर्य प्रगट होऊन अनेक अंगाने खुलत रहाते व शोभायमान दिसत रहाते.

पण लक्ष्मी, एक गोष्ट लक्षात ठेव, की नारायणाच्या अंतरीचे सुंदरत्व हे त्याच्या शिवत्वात म्हणजे पावित्र्यात आणि त्याच्या सत्यत्वात आहे. या सर्व ब्रह्मांडाच्या अस्तित्वाचे मूळ नारायणाच्या अंतरातच आहे हेच एकमेव सत्य आहे. या ब्रह्मांडात व चराचर सृष्टीत अनेक घडामोडी घडल्या, बाह्यांगाचे बरे-वाईट, योग्य-अयोग्य एवढेच काय, अगदी धर्माअधर्माचे अनेक प्रसंग घडले, तरी त्याचा जराही लेप नारायणाच्या अंतःकरणाला लागू शकत नाही, एवढे ते निर्लेप आहे. कुठल्याही गोष्टीच्या परिणामाचा शेंडा वा बुडखाही त्याच्या अंतरात दाखवायला वा सांगायला उरत नाही, एवढे नारायणाचे अंतःकरण निर्मळ आहे. त्यातूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे एवढे असूनही त्याचा या सृष्टीविषयीचा आपलेपणा व प्रेम जराही कमी न होता कायमच असते, एवढे नारायणाचे अंतःकरण प्रेमळ आहे. कारण हे सर्व विश्वच त्याने त्याच्या एका अंशाने त्याच्याच ठिकाणी धारण केलेले आहे.

हे लक्ष्मी, असे हे 'सत्यम्', 'शिवम्' आणि 'सुंदरम्' असलेले नारायणाचे अंतःकरण मानव देहातील सगुण अवतारातही त्याच अवस्थेत असते हे महत्त्वाचे. या अवतारचरित्रात नारायणाकडून अनेक कारणांनी अनेक कर्मे घडतात. त्यातील काही कर्मे त्याच्या स्वधर्माचरणाचा भाग म्हणून असतात. ती कर्मे सत्त्वगुणी दिसतात. काही कर्मे सज्जनांचे रक्षण करून दुष्टांचा व खल प्रवृत्तीच्या जनांचा नाश करण्यासाठी असतात. ती कर्मे तमोगुणी दिसतात. तर काही कर्मे सामान्य प्रापंचिकांना व भाविकांना सर्व सुखे पुरवून त्यांना खऱ्या प्रेमाचा अनुभव आणून देण्यासाठी असतात. ती कर्मे रजोगुणी दिसतात. तेव्हा बाह्यांगाने त्रिगुणात्मक कर्मे घडताना दिसत असूनही, अवतारचरित्रातील नारायणाच्या अंतःकरणातील सत्यत्व, शिवत्व व सुंदरत्व बाधित

न होता कायमच असते, हेच या सगुण अवताराचे रहस्य आहे. हेच ते विशेषत्व आहे आणि हीच तर ती नवलाई आहे.

या दृष्टीने पाहिले असता नारायणाचा कृष्णावतार विशेष नवलाईचा ठरला असेच म्हणावे लागेल. कारण त्या चरित्रात तीनही गुणांचे कार्य प्रकर्षाने घडले. त्यामुळे सर्व गुणांच्या अनेकजणांचा कृष्णचरित्राशी संबंध आला आणि त्या प्रत्येक वेळेस व त्या प्रत्येक प्रसंगात कृष्णचरित्र विविध अंगाने प्रगटले व विविध रंगाने नटले. सर्वांनाच ही सर्व अंगे मनाला मानवली किंवा सर्व रंग मनाला भावले असे झाले नाही. कृष्णचरित्रातील ही लीला कोणालाच त्यांच्या बुद्धीने आकलनही होऊ शकली नाही. त्यामुळे काही जणांच्या मनात विकल्प निर्माण झाले, तर काहीजणांच्या बुद्धीच्या ठायी अश्रद्धा निर्माण झाली. परंतु त्यातूनही काहीजणांनी त्याच्यावरील व्यक्तिगत प्रेमाने व त्यातूनच निर्माण झालेल्या त्याच्याविषयीच्या भक्तिभावाने त्याच्याशी जवळीकता साधली. त्या जवळीकतेतूनच काहीजणांच्या मनाठायी त्या कृष्णाविषयी प्रेम निर्माण झाले. त्याच्या रूपाने, गुणाने व कार्याने तो कृष्ण त्यांच्या मनातच भरला. त्याचीच मनोभावे भक्ति करता करता तो त्यांच्या हृदयातच स्थान घेता झाला आणि त्यांचे सर्व अंतःकरणच तो व्यापून राहिला. त्यामुळे त्या प्रेमीभक्तांना त्यांच्या अंतःकरणातील आत्मस्वरूप किंवा ईश्वराचे अस्तित्व याचा आणखीन काही असा वेगळा अनुभव घेण्याची आवश्यकताच राहिली नाही.''

नारदाचे बोलणे ऐकून अधिकाधिक चकित होत असलेल्या लक्ष्मीला, तिला वाटत असलेले आश्चर्य लपविण्याची जरुरीच वाटली नाही. उत्तेजित होऊन ती नारदाला उद्देशून बोलू लागली.

''हे हरिकथापरायण नारदा, तू जे काही सांगत आहेस त्याचे तर मला अत्यंत नवलच वाटत आहे. बरे, तू तर एवढ्या सहजपणे व उत्स्फूर्तपणे बोलत आहेस, की त्याच्या सत्यत्वाविषयी मनाला अजिबात शंका वाटत नाही. परंतु त्याच्या शक्यतेविषयी मात्र तेवढीशी खात्री वाटत नाही. खरेच नारायणाच्या सगुण रूपावर एवढे प्रेम जडू शकेल? त्याची एवढी भक्ति घडू शकेल? हेच प्रश्न माझ्या मनात निर्माण होतात आणि मला वाटते असे प्रश्न कोणाही सामान्याच्या मनात येणे अगदी साहजिकच आहे. पण माझ्याच मनात लगेच असाही विचार येतो, की या नारायणाचे असेच अत्यंत रमणीय, मनमोहक व चित्ताकर्षक व्यक्तिमत्त्व जर सगुण रूपाने प्रगट झाले, तर असे प्रेम व अशी भक्ति अगदी सहज शक्य आहे. हे मी या नारायणाच्या नित्य व प्रेमळ सहवासाचा जो माझ्यावर परिणाम झाला आहे, त्या अनुभवाच्या बळावर व आधारानेच बोलू

शकते.  परंतु एक गोष्ट मात्र निश्चित आहे की या सहवासाच्या जोडीला त्याच्या माहात्म्याची जाणीव मात्र आपल्याठायी नित्य जागृत असणे अत्यंत आवश्यक आहे.''

लक्ष्मीच्या बोलण्याला उत्स्फूर्तपणे दाद देत नारद म्हणाला, ''अगदी बरोबर! हे लक्ष्मी, तुझ्या विचारसरणीचे मला कौतुकच आहे.  तुझ्या मनात प्रश्न येतात आणि त्यांची उत्तरेही तुझ्याच मनाला सुचतात, हेच खरे मनन होय.  कारण मनन योग्य दिशेने घडले तर प्रश्न केवळ अनुत्तरित न रहाता, त्या प्रश्नांची उत्तरेही सापडतात हे महत्त्वाचे आहे.  योग्य मननाचे हेच तर लक्षण आहे.  तेव्हा, मननातून तू काढलेला निष्कर्ष अगदी योग्यच आहे.  नारायणाच्या प्रत्यक्ष सहवासातच त्याच्या प्रेमाचा अनुभव व त्याच्या माहात्म्याची जाणीव होणे शक्य होते हे खरेच आहे.  पण त्याचे प्रेम व त्याचे माहात्म्य हे दोन्ही त्याच्या अंतःकरणातच आहेत.  त्या अंतःकरणाला पाहिले असताच त्यातील प्रेम दिसते आणि त्याच्या अंतःकरणाला जाणून घेतले असताच त्याच्या माहात्म्याची जाणीव होत रहाते.  परंतु त्या दोन्हींचा प्रत्यक्ष अनुभव घेतला असताच त्यांची परस्परांतील सांगड लक्षात येते.  त्याचे प्रेम अनुभवले असता त्याचे माहात्म्य अधिकाधिक कळते आणि त्याचे माहात्म्य जाणवले असता त्याचे प्रेम खऱ्या अर्थाने मिळते.  नारायणाच्या कृष्णावतारात त्याच्या अंतःकरणातील प्रेम व माहात्म्य असे दोन्ही अनुभवण्याची संधी सामान्यातील सामान्यालाही मिळाली हेच कृष्णचरित्राचे वैशिष्ट्य होय.  परंतु अनेकांना संधी मिळूनही त्याचा लाभ कोणी, किती व कसा करून घेतला हेसुद्धा एक नवलविशेषच ठरले.  अशा अनेक व्यक्तींच्या निमित्ताने घडलेल्या विविध प्रसंगातून सगुण प्रेमभक्तिचा मार्ग मात्र स्पष्टपणे प्रगट होत राहिला हेच अत्यंत महत्त्वाचे!''

नारदाचे प्रवाही बोलणे ऐकता ऐकता लक्ष्मी अधिकाधिक प्रभावित होत होती.  तरीही त्याच्या सांगण्याच्या शब्दप्रवाहात वाहून न जाता तिचे मन त्या शब्दातील प्रेमाने पूर्णपणे भिजूनही स्थिरच होते.  परंतु नारायणाचे कृष्णचरित्र सविस्तरपणे ऐकण्याची, त्या चरित्राच्या रसग्रहणाची व त्या चरित्राचे रहस्य जाणून घेऊन त्या चरित्राचा सर्वांगीण आनंद अनुभवण्याची तिची उत्कंठा मात्र अगदी शिगेला पोहोचून राहिली होती.  तोच भाव तिच्या बोलण्यातून प्रगट होऊ लागला.

''हे भक्तिप्रिय नारदा, नारायणाच्या सगुण चरित्राचे आणि विशेषतः त्यातील त्याचे त्याच्या भक्तांशी असलेले प्रेमसंबंध याचे गायन करून वर्णन करणे, हा तुझा केवळ छंदच नसून त्यासाठीच जणू तुझे जीवन आहे असे मला वाटते.  कारण त्यातूनच तू पूर्णपणे आनंद घेतोस हे मला अगदी स्पष्टपणे दिसत असते.

तेव्हा आता मला तू कृष्णचरित्र विस्तृतपणे व त्याच्या रहस्यासहित सांगावेस अशीच प्रार्थना मी तुला प्रेमपूर्वक करते. कृष्णचरित्राचे रहस्य तर त्याच्या अंतःकरणाच्या प्रेमस्वरूप अवस्थेत व त्याच्याशी अनेकांच्या आलेल्या प्रेमसंबंधात आहे, हे तर मला स्पष्टपणे जाणवत आहे. परंतु हे असे प्रेमसंबंध सर्वांनाच जमले का? सर्वांनाच मानवले का? सर्वांनाच फळले का? आणि त्याची परिणती सर्वांनाच भक्तिभावाचे फळ प्राप्त होण्यात झाली का? माझ्या मनात असे कोड्यासारखे अनेक प्रश्न निर्माण होत आहेत. परंतु हे प्रश्न माझ्या मनाला सतावीत नसून, त्यांची उत्तरे जाणून घेण्यासाठी खुणावीतच आहेत. कारण त्या निमित्तानेच या कोड्याचे एकेक धागे सुलगडत जातील व नारायणाच्या सगुण प्रेमाचे सूत्र मला सापडेल. ते प्रेमसूत्र मनात पक्केपणाने धरून ठेवले असताच, त्यातून या नारायणासाठी भक्तिचे वस्त्र मी विणू शकेन. ते त्यालाच भक्तिभावाने अर्पण करून त्याला आनंदीत करेन आणि तेव्हाच मीही खऱ्या आनंदाचा अनुभव घेईन. या माझ्या आनंदानुभवाच्या प्रवासातील वाटचालीला तू केवळ मार्गदर्शक आहेस एवढेच नसून, तुझ्या रूपाने मला प्रेमभक्तिभावाचे व तुझ्याठायीच्या आनंदानुभवाचे अत्यंत मनोहारी व रमणीय असे दर्शनच होते. हे दर्शनच मला नित्य प्रेरणा व स्फूर्ती देणारे असते. कारण तुझ्या रूपानेच या सगुण प्रेमभक्तिभावाचे शक्यत्व, सत्यत्व आणि श्रेष्ठत्व सिद्ध झालेले आहे. तेव्हा कृपा करून तुझे हे सिद्धत्व तू माझ्यासाठी प्रसिद्ध करावेस अशी विनवणी मी तुला अत्यंत प्रेमाने करते.''

*****



# कृष्णचरित्राचे रहस्य

लक्ष्मीच्या अत्यंत भावपूर्ण वक्तव्याने नारदही अतिशय आनंदीत व उत्साहित झाला. त्याच्या अंतःकरणातील फळलेला स्वानंदानुभव व मनात फुललेला भक्तिभाव शब्दरूपाने साकार होऊन पूर्णपणे खुलू लागला.

''हे नारायणप्रिय लक्ष्मी, तुझ्यासारखी भाग्यवान खरोखरी तूच आहेस. नारायणाच्या सगुणचरित्रातील प्रेमरसाचे सेवन करण्याची तुझ्या मनाला लागलेली गोडी अगदी अलौकिक व अमोलिकच आहे. त्यामुळेच कृष्णचरित्र केवळ बुद्धीनेच जाणून घेण्याची उत्सुकता तुझ्या ठिकाणी नसून, त्या रसाळ चरित्रातील प्रेम मनमुराद सेवन करण्याची आतुरता तुझ्या मनाच्या ठिकाणी लागून ती वाढतच आहे. तुझ्या मनाची होणारी अस्वस्थता व बेचैनी ही त्यामुळेच आहे आणि त्या मनाला स्वस्थता व चैन केवळ कृष्णचरित्रातील सगुणकथांच्या श्रवणानेच होणार आहे हे नक्की! तेव्हा आता सर्वांगाचे कान करून श्रवणाला सादर हो. कारण श्रवणभक्ती हीच त्या सर्वश्रेष्ठ आनंदानुभवाच्या अवस्थेतील पहिली पायरी आहे. श्रवणभक्तिच्या सखोल पायानेच भक्तिभावाचा आनंददायी असा परमोच्च व उत्तुंग कळस गाठता येतो. एवढेच नव्हे, तर तो कळस आपण स्वतःच होऊन रहातो.

अगं लक्ष्मी, कृष्णचरित्रही नारायणाच्या अवतार मालिकेतील असा कळसच होऊन राहिले. एकापेक्षा एक वरचढ असे चढत्या क्रमाने प्रगटलेले कृष्णाचे चरित्र हे या नारायणाच्या सृष्टीतील अतिशय अद्‌भूत असे नवलच ठरले. परंतु या चरित्राचे एक विशेषत्व असे आहे, की त्याचे सुसूत्रपणे वर्णन करणे शक्य होणार नाही आणि तसे ते करणे हे योग्यही ठरणार नाही. कारण कृष्णाचे अंतःकरण व माहात्म्य हे 'त्याच्या जीवनातील प्रसंग व घटना यांच्या क्रमानुसार प्रगट होऊन उच्च अवस्थेला पोहोचले' असे झालेले नाही. अनेक सुंदर व सुवासिक फुले एका सूत्रात गुंफली असता त्याची अत्यंत सुरेख अशी माळ तयार होते. ती माळ आपल्या गळ्यात घातली असता त्या फुलांचे रूप दृष्टीआड होते. तरीही त्यांचा सुगंध मात्र आपल्याला येत रहातो. परंतु त्याच सुवासिक फुलांचा एक गुच्छ करून जर हातात धरला, तर त्या फुलांचे सौंदर्यसुख एकत्रितपणे आपल्या नेत्रांना घेता येते आणि त्या फुलांचा परिमळही आपल्या श्वासाला सुगंधित व उत्तेजित करीत रहातो. अशा तऱ्हेने सर्व सुखाचा एकत्रित आनंद आपल्याला सहजपणे अनुभवता येतो. अगदी तसाच

अनुभव या कृष्णचरित्राद्वारे प्रगट झाला. तेव्हा हे लक्ष्मी, कृष्णचरित्राचे वर्णनही माझ्याकडून अगदी तसेच घडणार आहे. त्याच्या जीवनातील अनेक चित्रविचित्र प्रसंगांची व घटनांची मालिका एका अप्रगट अशा दैवी व अद्भूत सूत्रात गुंफलेली होती. तेच सूत्र पूर्णपणे जाणून लक्षात ठेवले तरच त्या कृष्णचरित्राचा खरा आनंद पूर्णपणे अनुभवता येईल.''

नारदाचे बोलणे ऐकता ऐकता कृष्णचरित्राचे श्रवण करण्याची लक्ष्मीची उत्सुकता अधिकाधिकच वाढत होती. त्यामुळे न राहवून नारदाचे बोलणे मध्येच थांबवीत ती म्हणाली,

''हे नारदा, तू कृष्णचरित्राविषयी केवढे तरी मगाचपासून सांगत आहेस, तरी पण अजून प्रत्यक्ष कृष्णचरित्र सांगण्यास मात्र सुरुवातच केलेली नाहीस. ते कसे व कुठून सांगण्यास सुरुवात करावी असा संदेह तर तुझ्या ठिकाणी असणे शक्यच नाही. बरे, ते कृष्णचरित्र वर्णन करण्यास कशी सुरुवात करावी अशीही अडचण तुला येणे शक्य नाही. कारण तुझ्या बोलण्यावरून एक गोष्ट मला निश्चितपणे जाणवत आहे की कृष्णाचे जीवन एका सुमधुर रसाने परिपूर्ण भरलेल्या फळासारखेच असावे. तेव्हा, त्या फळातील रसपान करण्यासाठी ते फळ खाण्यास कुठूनही सुरुवात केली तरी ते योग्यच ठरते. कारण त्या मधुर रसाची गोडी व त्याच्या सेवनाचा आनंद कायम तोच असणार आहे. अगदी त्याचप्रमाणे कृष्णचरित्राच्या वर्णनाची सुरुवात कुठूनही होऊ शकते. कारण प्रेमरसाने परिपूर्ण भरलेल्या कृष्णाच्या जीवनचरित्रातील प्रत्येक भाग व त्याचे अंग नि अंग अमृतासारखे गोडच असणार याची तुझ्याप्रमाणेच मलाही पूर्ण खात्री वाटत आहे. तरी तू आता जराही विलंब न करता त्वरित कृष्णचरित्राचे गायन करण्यास सुरुवात करावीस हेच सुयोग्य ठरेल.''

लक्ष्मीच्या बोलण्याने नारद अत्यंत संतुष्ट तर झालाच, पण त्याचबरोबर तो हळूहळू अंतर्मुखही होऊ लागला. त्याच्या ठिकाणी निर्माण झालेली स्तब्धता व शांतता ही वादळापूर्वीची नसून, पुढे अखंड वर्षणाऱ्या कृष्णप्रेमरूपी जलधारांचे ते सूचक सुचिन्ह होते. त्यामुळे निःशब्द स्तब्धतेच्या अवस्थेतून प्रेमशब्दांची अवस्था प्रगट होण्यास फार काळ जावाच लागला नाही. नारायणाचे सगुण प्रेम पुरेपूर साठून राहिलेल्या नारदाच्या अंतःकरणात सगुण भक्तिभाव दाटून आला व प्रेमशब्दांच्या शीतल व मधुर जलधारा बरसू लागल्या.

''हे नारायणप्रेमी लक्ष्मी, या नारायणाच्या सगुण प्रेमाच्या माधुरीला अमृताचीही उपमा कमीच आहे, एवढी त्याच्या प्रेमाची गोडी अवीट आहे. कारण एकवेळ अमृत सेवन करण्याचा वीट येणे शक्य आहे, परंतु

नारायणाच्या सगुणकथातील प्रेमगोडी केव्हाही कमी तर होत नाहीच, पण त्याच्या नित्य श्रवणाने व सेवनाने त्या प्रेमाची गोडी व खुमारी अधिकाधिक वाढतच रहाते. त्यामुळे त्या प्रेमाचा केव्हाही वीट येऊच शकत नाही. म्हणूनच त्या प्रेमाचा अनुभव नित्य नावीन्याचा व आनंदाचाच असतो.

हे लक्ष्मी, कृष्णचरित्राला तू रसपूर्ण फळाची दिलेली उपमाही अपुरीच आहे. कारण हे अमृतफळ प्रेमरसाने भरलेले तर आहेच, परंतु त्यामध्ये बिया वा सालीसारखा अनावश्यक असा काहीही भाग नाही. त्याचे बाह्य आवरणही एवढे नाजूक व रसमय आहे, की ते त्या फळापासून वेगळे करणे त्याच्या नाजूकपणामुळे शक्य होत नाही आणि त्याच्या रसमयतेमुळे तसे करणे आवश्यकही ठरत नाही. या अमृतफळामध्ये 'बी'सुद्धा एकच व अत्यंत सूक्ष्म असते. फळातील रसाचे सेवन करताना ती 'बी'ही सहजपणे सेवन केली जाते. एवढेच नव्हे, तर या 'बी'चेच पुढे बीजात रूपांतर होऊन त्यातून प्रेमामृताची फळे नित्य निर्माण करणारा असा महानुभवरूपी विशाल वृक्षही निर्माण होऊ शकतो. म्हणूनच कृष्णचरित्र हे जरी एखाद्या रसपूर्ण फळासारखे दिसले तरी त्याची गोडी त्याच्या केवळ मुळापासूनच नव्हे, तर त्याच्या बीजापासूनच आहे. आणि हे बीज म्हणजे या नारायणाच्या अंतःकरणाठायी अचानक व अकारण उठणारी प्रेमाची ऊर्मीच होय.

म्हणूनच फळाप्रमाणे रसपूर्ण असणाऱ्या कृष्णचरित्राच्या वर्णनाची सुरुवात मी अगदी बीजापासूनच करणार आहे. जसे गायन घडण्याआधी सूर लागणे व जुळणे आवश्यक असते. तसेच सगुण कथांचे गायन घडण्यासाठी नारायणाच्या अंतःकरणातील प्रेमाचा सूर ओळखून त्याच्याशी आपल्या मनाचा सूर जुळवून घेणे अतिशय आवश्यक असते. त्याच्या मनाशी आपण आपले मन जुळवीत राहिलो, तरच एक दिवस त्याच्या हृदयाशी आपले हृदय जुळेल. कारण त्याचे मन हे त्याच्या हृदयाशी नित्यपणे व सहजपणे जोडलेलेच आहे. त्यामुळे तेथे मुद्दामहून प्रयत्नपूर्वक जुळवून घेण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही. परंतु आपल्यासारख्या सामान्याला मात्र ते प्रयत्नपूर्वक व तपश्चर्येनेच साधावे लागते. नारायणाच्या मनाद्वारे त्याच्या प्रेमस्वरूप हृदयाशी जोडून घेता घेता, आपलेही मन निर्मळ होऊन आपल्या हृदयाशी प्रेमाने जोडले जाते व आपले सर्व अंतःकरणच नारायणाच्या अंतःकरणासारखे प्रेमळ होऊन रहाते. ही सर्व प्रक्रिया नारायणाविषयीच्या आत्यंतिक व सर्वांगीण प्रेमामुळेच घडू शकते आणि नारायणाविषयी एवढे प्रेम नारायणाचे सर्वांगाचे प्रेम अनुभवले असताच निर्माण होते.

तेव्हा नारायणाच्या मनात निर्माण झालेल्या प्रेमऊर्मीचे सूत्र दृढपणे धरूनच आपल्याला त्याच्या अंतःकरणापर्यंत जायचे आहे व तेथेच आनंदाचा अनुभव घेत रहायचे आहे. अशीच एक प्रेमऊर्मी नारायणाच्याठायी निर्माण झाली व त्यातूनच कृष्णचरित्राचा सागर प्रगट झाला. स्वतः स्वतःमध्ये नित्य रमणाऱ्या या नारायणाला अचानक त्या रमण्यात करमेनासे झाले. स्वतः स्वतःला वेगळेपणे पहावे, स्वतः स्वतःला वेगळेपणे ऐकावे आणि स्वतः स्वतःचेच प्रेम वेगळेपणाने अनुभवून आनंदीत व्हावे, या भावाच्या उठलेल्या ऊर्मीचे बीज एवढे सखोल व सक्षम होते, की त्यातूनच अनेक सुकोमल, सुवासिक व सुरेख पाना-फुला-फळांनी युक्त असा अत्यंत सुंदर व मनोहारी महावृक्षच जणू कृष्णचरित्राद्वारे प्रगट झाला. या वृक्षाखाली सावलीत बसून जीवनाचा खडतर प्रवास करणाऱ्या अनेक पांथस्थांना, त्यांना होणाऱ्या संसारतापापासून थोडावेळ का होईना, पण मुक्ती मिळाली आणि त्याच्या शीतल छायेत मनःस्वास्थ्य व सुख अनुभवता आले. याच वृक्षाखाली थांबून अनेकांना या वृक्षाच्या फुलांचा सुगंध घेता आला व त्यांची मने पुन्हा ताजीतवानी व उल्हसित झाली. याच वृक्षाखाली राहून अनेकांना या वृक्षाची सुमधुर फळे सेवन करता आली आणि याच वृक्षाचा आधार घेऊन काहीजणांनी त्या फळातील 'बी'चेही सेवन केले व स्वतःच फलरूप होऊन राहिले. म्हणूनच कृष्णगुणकथा या अत्यंत रमणीय आहेत, त्याच एकीएक स्मरणीय आहेत आणि त्याच अविस्मरणीय आनंदाच्या आहेत.

हे लक्ष्मी, त्रिभुवनात संचार करीत असताना पूर्वी एकदा माझ्या ठिकाणी या नारायणाच्या प्रत्यक्ष भेटीची अशीच अकारण तळमळ निर्माण झाली व माझे मन अत्यंत बेचैन झाले. कशातच व काहीही केल्याने मन रमेनासे झाले. एवढेच काय, नारायणाच्या स्मरणाने व गुणगायनाने मनाला शांती व समाधान होण्याऐवजी, मनाला एक प्रकारचा ताणच जाणवू लागला. माझे मन माझ्यावरच नाराज झाल्यासारखे झाले. माझ्या अवस्थेचा मीच वेगळेपणाने विचार करू लागलो आणि माझ्या एकदम लक्षात आले, की ही तर माझ्या मनाला लागलेल्या नारायणाच्या सगुण प्रेमाच्या भुकेचीच लक्षणे आहेत. नारायणाची सेवा म्हणून नारायणाच्या या सृष्टीकार्यात सहभागी होता होता, नारायणाच्या प्रेमाने या सृष्टीखेळात मी समरसही झालो आहे खरा, परंतु मला एकरूप त्या नारायणाशी व्हायचे आहे, याचा मलाही थोडावेळ विसरच पडला. हा प्रभाव जरी या सृष्टीरूपी मायेचा असला, तरी माझ्या ठिकाणी नारायणाच्या सगुण प्रेममायेचेच मूळ आहे हे तर सत्यच आहे. त्या प्रेममायेचे स्मरण झाले मात्र, ती तिच्या सर्व गुणधर्मांनी प्रगट झाली आणि त्यामुळे या नारायणाच्या सृष्टीखेळाच्या मायेचाही ताबडतोब निरास झाला. सूर्यावर त्याच्याच उष्णतेतून निर्माण

झालेल्या ढगांचे थोडावेळ आवरण यावे आणि स्वतः सूर्यच त्यामुळे झाकोळल्यासारखा दिसावा, तरी पुन्हा त्याच्याच तेजसामर्थ्याने ते मळभ तात्काळ दूर व्हावे आणि सर्व सृष्टी सूर्याच्या प्रकाशाने पुन्हा उजळून निघावी, अगदी तशीच माझ्या मनाची अवस्था झाली. माझ्या मनाच्या बेचैनीचे निदान झाले, उपाय सापडला आणि मी त्वरित मनोवेगापेक्षाही कितीतरी पटीने अधिक असलेल्या प्रेमवेगाने नारायणाच्या भेटीसाठी धावतच सुटलो.

प्रत्यक्ष वैकुंठात येऊन पहातो तो काय? नारायण जणू माझी वाटच पहात होता असे मला जाणवले. कारण आपल्या भक्तांची नित्य वाट पाहण्याचा या नारायणाचा सर्वश्रुत असलेला स्वभाव मी नेहमीच अनुभवीत असतो. पण खरी गंमत अशी आहे की आपल्याला वाटत असते, की नारायण फक्त आपलीच वाट पहात असावा. परंतु आपल्या भेटीचा त्याला झालेला आनंद प्रेमाने पहात असतानाच आपल्या लक्षात येते की या नारायणाचे भक्तांची वाट पाहणे अजूनही सुरूच आहे. त्याचेच आपल्याला कुतूहलही वाटते. केव्हातरी वाईट वाटते व मन नाराज होऊन नारायणाचा थोडासा रागही येऊ शकतो. परंतु हा थोडासा आलेला राग थोडा वेळच टिकू शकतो. कारण मुळातील नारायणावरील प्रेम अत्यंत प्रवाही असते आणि झालेल्या विरहामुळे लागलेल्या ओढीने त्याला एवढा वेग प्राप्त होतो, की या तात्कालिक आलेल्या रागाला तात्काळ पळच काढावा लागतो.

हे लक्ष्मी, त्या वेळेस माझ्या बाबतीतही अगदी तसेच घडले. मी नारायणाच्या महालात आलो तर नारायण माझीच वाट पहात उभाच आहे असे मला दिसले. कारण मला पाहताक्षणीच नारायण स्वतःच पुढे झेपावला व त्याने मला प्रेमपूर्वक दृढ आलिंगन दिले. नारायणाच्या प्रेमळ अंगस्पर्शाने, त्याच्या मुखातून सहजपणे येणाऱ्या 'नारदा, माझ्या प्रिय नारदा' या प्रेमशब्दांनी आणि त्याच्या श्वासोच्छवासांतूनही प्रगटणाऱ्या प्रेमाच्या वाऱ्याने माझे सर्वांग रोमांचित झाले, मनाला शांती लाभली आणि सर्व अंतःकरण पूर्ण समाधानाने भरून राहिले. अशी ती अवस्था कायमचीच रहावी असे मला वाटते न वाटते, तोच थोड्या वेळाने नारायण स्वतःहूनच माझ्यापासून थोडासा दूर झाला. अत्यंत तृप्तभावाने मी नारायणाच्या मुखाकडे पाहिले असता माझ्या लक्षात आले, की माझी भेट घेऊनही नारायण अजून थोडासा बेचैनच आहे.

नारायणाच्या त्या बेचैनीचे कारण काय असावे याचा अंदाज वा कल्पना करीत न बसता, मी प्रत्यक्ष नारायणालाच विचारून त्याचे मनोगत जाणून घेण्यास सुरुवात केली. कारण मनाचा मागोवा घेणे जरी

कठीण असले, तरी उभयतांची मने जुळल्याशिवाय प्रेमाचा अनुभव घेता येणे शक्य होत नाही, हे तर अगदी खरेच आहे. नारायणाचे मन तर त्याच्या अंतःकरणाशी सहजपणे व सलगपणे जोडलेलेच असते. तेव्हा, त्याच्या अंतःकरणाशी जाऊन मिळण्यासाठी आपल्याला त्याच्या मनाद्वारेच जाणे आवश्यक आहे. एकदा का त्याच्या मनाशी आपले मन जुळले, की मग त्याच्या अंतःकरणापर्यंत जाण्याचा आपल्या मनाचा प्रवास हा केवळ एक प्रवास न रहाता, ती एक प्रेमाच्या मोकळेपणाची व आनंदाच्या अनुभवाची यात्राच ठरते. हा मार्ग नारायणाच्या व्यक्तिगत प्रेमातून उगम पावत असल्यामुळे अत्यंत सुगम व सुलभ तर आहेच, पण त्यात ध्येयाच्या पूर्तीची पूर्णपणे निश्चिती आहे. म्हणूनच नारायणाचे अंतःकरण जाणून घेण्यासाठी आधी त्याचे मन जाणून घेण्यास सुरुवात करणे अत्यंत आवश्यक व महत्त्वाचे आहे. तेव्हा या एकाच उद्देशाने मी माझ्या मनाच्या मोकळेपणाने नारायणाशी बोलण्यास सुरुवात केली.

‘‘हे नारायणा, तुझ्या अंतःकरणाची प्रेमस्वरूप अवस्था अत्यंत गहन असल्यामुळे जाणणे जरी कठीण असले, तरी ती अवस्था ज्या तुझ्या रूपामुळे व रूपाच्या आधारेच जाणता येणे शक्य आहे, ते तुझे बाह्यरूप व तुझे व्यक्तिमत्त्व हेही अत्यंत आकर्षक आहे. त्यामुळेच तुझ्या ठिकाणी माझे मन सहजच आकर्षिले जाते. तुझे रूप, तुझे पाहणे, तुझे हसणे, तुझे बोलणे, इतकेच काय तुझे ऐकणेसुद्धा माझ्या मनात नित्य रुंजी घालत असते. तुझ्या रूपाचे स्मरण जरी माझ्या ठिकाणी नित्य व सहजपणे असले तरी तुला प्रत्यक्ष भेटण्याची ओढ कायम असते. कारण प्रत्यक्ष भेटीतच तुझे मनोगत पाहणे, ऐकणे व जाणणे शक्य होते. तुझे मनोगत समजणे व त्याप्रमाणे त्याच्याशी माझे मन जुळून माझेही तेच मनोगत होणे अत्यंत आवश्यक व महत्त्वाचे आहे. नाहीतर त्या भेटीचा आनंद तर होत नाहीच, परंतु ती भेट होऊनही न झाल्यासारखीच वाटते.

हे प्रिय नारायणा, अगदी आपली ही आत्ताचीच भेट बघ ना! या भेटीचा आपल्या उभयतांनाही केवढा तरी आनंद झालेला आहे हे तर निश्चित आहे. परंतु त्याचबरोबर मला ही गोष्ट देखील जाणवते व लक्षात येत आहे की हा आनंद जरी मी पूर्णपणे अनुभवला आहे, तरी तुझ्या ठिकाणी मात्र हा अनुभव तुझ्या आनंदाच्या अनुभवाचा एक अल्पसाच भाग आहे. हा फरक जाणवला की माझा आनंदाचा अनुभव हळूहळू ओसरू लागतो व मनाला एक प्रकारची थोडीशी बेचैनीच येते. परंतु हा फरक भरून काढणे मला तेव्हाच शक्य होईल जेव्हा कृपावंत होऊन तू तुझे मनोगत प्रगट करशील. तरी हे सख्यप्रिय नारायणा, तुझ्या मनाची सध्याची अवस्था माझ्यासाठी तू मोकळेपणाने प्रगट करावीस अशी तुला माझी नम्रतापूर्वक प्रार्थना आहे.’’

नारदाच्या प्रेमळ व मोकळ्या बोलण्याने नारायणाला अत्यंत संतोष झाला. त्याच्या रम्य मुखावर प्रेमहास्य खेळू लागले. त्याच्या अंतःकरणात सहजपणे असणारा मोकळेपणा मनाची द्वारे पूर्णपणे उघडून शब्दरूपाने वाहू लागला.

''हे नारदा, तू माझा अत्यंत प्रिय सखा आहेस हे गूज आता काही गूज म्हणून राहिलेले नाही. कारण आता ते सर्वांनाच ठाऊक झालेले आहे. मी तुला दिलेल्या सख्यत्वाला तू खऱ्या अर्थाने जागत असतोस आणि आपले ऐक्यत्व अनुभवण्याची तुझ्या ठिकाणी ओढी व गोडी ही नेहमीच आत्यंतिक असते. म्हणूनच माझ्या मनाची अस्वस्थता तुला जाणवते आणि ती जाणून घेण्यासाठी तू स्वतःच अस्वस्थ होऊन राहतोस. 'माझ्या मनाच्या अस्वस्थतेचे मूळ माझ्या अंतःकरणातच आहे आणि तेही या विश्वाच्या निर्मितीपासूनच आहे' हे तर तुलाही ठाऊकच आहे. ही माझ्या अंतःकरणाची अवस्था मुलभूत व सहजतेने असल्यामुळे ती कायम तशीच राहणार हे तर सत्यच आहे. किंबहुना या माझ्या अंतःकरणाच्या अस्वस्थतेतूनच या विश्वाची निर्मिती झालेली आहे आणि या अस्वस्थतेमुळेच या विश्वाच्या गतीला प्रेरणा मिळत असते. परंतु या विश्वात घडणारे सर्व व्यवहार मात्र जरी माझ्या नियतीने बांधले गेले असले, तरी त्यांच्यावर माझे प्रत्यक्ष असे नियंत्रण काहीच नाही. त्यामुळे या विश्वातील व्यवहारांमुळे ते विश्व जर माझ्या अंतःकरणाशी जोडले न जाता, ते व्यवहार माझ्या अंतःकरणाच्या व या विश्वाच्या आडच येऊ लागले तर मग ती अस्वस्थता माझ्या मनातही उतरते आणि माझ्या मनाला एक प्रकारची बेचैनीच येते. माझ्यापासून निर्माण झालेल्या या विश्वात मीच कोणाला हवासा वाटतो आहे की नाही या विचाराने मनाला उदासीनताच येते.

हे नारदा, तू सर्व विश्वात नित्य संचार करीत असतोस आणि म्हणून तुलाच या सृष्टीतील सर्व व्यवहारांची खडान् खडा माहिती आहे. तेव्हा तूच मला सांग की या सृष्टीत असे काय घडत आहे, की ज्याचे पडसाद या बेचैनीच्या रूपाने माझ्या मनात उमटत आहेत. खरे तर, माझ्या अंतःकरणाच्या आनंदाच्या अवस्थेतून या सृष्टीची निर्मिती झाली ही वस्तुस्थिती आहे. पण आज परिस्थिती अशी आहे, की या सृष्टीमुळे माझ्या मनाला बेचैनीची अवस्था येत आहे. तेव्हा परिस्थितीने झाकोळल्या गेलेल्या वस्तुस्थितीला तूच आता मूळ स्थिती प्राप्त करून दे. कारण माझे अंतःकरण व मी धारण केलेली ही सृष्टी या दोन्हीला तूच यथार्थपणे जाणतोस. या दोन्हीची सांगड तूच घालू शकतोस, किंबहुना तुझ्या रूपानेच या दोन्हीची सांगड आहे. माझ्याठायी प्रसवून माझ्यापासून दूर जात असलेल्या या सृष्टीतील, माझ्यापर्यंत येण्याचा ब्रह्मदेवाने

निर्माण केलेला मूळ मार्ग या सृष्टीत प्रगट आहे की नाही? का तो मार्ग झाकोळला गेला आहे? आणि तसे असेल तर त्यावर उपाय काय? आणि तो कोणी करायचा? आणि त्यासाठी आपण म्हणजे मी प्रत्यक्ष काय करावयास हवे? या माझ्या मनात सतत निर्माण होत असलेल्या प्रश्नातच माझ्या मनाच्या बेचैनीचे कारण आहे आणि या प्रश्नाच्या उत्तरातच माझ्या मनाच्या समाधानाचा उपाय आहे.''

नारायणाच्या अस्वस्थतेचे वर्णन नारदाच्या मुखातून ऐकता ऐकता लक्ष्मीच थोडीशी अस्वस्थ होऊ लागली. म्हणून न राहवून ती नारदाला उद्देशून बोलू लागली.

''हे नारदा, या नारायणाच्या मनाची अस्वस्थता व त्याच्या अंतःकरणाची स्थिती ही एक मोठी नवलाईचीच गोष्ट आहे. ते तर एक गूजच आहे. अस्वस्थता जाणवते त्याच्या मनाला, पण त्या अस्वस्थतेचे कारण काय हे त्याचे त्यालाच समजू शकत नव्हते. ते कारण काय असावे हे तर तो तुलाच विचारत होता. आणि सर्वात नवल म्हणजे त्या अस्वस्थतेचे निवारण करण्याचा उपायही तो तुलाच विचारीत होता. खरे तर, त्याच्या अस्वस्थतेच्या अवस्थेतून त्याने विचारलेले प्रश्नच एवढे बोलके आहेत, की त्यातूनच त्याच्या अस्वस्थतेचे कारण अगदी स्पष्टपणे दिसत आहे. आपल्यापासून निर्माण होऊन दूर झालेल्या या सृष्टीचा वियोगच त्याला सहन होत नाही. परंतु हा वियोग दूर करण्याचा मार्ग त्याच्यापाशी नाही, तर तो मार्ग या त्याच्या सृष्टीतच असणार.''

लक्ष्मीच्या बोलण्याचा व नारायणाच्या अस्वस्थतेचे कारण जाणून घेण्याच्या तिच्या प्रयत्नांचा नारदाला अतिशय संतोष झाला व अत्यंत कौतुकाने तो उद्गारला,

''बरोबर! हे लक्ष्मी, अगदी बरोबर! नेमका तोच मार्ग या सृष्टीच्या नित्यक्रमाच्या व्यवहाराने झाकोळला जातो. आश्चर्य महणजे त्याची जाणीव व काळजी सृष्टीतील कोणालाही नसते. कारण या सृष्टीचा मूळ हेतू व त्याचे मूळ कारणच सर्व जन विसरून गेलेले आहेत. सर्वांचे मूळ व कारण असलेल्या नारायणाचेच सर्वांना विस्मरण झालेले आहे आणि त्यांना त्याचे स्मरण करून देणाराच कोणी नाही. प्रत्यक्ष नारायणाला कोणी पाहू व भेटू शकत नसल्यामुळे सामान्यांना त्याचे स्मरण करता येणे शक्यच होत नाही. त्यामुळे आठवण झाली तरी ती काल्पनिकच रहाते. बरे, ज्या कोणाच्या ठिकाणी नारायणाच्या अस्तित्वाची

जाण आहे त्यांना प्रत्यक्ष त्या नारायणाच्या प्राप्तीची ओढ नाही आणि ज्या कोणाला ध्यास आहे त्यांना प्रत्यक्ष नारायणापर्यंत जाण्याचा मार्गच ठाऊक नाही.''

नारदाचे बोलणे श्रवण करून लक्ष्मी थोडीशी चकित होऊनच म्हणाली, ''अरे नारदा, मग तू या सर्व सृष्टीत संचार करून काय करीत आहेस? नारायणाचे अंतःकरण तू जाणतोस व त्याची व्यथाही तू जाणतोस. सामान्यांची अवस्थाही तूच जाणतोस आणि त्यांच्या अडचणीही तूच जाणतोस. मग सामान्यांना नारायणापर्यंत येण्याचा मार्गही तूच सांगितला पाहिजेस व तूच दाखविलाही पाहिजेस. ही जबाबदारी तर तुझीच आहे. कारण तुझ्यापेक्षा अधिक योग्य व्यक्ती सर्व त्रिभुवनात असणे शक्य नाही याची मला खात्री आहे. नारायणही साहजिकपणे तुझ्याकडे याच विश्वासाने बघत असणार. मग तेव्हा तू प्रत्यक्ष कोणता उपाय नारायणाला सांगितलास व नारायणाला काय योजना सुचविलीस? त्या उपाययोजनेची प्रत्यक्ष कार्यवाही नारायणाने कशी केली? त्यामध्ये तुझे योगदान किती व कसे होते? हे सर्व ऐकण्याची माझी उत्कंठा अतिशय वाढत आहे.''

लक्ष्मीच्या बोलण्यावर नारदाने मंद स्मित केले व तो म्हणाला, ''हे लक्ष्मी, नारायणाचा माझ्यावरील विश्वास व तुझ्या ठिकाणी असलेली माझ्याविषयीची खात्री मी पूर्णपणे जाणून आहे. माझ्यावरील जबाबदारीचीही मला जाणीव आहे. अर्थात माझ्या मनावर याचे दडपण अजिबात नसते. मी अत्यंत मोकळेपणाने या सृष्टीत विहार करीत असतो. नारायणाच्या प्रेमाने युक्त असल्यामुळे या नारायणाचे माहात्म्य माझ्या ठिकाणी सदैव जागृत असते व त्याच्या गुणांचे संकीर्तनही माझ्या अंतःकरणात नित्य घडत असते. त्यामुळे ते माहात्म्य माझ्याकडून सहजच प्रगट होते. आणि नारायणाच्या गुणांचे गायनही माझ्याकडून सहज घडते. त्याच्या श्रवणाने नारायणाची थोरवी सर्वजणांना कळीत होते आणि नारायणाचे गुणवर्णनही त्यांच्या मनाला थोडावेळ का होईना, पण निश्चितपणे रिझविते व सुखविते. त्यामुळे त्यांनाही संसारातील सर्व दुःखांचा तेवढा वेळ विसरच पडतो. परंतु या सर्वाचा परिणाम त्यांच्या मनावर तात्कालिकच होतो. तो खोलवर जाऊच शकत नाही. कारण त्यांचे मन सांसारिक विचार, त्यातील अडचणी व त्याचीच काळजी यांनी पूर्णपणे भरलेले असते. त्यांना नित्याच्या दगदगीच्या व कटकटीच्या प्रत्यक्ष जीवनात आधाराची व रक्षणाची जरुरी असते. त्यांच्या दृष्टीने अप्रगट नारायणाचे अस्तित्व, त्याची नियती, त्याचे ज्ञान, त्याची प्राप्ती इत्यादी गोष्टी केवळ शब्दज्ञानापुरत्या व म्हणून गौणच ठरतात. कारण या सर्वांची त्यांच्या नित्य

जीवनासाठी त्यांना जरुरी वाटत नाही. त्यांना त्या गोष्टी वस्तुस्थितीला धरून वाटतच नाहीत. कारण त्यांना त्यांचे प्रत्यक्ष जीवन व परिस्थितीच महत्त्वाची असते. त्यातून सुटण्यासाठीच त्यांची धडपड चालू असते. पण त्या प्रयत्नात, त्यांच्या मनाची गुंतागुंत व त्यामुळे होणारे क्लेश अधिकच वाढत असतात.

हे लक्ष्मी, अशावेळी त्यांच्या ठिकाणचे हे सर्व अज्ञान दूर करण्यासाठी जर त्यांना सत्य ज्ञान सांगितले, तर त्यांना ते साहजिकपणे कोरडे व कटूच वाटते. तेव्हा त्यांच्या मनीचे दुःख जाणून त्यांच्या अडचणी प्रत्यक्ष दूर करणारा व त्यांना प्रत्यक्ष दिलासा आणि सुख देणाराच कोणीतरी हवा व त्यांच्या सुखदुःखाच्या प्रसंगात प्रत्यक्ष सहभागी होणारा व त्यांच्या भावनेशी समरस होणारा कोणीतरी हवा. त्यांना आपणहून जवळीकता देऊन प्रेमाने जवळ करणारा कोणीतरी हवा. त्यांना प्रेमाने आपलेसे करून त्यांच्या मनाचे दोष व दुर्बलता हळुवारपणे दूर करून, त्यांना सद्गुणी व सबळ करणारा असा कोणीतरी हवा, की ज्यामुळे सर्वसामान्यही त्या नारायणाची भक्ती करून त्याला प्राप्त करून घेण्याच्या मनाच्या अवस्थेला येऊ शकेल. आणि हे लक्ष्मी, असा कोणीतरी म्हणजे प्रत्यक्ष या नारायणाव्यतिरिक्त दुसरा कोणीही या त्रिभुवनात असणे शक्य नाही. त्या सम तोच एकमेव आहे. वेगवेगळ्या अवस्थेतील व भिन्न परिस्थितीतील सामान्यातील सामान्यांशीही जवळीकता साधून त्यांची मने प्रेमाने वश करणारा असा हा नारायणच एकीएक आहे. सर्वांच्या ठायी अंशरूपाने वास्तव्य करून असणाऱ्या या नारायणाच्या ठायीच सर्वांविषयीचा आत्यंतिक आपलेपणा व प्रेम सदासर्वकाळ सहजपणे असणार हे अत्यंत साहजिकच आहे.''

नारदाच्या बोलण्याला लक्ष्मीने पसंतीदर्शक मान डोलावली व ती म्हणली, ''हे नारदा, तुझे म्हणणे अगदी बरोबर व योग्यच आहे. परंतु हे सर्व तू नारायणाला त्यावेळी सांगितलेस का? आणि मुख्य म्हणजे, नारायणालाही ते संमत झाले का? त्यावर तुम्ही दोघांनी प्रत्यक्ष काय व कशी कृती केली हे ऐकण्यास मी तर अत्यंत आतुर होऊन राहिले आहे.''

लक्ष्मीची आतुरता व उत्सुकता जाणून नारदाचाही उत्साह द्विगुणित झाला आणि तो ओघवत्या वाणीच्या रूपाने ओसंडून वाहू लागला.

''हे लक्ष्मी, माझा सृष्टीविषयीचा अनुभव व त्यातून निर्माण झालेला माझ्याठायीचा भाव मी नारायणाला अत्यंत मोकळेपणाने प्रगट केला. या नारायणाचे हेच तर वैशिष्ट्य व माहात्म्य आहे. तो स्वतः

तर अत्यंत मोकळा असतोच, परंतु त्याचबरोबर त्याच्या सहवासात आलेल्यांनाही तो मोकळीक देत असतो व त्यांनाही मोकळे करीत असतो. ही संधी साधून जे आपल्या मनातील भाव मोकळेपणाने प्रगट करतात, तेच नारायणाच्या अंतःकरणाशी जवळीकता साधू शकतात. त्यांच्यासाठीच नारायणाच्या अंतःकरणातील भावावस्थाही सहजपणे प्रगट होते. त्या नारायणाच्या भावाची पूर्ती करून त्याच्या अंतःकरणाशी ऐक्य पावण्याचा आनंदही त्यांनाच अनुभवावयास मिळतो. मीही अगदी असाच अनुभव त्यावेळी या नारायणाशी बोलून घेतला. माझे बोलणे लक्षपूर्वक ऐकत असताना नारायणाच्या मुखावरील भाव बदलत होते. थोड्याच वेळात त्याचे मुखकमल सुंदर व मधुर हास्याने व्यापून राहिले आणि ते अतिशय सुरेख व शोभिवंत दिसू लागले. हर्षभराने नारायण आपल्या स्थानावरून उठला व त्याने मला प्रेमालिंगन दिले. बराच वेळ आपल्या अंगसंगाचे प्रेमसुख मला अनुभवावयास दिल्यानंतर त्याने मला आपल्या आासनावर अगदी जवळ बसवून घेतले. नारायणाने माझा हात प्रेमाने आपल्या हातात घेतला व आपल्या मधुर वाणीने तो माझ्याशी बोलू लागला.

''हे प्रिय नारदा, खरोखरीच तू माझा परमभक्त आहेस. माझ्या अंतःकरणात जसा तू आहेस, तसा तुझ्याही अंतःकरणात मीच आहे याची मला पूर्ण खात्री आहे. याचीच प्रचिती मला तुझ्या आत्ताच्या बोलण्याने आली. माझ्या सृष्टीतील प्रत्यक्ष परिस्थिती मला कधीच माहिती नसते. तरीही माझा या सृष्टीविषयीचा आपलेपणा सहज व कायम असतो. कारण ही सृष्टीच मुळी माझ्या माझ्याविषयीच्या आपलेपणातून निर्माण झालेली आहे. त्यामुळेच माझ्या ठिकाणी या सृष्टीविषयी व या सृष्टीतील व्यवहाराविषयी एक प्रकारची काळजी लागून राहिलेली असते. त्या काळजीचे निश्चित कारण जसे मलाही कळू शकत नाही, तसेच त्यावरील उपायही मला माहीत असू शकत नाही. परंतु हे नारदा, तुला या सृष्टीतील चालू असणारे सर्व व्यवहार व साद्यंत परिस्थिती पूर्णपणे माहीत असते. त्यामुळे तू या परिस्थितीचे केलेले मूल्यमापन व त्यावर सुचविलेली उपाययोजना अत्यंत योग्य व समर्पक आहे. त्यामुळे माझ्या मनाच्या ठिकाणी अचानकपणे निर्माण झालेली एक अनाहूत हुरहूर एकदम शांत झाली व माझ्या मनाला अत्यंत संतोष व समाधान प्राप्त झाले.

आता माझ्याही लक्षात आले आहे, की या सृष्टीत प्रत्यक्ष मीच अवरण्याआधीची भावपूर्ण अवस्था माझ्या अंतःकरणाची झालेली होती आणि मलाच त्या अवस्थेचे कारण कळत नव्हते. ते कारण

ओळखण्यासाठी व जाणण्यासाठी तुझ्यासारख्या भक्तांच्या भक्तिभावाची आवश्यकता म्हणूनच मला असते. कारण असा भक्त असलेला तू माझ्यापासून भावाने केव्हाही विभक्त नसल्यामुळे तुझ्याही अंतःकरणाची अवस्था माझ्या अंतःकरणासारखीच असते. परंतु बाह्यांगाने तू माझ्यापासून वेगळा असल्यामुळे माझ्याकडे, माझ्या सृष्टीकडे आणि स्वतः स्वतःकडेही तू वेगळेपणाने पाहू शकतोस, त्याचा वेगळेपणाने अभ्यास करू शकतोस आणि त्याचा ध्यास धरून योग्य बाह्यउपचाराने त्यांची आंतरिक ऐक्यता पुन्हा साधून देऊन त्याचा आनंद स्वतःही तू अनुभविता होतोस. तुझा हा ऐक्यभावातील भक्तिभावच मला अत्यंत आनंदित करीत असतो.

तेव्हा हे नारदा, अशा तऱ्हेने भूतलावर अवतीर्ण होण्याचा माझाही आता निश्चय झाला आहे. तू म्हणतोस त्याप्रमाणे सामान्य अवस्थेतील जीवांशी जवळीकता साधून त्यांच्या ठिकाणी माझ्या अस्तित्वाचे भान निर्माण करावे, माझ्या प्रेमाची जाण त्यांच्या ठिकाणी निर्माण करावी आणि माझ्या भेटीची ओढ त्यांना लावावी, हाच सध्याच्या परिस्थितीतील एकमेव उपाय आहे असे दिसते. माझ्या नियतीत पुढे काय व कसे घडणार आहे हे मलाही ठाऊक नाही. त्यामुळे माझ्याकडून प्रगटणारी माझी लीला पाहण्यासाठी व तिचा आनंद अनुभवण्यासाठी मी स्वतःही तुझ्याएवढाच आतुर आहे.''

हे लक्ष्मी, असे उत्स्फूर्तपणे बोलून हा नारायण एकदम स्तब्ध झाला. त्याचे विशाल व विलोभनीय नेत्र त्याने त्याच्या कोमल व नाजूक पापण्यांनी झाकून घेतले आणि क्षणार्धात तो देहभान विरहीत अवस्थेला पावला. त्याच्या भावपूर्ण व रमणीय रूपाला मी माझ्या नेत्राद्वारे हृदयात पूर्णपणे भरून घेतले. दोन्ही कर जुळवून त्याला भक्तिभावपूर्वक वंदन करून मीही माझे नेत्र मिटून घेतले. अशा माझ्या अवस्थेत किती काळ गेला याचे मलाही भान नव्हते, वा जाण नव्हती. परंतु काही काळानंतर माझे नेत्र सहजपणे उघडले गेले, तो दृष्टीसमोर आता नारायणाची प्रत्यक्ष मूर्ती नव्हती. मी थोडासा चकितच झालो. पण क्षणभरच! माझ्या अंतरात मात्र मी सावध अवस्थेत होतो. त्यामुळे लगेचच माझ्या लक्षात आले की नारायणाने भूतलावर अवतार घेतलेला आहे. या जाणिवेने माझ्याही अंतःकरणातील नारायणाविषयीचा भक्तिभाव दाटून आला. माझी आंतरिक अवस्था नारायणाविषयीच्या प्रेमाने फुलून राहिली व सर्व इंद्रियांसह देहही रोमांचित होऊन राहिला.''

त्या प्रसंगातील स्वतःच्या अवस्थेचे वर्णन करताना आताही नारदाची अंतर्बाह्य अवस्था तशीच होऊन राहिली होती. लक्ष्मीच्या हे लगेचच दृष्टीस आले व तिला ती अवस्था जाणवलीही. नारायणाच्या भक्तिभावाने भावपूर्ण झलेले नारदाचे अंतःकरण मोकळे होण्यासाठी हीच वेळ योग्य आहे हे लक्ष्मीनेही जाणले. आणि म्हणून नम्रतापूर्वक नारदाच्या चरणांना वंदन करून तिने प्रेमाने आपले दोन्ही कर जोडले व नारदाला उद्देशून बोलू लागली.

''हे नारायणप्रिय नारदा, त्या वेळचे नारायणाचे बोलणे व त्याची अवस्था खरेच अगदी आगळी वेगळीच होती हे निश्चित. त्यामुळे त्यावेळी नारायणाची अद्भूत अशी लीला प्रगट झाली असणार याची तर मला पूर्ण खात्री आहे आणि तीच श्रवण करण्याची माझी उत्कंठा वाढतच आहे. हे नारदा, मागच्या तुझ्या भेटीत तू मला नारायणाच्या रामावताराचे चरित्र त्यातील रहस्यासहित अत्यंत भक्तिभावाने वर्णन करून सांगितले होतेस. मीही ते तेवढ्याच प्रेमाने व श्रद्धेने श्रवण केले होते. त्याचे फळ मला मिळाले, म्हणजेच माझ्या ठिकाणीही नारायणाविषयी भक्तिभाव निर्माण झाला. त्याचे माहात्म्य व त्याची अंतःकरणाची प्रेमस्वरूप अवस्था, माझ्या अंतरात त्या रामचरित्राच्यारूपे कायमची ठसून राहिली आहे. त्यावेळेस नारायणाने अवतार घेऊन लोप पावत असलेल्या गुरुशिष्य परंपरेचे व त्याद्वारे आत्मधर्मप्राप्तीच्या मार्गाचे पुनरुज्जीवन करून त्याला संजीवन द्यावे, असा ध्यास अनेक ऋषिमुनींनी धरला होता. तसाच संकल्प या नारायणाच्या ठिकाणीही निर्माण झाला आणि त्याची पूर्ती त्याने रामावतार धारण करून केली.

परंतु हे नारदा, या वेळेस मला एक गोष्ट विशेषत्त्वाने लक्षात आली आहे, की नारायणाने भूतलावर अवतार घेऊन सामान्यातील सामान्याशीही जवळीकता साधावी असा ध्यास तुझ्याच ठिकाणी निर्माण झाला होता व तोच संकल्प नारायणाने धरून त्याची पूर्ती त्याने लगोलग केली. तेव्हा या वेळेस कोणत्या कार्याची अपेक्षा तुझ्या ठिकाणी या नारायणाकडून होती? त्या अपेक्षेची पूर्ती या नारायणाने यशस्वीरीत्या केलीच असणार. परंतु ती कशी व कोणत्या प्रकारे केली याचा समग्र इतिहास सविस्तरपणे श्रवण करण्याची आतुरता मला लागून राहिली आहे. त्या कृष्णचरित्रात रामावताराप्रमाणे माझा व या शेषाचाही सहभाग निश्चितपणे असणार याचीही मला खात्री आहे. तरी हे नारदा, आता जराही विलंब न लावता तू मला या नारायणाचे ते कृष्णचरित्र अगदी सर्व सर्व असे सांगावेस अशी तुझ्या चरणी नम्रपणे प्रार्थनाच करते.''

लक्ष्मीच्या बोलण्याने संतुष्ट झालेला नारद अधिकच उत्तेजित झाला आणि लक्ष्मीचे कौतुक करीत बोलू लागला, ''हे श्रवणभक्तिपरायण लक्ष्मी, तुझ्या अंतरात रामावताराचे माहात्म्य पूर्णपणे ठसलेले आहे याचा मला अतिशय आनंद होत आहे. कारण तेच तर तुझ्या श्रवणभक्तिचे फळ आहे. परंतु एक गोष्ट पूर्णपणे लक्षात ठेव, की कृष्णचरित्र श्रवण करताना रामचरित्रात व कृष्णचरित्रात तुला निश्चितपणे व केवढातरी बाह्यांगाने फरक जाणवेलही. पण त्याचवेळी तू सावधचित्त रहाणे अत्यंत आवश्यक आहे. या दोन चरित्रांची तुलना जर तुझ्या मनात कळत नकळतपणे होऊ लागली तर तुझ्याकडून योग्य प्रकारे श्रवण घडणार नाही व खऱ्या श्रवणानंदाला तू मुकशील. कारण एकाच नारायणाची ही दोन भिन्न चरित्रे वेगळ्या वेगळ्या काळी वेगळ्या वेगळ्या कार्यासाठी जरी प्रगट झाली, तरी त्याचे मूळ कारण एकीएकच होते. ते म्हणजे सर्व मानवांनी या नारायणाशी एकरूप होऊन ते ऐक्य अनुभवावे. आणि हेच नारायणाच्या सर्व अवतारचरित्रांचे एकमेव माहात्म्य आहे. तेव्हा याच भूमिकेने तुझ्याकडून श्रवण घडले तरच ते श्रवण भक्तिभावाचे होईल व तुला खऱ्या आनंदाचा अनुभव देते होईल.

हे लक्ष्मी, रामचरित्र व कृष्णचरित्र यात केवढातरी फरक तुला बाह्यांगाने नेहमीच जाणवत राहील. पण त्यातील सामान्यांच्या उद्धाराचे व कल्याणाचे समान सूत्र तू लक्षात ठेवशील तर तुला त्या भिन्न चरित्रांची योग्य सांगडही कळेल व नारायणाच्या लीलेची ही अद्भूतता तुला अतिशय आनंददायी ठरेल. तेव्हा हे लक्ष्मी, आता खऱ्या अर्थाने, म्हणजे भक्तिभावाने, श्रवणाला सादर हो.

हे लक्ष्मी, मी तुला सांगितल्याप्रमाणे नारायण भूतलावर प्रगट होण्यासाठी सिद्ध झाला होता. त्यासाठी मथुरा नगरीतील अत्यंत पुण्यवान दांपत्य वसुदेव व देवकी यांच्या पोटी जन्म घेण्याचा संकल्प त्याच्या ठिकाणी स्वयंप्रेरणेने निर्माण झाला. त्यावेळेस वसुदेव व देवकी मथुरेचा राजा कंस याच्या बंदिवासात होते. वास्तविक देवकी ही कंसाची सख्खी बहीण होती. परंतु 'देवकीच्या पोटी येणारा आठवा पुत्र तुझा मृत्यूदाता होईल' अशी भविष्यवाणी वसुदेव-देवकीच्या विवाह प्रसंगीच वर्तविली गेली होती. त्यामुळे कंस हा भीतीने तर कंपित झालाच, पण त्याच्या ठिकाणी देवकीविषयीच क्रोध निर्माण झाला. संतापाच्या भरात तो देवकीचाच वध आपल्या तलवारीने करावयास सज्ज झाला. परंतु वसुदेवाने त्याची अनेक प्रकारे समजूत घालून विनवणी केली आणि देवकीचा आठवा पुत्र कंसाच्या स्वाधीन करण्याचे वचन कंसाला दिले. तेव्हा कंसाने देवकीवर दया केली खरी, पण त्या उभयतांवरील अविश्वासाने त्यांना बंदीवासात बद्ध करून ठेवले.

खरे तर, देवकीच्या आठव्या पुत्राकडून कंसाला मृत्यूचे भय होते. परंतु संशयाने पछाडलेल्या कंसाने देवकीच्या पोटी जन्मलेल्या आधीच्या सातही पुत्रांचा जन्मतःच वध केला व आठव्या पुत्राची तो भयग्रस्त होऊन वाट पहात होता. आणि, असा हा देवकीचा आठवा पुत्र म्हणून कंसवधाच्या निमित्ताने जन्म घेण्यासाठी नारायण देवकीच्या उदरात प्रवेश करता झाला.''

श्रवणासाठी हळूहळू सिद्ध होत असलेली लक्ष्मी नारदाच्या सुरुवातीच्या वर्णनानेच विस्मय पावू लागली आणि न राहवून उद्गारली,

''हे नारदा, तुझ्या या चरित्रवर्णनाची सुरुवात तर अगदी चित्तथरारक पद्धतीनेच झाली आहे. कंसाचा होणारा वध काय आणि तोही देवकीच्या आठव्या पुत्राच्या हातून, वसुदेव-देवकीचा बंदीवास काय, कंसाचे भीषण असे क्रूरकर्म काय, सर्वच अगदी थरारक, पण मनाला उदासिनता आणणारेच आहे. खरे तर, नारायणाचा अवतार भूतलावर होणार म्हणजे किती आनंददायी प्रसंग! त्यासाठी कसे सर्वत्र शुभकारक व मंगलमय वातावरणच हवे. सर्वांठायी कसा उत्साह व जल्लोष हवा. पण येथे तर सर्वच विपरीत दिसत आहे. अशा परिस्थितीत या नारायणाला तेथे अवतार घ्यावासा वाटला तरी कसा? मला तर काही कारण दिसत नाही, उलट नवलच वाटत आहे.

मुळात वसुदेव व देवकी यांनी असे काय मोठे पुण्यकर्म केले होते की त्याचे फळ म्हणून हा नारायण त्यांच्या पोटी जन्म घेण्यास एवढा तयार झाला? बरे पुण्य म्हणावे, तर त्यांच्याकडून तसेच काहीतरी पापही घडले असणार, की ज्यामुळे त्यांना त्यांच्या एक नव्हे, दोन नव्हे, तर सात पुत्रांच्या हत्येचे केवढे तरी दुःख सहन करावे लागले. त्या वसुदेवाला आणि विशेषतः देवकीला किती क्लेश व यातना झाल्या असतील, या नुसत्या कल्पनेनेच माझ्या मनाचा थरकाप उडत आहे, तर त्या बिचाऱ्या देवकीला काय झाले असेल? मला तर त्याची कल्पनाच करवत नाही. आणि त्यातून पुन्हा हा आठवा पुत्र येऊ घातला होता! त्याने तर देवकीच्या आधीच्याच मनोक्लेशात आणखीनच काळजीची भर पडली असणार. जन्माला आलेल्या आपल्या पोटच्या गोळ्यांना आपल्या हातानेच दूर करून मृत्यूच्या दाढेत ढकलायचे आणि तेही जाणून बुजून! खरेच, असा प्रसंग कोणावरही कधीही येऊ नये. हे नारदा, माझ्या मनात सुरुवातीपासूनच येणाऱ्या या उदासिनतेने माझ्या सर्व मनाला ग्रासून टाकण्याच्या आधीच ती मुळापासून दूर कर. तरच पुढील श्रवणाला माझे मन उत्साहाने तयार होईल.''

लक्ष्मीच्या मनःस्थितीची पूर्ण कल्पना नारदाला होती. म्हणूनच लक्ष्मीच्या मनाला उत्साहवर्धक असे बोल तो बोलू लागला.

''हे लक्ष्मी, तुझ्या मनातील कळवळा मी समजू शकतो. विशेषतः देवकीच्या विषयीची तुला वाटणारी कणव योग्यच आहे. तिच्यावर गुदरलेला घोर प्रसंग खरोखरीच कोणाच्याही सहनशीलतेच्या पलीकडचाच होता. परंतु तो प्रसंग वसुदेवासाठीही तेवढाच कठीण होता हेही खरेच आहे. कारण देवकीला रक्षण देण्याची व तिचे मनोबळ राखण्याची जबाबदारीसुद्धा वसुदेवाचीच होती. म्हणूनच तर त्याने स्वतःची सर्व मुले जन्मतःच कंसाच्या स्वाधीन करण्याचे वचन कंसाला देऊन देवकीचे प्राण वाचविले होते. एवढेच नव्हे, तर प्रत्येक वेळी नवीन मूल जन्माला आल्याबरोबर तो लगेचच स्वतः ते मूल कंसाला नेऊन देत असे. यासाठी खचितच केवढे तरी मनोधैर्य लागते यात शंका नाही. तसे धैर्यबळ वसुदेवाकडे होते कारण तो स्वतः अत्यंत पुण्यवान व सदाचारी होता. त्या सदाचाराचेच फळ म्हणून एवढे बळ वसुदेवाला प्राप्त झाले होते.

मागील जन्मातही वसुदेव व देवकी पती-पत्नीच होते. त्यावेळेस त्या उभयतांनी अनेक व्रत-वैकल्ये व उपासना करून नारायणाला प्रसन्न करून घेतले होते. त्यावेळेस या नारायणाने दिव्यरूप धारण करून त्या उभयतांना दर्शन दिले होते व वर मागण्यास सांगितले होते. त्यावेळेस त्यांना सर्व सुखे प्राप्त असूनही संततीसुखाची कमतरता जाणवत होती. म्हणून त्या उभयतांनी नारायणाकडे 'हे नारायणा, तुझ्यासारखाच सर्वगुणसंपन्न व सुस्वरूप असा पुत्र पुढील जन्मी आमच्या पोटी यावा' अशी प्रार्थना केली होती. स्वतः सर्व सुखाच्या परता असलेल्या नारायणानेही त्या उभयतांना सुखविण्यासाठी 'तथास्तु' म्हणून आश्वासन दिले होते व तो अंतर्धान पावला होता.

हे लक्ष्मी, ज्यावेळेस नारायणाने वसुदेव व देवकी यांच्या इच्छेला 'तथास्तु' म्हटले त्याच वेळेस नारायणाच्या पुढील अवतारातील जन्म घेण्याचे स्थान व वंश यांची निश्चिती झाली. कारण 'नारायणासारखा पुत्र होईल' असे वरदान दिल्यावर त्यांच्या पोटी प्रत्यक्ष नारायणालाच जन्म घेणे भाग होते. कारण या सर्व विश्वात 'नारायणासारखा एकमेव नारायणच आहे' हे तर त्रिकालाबाधित सत्य आहे. त्या वरदानाचीच पूर्ती नारायणाने कृष्णावतारात वसुदेव-देवकीच्या पोटी जन्म घेऊन केली व आपले वचनपूर्ती करण्याचे ब्रीद राखले.

आता, वसुदेव व देवकी यांना कृष्णजन्माच्या आधी केवढे तरी दुःख ज्या अर्थी भोगावे लागले, त्या अर्थी त्यांच्याकडून कळत-नकळत म्हणा, अगर अज्ञानाने म्हणा, काहीतरी चुकीची व विपरीत कर्मे घडली असणार हे नक्कीच! कारण सामान्य मानवाने कितीही व्रतवैकल्ये, दाने, उपासना इत्यादी पुण्यकर्मे केली, तरी जोपर्यंत ज्ञानप्राप्तीने त्याचे अज्ञान नाहीसे होत नाही तोपर्यंत त्याच्याकडून अयोग्य कर्मे घडणारच. जोपर्यंत मानवाच्या ठिकाणचे या संसाराविषयीचे माया, मोह समूळ नाहीसे होत नाहीत, तोपर्यंत त्याच्याकडून सहजपणे दुष्कृत्येही घडू शकतात. नारायणाच्या नियतीनुसार त्याला या सर्व कर्मांची फळे ही भोगावी लागतातच. किंबहुना पाप व पुण्य समसमान झाली असताच मनुष्य जन्म प्राप्त होतो व त्यांची फळे मनुष्याला मिळत रहातात. त्याचबरोबर मानव योनीतच या पाप-पुण्यांच्या द्वंद्वातून व त्यांच्या कर्मफळातून कायमची सुटका होण्याची सुवर्णसंधीही मनुष्याला मिळालेली असते. योग्य ज्ञान प्राप्त करून तो पुण्यकर्म वाढवील व पापाचे फळ धैर्याने भोगून ते पाप संपवील, तर तो मानव उर्ध्वगतीला प्राप्त होऊन या नारायणाच्या अधिकाधिक जवळ येईल. त्यातूनही एखादा आत्मज्ञान प्राप्त करून अज्ञानाबरोबरच सर्व वासना त्यांच्या मुळासकट नष्ट करील, तर तो या नारायणाप्रत निश्चितपणे पावेल व त्याच्याशी एकरूप होईल.

पण त्याचप्रमाणे जर मानव पुण्यकर्म न करता केवळ पापकर्मातच वाढ करीत राहिला, तर या जन्मातच त्याच्या अधोगतीला सुरुवात होईल आणि तो या नारायणापासून अधिकाधिक दूर व विनाशाकडे घसरत राहील. आतापर्यंत अनेक जन्मातील साचलेल्या पाप-पुण्याची नोंद ब्रह्मदेवाने चित्रगुप्ताला ठेवावयास सांगितले आहे खरे, पण ती नोंद 'गुप्तच' आहे. त्याचा तपशील कोणालाच केव्हाही ठाऊक होत नाही. त्याचा हिशोब कोणालाही माहिती असत नाही. परंतु मानवाला प्रत्यक्ष अनुभवाला येणाऱ्या सुख-दुःखाच्या प्रसंगावरून त्याचा केवळ निर्देशच होत असतो. सूज्ञ ती खूण जाणून प्रयत्नपूर्वक सत्कर्म करीत रहातात, परंतु अज्ञ जीवांना मात्र अशी जाण असत नाही. अज्ञ हा मूढमती असल्यामुळे त्याला स्वतःहून तर जाण व जाग येत नाहीच, परंतु भाग्याने कोणी त्राता जरी त्याला भेटला तरी त्याच्यावर श्रद्धा बसणे अज्ञ जीवाला कठीण होते. त्यामुळे त्याच्या अधोगतीला कोणीही रोखू शकत नाही.

अशा अज्ञानी जीवांना त्यांच्या हितासाठी सांगितलेले ज्ञान कळू शकत नाही. त्यांच्या अल्प बुद्धीला ते ज्ञान जड जाणवते व ते पेलवताही येत नाही. त्या ज्ञानाचा काही बोध होणे तर मग दूरच राहिले. परंतु त्या जीवांना त्यांच्या सुखदुःखात सहभागी होणारे व त्यांच्या भावनांशी समरस होणारे प्रेम मात्र निश्चितपणे

कळू शकते. कारण त्या जीवांना त्याचीच खरी जरुरी वाटत असते. त्यांना निकडीची व तातडीची गरज आधाराची असते. त्या आधाराच्याच शोधात ते असतात. भाग्याने असा कोणीतरी 'लाभावीण प्रीती करणारा' त्राता त्यांना जर भेटला तर श्रद्धेने लागलीच ते जीव त्याचा आश्रय घेतात. असे सत्पुरुष विरळा असले तरी असतात मात्र निश्चित. फक्त त्यांची भेट होणे व त्यांना ओळखणे मात्र तेवढेसे सोपे नसते. भेट भाग्याने होते खरी, पण त्यांची खरी ओळखण त्यांच्या प्रेमाच्या सहवासाने, त्यांच्याशी श्रद्धेने संवाद केल्याने आणि निष्ठापूर्वक त्यांच्या चरणी राहून त्यांचे जीवन जवळून पाहिल्यानेच होऊ शकते. असे घडले तरच त्यांचे अंतःकरण ओळखता येते आणि त्यांच्या अंतःकरणाची ओळख हीच खरी त्यांची ओळखण होय. कारण 'ते म्हणजेच त्यांचे अंतःकरण आणि त्यांचे अंतःकरण म्हणजेच ते' हे त्यांचे वर्णन अत्यंत यथार्थ आहे. त्यांचे प्रेमस्वरूप अंतःकरणच त्यांच्या कृतीद्वारे, त्यांच्या शब्दाद्वारे, त्यांच्या दृष्टीद्वारे ओसंडून वाहत असते. त्या सर्वांगीण प्रेमाच्या सर्वांगाला झालेल्या स्पर्शानेच सामान्यांतील सामान्यांचाही उद्धार होतो आणि त्यांच्या आत्मकल्याणाचा मनाचा भक्तिमार्ग त्यांच्यासाठी खुला होऊन प्रगट होतो.

*****



# कृष्णजन्म

हे लक्ष्मी, वसुदेव व देवकीच्या पोटी त्यांच्या सर्व दुःखसंकटातून त्यांचे विमोचन करणारा असा त्यांचा भाग्यविधाता नारायणच कृष्णरूपाने अवतरला. या कृष्णावताराचे वैशिष्ट्य असे, की जन्मतःच त्याचे सामर्थ्य व पराक्रम प्रगट व्हायला सुरुवात झाली. नुकत्याच जन्मलेल्या कृष्णाचे विलोभनीय रूप पाहून देवकी तर हरखूनच गेली. कृष्णाचा शामल वर्ण, त्याचे किंचित कुरळे असलेले केस, काळेभोर पण विशाल नेत्र, लांबसर नासिका, नाजूक जिवणी आणि गुबगुबीत गोबरे गोबरे गाल हे सर्व पाहून देवकी अत्यंत हर्षभरित झाली आणि तिच्या ठायीचा वात्सल्यभाव दाटून नेत्राद्वारे वाहू लागला. त्या भावाच्या आवेगातच तिने त्या तान्ह्या कृष्णाला आपल्या हृदयाशी धरले. प्रेमाने कृष्णाचे मुख कुरवाळून त्याचे पुन्हा पुन्हा मुखावलोकन केले असता कृष्णाने आपले नेत्र उघडले व देवकीकडे पाहून स्मितहास्य केले. त्याच्या दोन्ही गालांना सुरेख व गोड खळ्या पडल्या. त्या इवल्याशा दोन खळ्यांमध्ये देवकीला तर सर्व सुखाचे सागरच गवसले. कृष्णाच्या त्या मनोहारी दर्शनाने देवकीचे तर देहभानच हरपले. पण थोड्याच वेळात तिला वस्तुस्थितीचे भान आले आणि परिस्थितीची जाणीव झाल्याने देवकी अत्यंत दुःखी झाली.

येथे वसुदेवाचीही मनःस्थिती देवकीप्रमाणेच झाली होती. कृष्णाचे अत्यंत निरागस, गोजिरवाणे पण तरीही अत्यंत तेजस्वी दिसणारे ते बालरूप पाहून वसुदेवही हर्षभरित झाला. कृष्णाच्या मंद व गोड हास्याने तोही अत्यंत सुखावला. पण त्यालाही वस्तुस्थितीची जाणीव झाली व त्याने स्वतःला सावरले. शांत मनाने व स्थिर बुद्धीने तो विचार करू लागला. एकीकडे त्याचे मन त्याने कंसाला दिलेल्या वचनाचे स्मरण त्याला करून देत होते, तर दुसरीकडे त्याचे मन त्या बाळकृष्णाला कंसाच्या हवाली करावयास तयार होत नव्हते. खरे तर, अशी त्याच्या मनाची स्थिती आधीच्या प्रत्येक वेळेसच होत असे. पण त्या प्रत्येक वेळेस त्याने मनाच्या भावनेवर बुद्धीच्या बळाने मात केली होती. प्रत्येक खेपेस त्याने देवकीच्या भावनांचा विचार करूनही तिच्या मनाला अत्यंत मरणयातना दिल्या होत्या व स्वतःही अनुभवल्या होत्या. कंसाला दिलेले वचन कोणत्याही परिस्थितीत पाळणे हाच आपला धर्म आहे अशी त्याची पूर्ण धारणा होती. त्या धर्माचे

पालन धैर्यबळाने करीत असताना त्याने त्याच्या मनाच्या दुर्बलतेवर जरी नेहमीच मात केली, तरी त्याच्या मनाला एक प्रकारची अपराधभावना सदैव कुरतडीत असे. त्याने त्याचे मन कित्येक वेळा रक्तबंबाळही होत असे. परंतु आपले दुःख व यातना देवकीला न सांगता व न दाखवता तो नेहमी त्या स्वतः स्वतःच सहन करीत असे. आतापर्यंतच्या निरागस व असहाय्य अशा तान्हुल्या जीवांच्या हत्येस आपणही कारणीभूत आहोत, हा विचार त्याच्या मनाला सतत सतावीत असे. दर खेपेस देवकीने भोगलेल्या शारीरिक व मानसिक क्लेशाला आपणच जबाबदार आहोत हा भाव तर त्याच्या मनाला सदैव पछाडीत असे.

पण आज पहिल्यांदाच त्या कृष्णाला कंसाच्या हवाली करण्यास वसुदेवाचे मन धजावेना. आज पहिल्यांदाच त्याला त्याच्या बाह्य धर्माचरणात सुप्त रूपाने लपून बसलेल्या अधर्माची जाणीव झाली व त्याची चीड आली. आज पहिल्यांदाच त्याला आपल्या मनाच्या दुर्बलतेची लाज वाटली. आज पहिल्यांदाच त्याला आपण देवकीवर जाणून बुजून केलेल्या अन्यायाची जाणीव झाली व त्याला स्वतःचाच अत्यंत राग आला. आपले व देवकीचे प्राण वाचविण्यासाठी आपल्याकडून किती बालजीवांची हत्या घडली गेली, त्या पापाचरणाच्या स्मरणाने त्याला अत्यंत पश्चात्ताप होऊ लागला. अशा पश्चात्तापदग्ध अवस्थेतच त्याने दोन्ही हात जोडून आपले नेत्र मिटले व जगन्नियंत्या परमेश्वराची तो कारुण्यभावाने आळवणी करू लागला.''

नारदाच्या बोलण्याचा परिणाम लक्ष्मीवर एवढा जबरदस्त होत होता, की तीच अत्यंत व्याकूळ झाली. श्रवणाने तिचेच मन अधिकाधिक बेचैन होऊ लागले. त्याच मनाच्या अवस्थेत ती नारदाशी बोलू लागली.

''हे नारदा, वसुदेव व देवकी यांच्यावर ओढवलेला प्रसंग खरेच अत्यंत विचित्र आहे. कारण त्या प्रसंगात एकाच वेळी सुखाचा व दुःखाचा भाव हे दोन्ही पराकोटीचे झालेले आहेत. एकीकडे कृष्णजन्माचा आत्यंतिक आनंद, तर दुसरीकडे कंसाच्या भीतीने त्याला दिलेल्या वचनानुसार कृष्णाला कंसाच्या स्वाधीन करणे, म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूच्या खाईतच कृष्णाला ढकलण्यासारखे होते. तेव्हा वसुदेव व देवकी यांची अगतिकता व झालेली केविलवाणी अवस्था खरोखरच करुणास्पदच आहे. त्यातूनही वसुदेवाच्या पश्चात्तापदग्ध अवस्थेचे तू केलेले वर्णन तर खरोखरीच हृदयस्पर्शी आहे. शेवटी कृष्णाचा जन्म झाल्यावर, त्याच्या मोहक रूपाच्या दर्शनाने का होईना, वसुदेवाच्या मनात सद्विचारांचा प्रादुर्भाव झाला आणि त्याला पश्चात्ताप झाला हे योग्यच झाले. परंतु त्या आधी ज्या बालकांची निर्घृण हत्या झाली त्यांचे काय? त्यांना त्यांचे जीवन थोडेच परत मिळणार होते? त्या बिचाऱ्यांचा अपराध काय? त्यांना त्यांच्या पापाचे फळ

मिळाले असे म्हणावे, तर एवढ्या थोड्याशा काळात रडण्याशिवाय दुसरे कर्म तरी त्यांच्याकडून काय घडले असणार? मग पाप तरी ते काय करणार? एवढ्या थोड्या काळाकरिता जन्म मिळण्यात तरी काय अर्थ आहे? खरेच काही वेळा काहीच सुचेनासे होते व मन सुन्न होऊन रहाते. 'ही सर्व या नारायणाची नियती आहे' हे ज्ञान जरी बुद्धीला असले, तरी मनाला मात्र ते कळत नाही व कळले तरी मुळीच मानवत नाही.

परंतु हे नारदा, वसुदेवाने परमेश्वराची आळवणी सुरू केली असे जे तू शेवटी सांगितलेस ते ऐकून मलाही जरासे बरे वाटले. कारण शेवटी सत्ता त्या सर्वव्यापी परमेश्वराची म्हणजे या नारायणाचीच आहे हे सत्यच आहे. तेव्हा त्या परमेश्वरी सत्तेत काय घडले हे तू कृपा करून मला सांग. ते ऐकण्यासाठी माझे मन अत्यंत आतुर आहे. कारण त्या श्रवणानेच माझ्या मनाची उद्विग्नता जाईल व या नारायणाच्या कृष्णरूपातील लीलेचा आनंद माझ्या मनाला अनुभवता येईल. कृष्णावतार झाला म्हणजे आता सर्व व्यवस्थित व सुरळीत झाले असणार हे तर नक्कीच! काहीतरी चमत्कार घडला असणार हे मी अगदी खात्रीपूर्वक सांगते. असा काय पराक्रम त्या कृष्णाकडून घडला की त्याने स्वतःची व आपल्या मातापित्यांची सुटका कंसाच्या कारागृहातून करून घेतली? हे सर्व सर्व तू मला आता त्वरित व विस्तारपूर्वक सांग अशी मी तुला प्रेमपूर्वक विनवणी करते.''

लक्ष्मीचे बोलणे लक्षपूर्वक ऐकणारा नारद लक्ष्मीचे बोलणे थांबल्यावरही बराच वेळ स्वस्थच होता. कारण तोही साहजिकच अंतर्मुख झाला होता. अत्यंत सखोल विचारात तो मग्न झालेला आहे अशी त्याच्या मुखावरील भाव पाहताना खात्रीच होत होती. परंतु थोड्याच वेळात त्याच्या मुखावरील भाव बदलले व त्या ठिकाणी निश्चयात्मकता व सहजता दिसू लागली. शांतपणे एकेक शब्द उच्चारीत तो सावकाशपणे लक्ष्मीशी बोलू लागला.

''हे लक्ष्मी, मला एक गोष्ट निश्चितपणे माहीत आहे, की श्रवण करीत असताना तुझ्या मनात काही प्रश्न निर्माण होत असतातच. परंतु माझ्या बोलण्यात व तुझ्या श्रवणात खंड पडू नये म्हणून तू त्या त्या वेळेस ते प्रश्न विचारीत नाहीस. परंतु ते प्रश्न तुझ्या मनात घर करून बसलेले असतातच. मग अशा अनेक प्रश्नांच्या अनेक घरांची दाटी तुझ्या मनात झाली, की तुझ्या मनातील भिंतीवरील दबाव वाढू लागतो व तुझ्या मनाला साहजिकच ताण जाणवू लागतो. तो ताण असह्य होऊ लागला, की आणखीन एखाद्या प्रश्नाचे निमित्त होऊन मनातील भिंती कोलमडतात व त्यातील अनेक प्रश्नांनी केलेली सर्व घरे कोसळून पडतात.

मग एकामागून एक सर्व प्रश्नांची माळच फुटल्यासारखी होऊन प्रश्नांची एक मोठी मालिकाच सटासट बाहेर येऊ लागते. असो, तू विचारलेले सर्व प्रश्न मात्र योग्यच आहेत आणि त्याची उत्तरे विचारपूर्वक देणे आवश्यकच आहे. तेव्हा तुझ्या प्रत्येक प्रश्नाचे उत्तर क्रमवारीने सांगतो, ते नीट लक्षपूर्वक श्रवण कर व या सर्वांमागील सत्य जाणून घेऊन त्याचा पुन्हा एकदा निश्चय कर, म्हणजे तुझे मन पुन्हा मोकळे होईल व सगुण प्रेमाने भरून राहील आणि या नारायणाच्या सगुण चरित्राचा श्रवणानंद घेण्यास तू सादर होशील.

हे लक्ष्मी, तू म्हटल्याप्रमाणे वसुदेव व देवकी या उभयतांच्या जीवनात अत्यंत कठीण प्रसंग आला होता हे खरेच आहे. बाह्यांगाने पाहिले तर कृष्णाचा जन्म हाच त्या प्रसंगाला कारणीभूत होता असे दिसते. परंतु त्या कृष्णामुळेच त्या प्रसंगातून पार पडण्याचा मार्ग त्यांना दिसला आणि त्या मार्गाने जाण्याचे मनोबळ व धैर्यही त्यांना कृष्णामुळेच प्राप्त झाले. हा झालेला सर्व सुपरिणाम कृष्णरूपाच्या प्रभावामुळेच होता. अत्यंत रमणीय, सुरेख व चित्ताकर्षक असे ते कृष्णरूप सामान्याच्या मनाला तर मोहविणारे होतेच, परंतु अगदी दुष्टातील दुष्टालाही भूल पाडणारे होते. नारायणाने स्वसंकल्पाने धारण केलेले ते अद्‌भूत रूप ब्रह्मदेवाने निर्माण केलेल्या सृष्टीतील जणु नव्हतेच. हे लक्ष्मी, पण एक गोष्ट लक्षात ठेव, नारायणाच्या सत्य-संकल्पातून रूपाला आलेले त्याचे सत्यस्वरूप हे साहजिकच सद्‌भावाला निर्माण करणारे व प्रेरणा देणारे असेच असणार आणि कृष्णाच्या रूपाने अगदी तसेच झाले होते. मग वसुदेवाच्याही बाबतीत तसे घडले यात नवल ते काय?

अगं, मुळात वसुदेव व देवकी हे पुण्यवान, पापभीरू व सत्त्वशील असेच दांपत्य होते. तेव्हा सद्‌विचार व सदाचार हा तर त्यांच्या जीवनाचा स्थायीभावच होता. पण त्याचप्रमाणे त्यांचेकडून कळत नकळत घडलेले दुष्कृत्यही त्यांच्याबरोबर होते हेही लक्षात ठेवले पाहिजे. साहजिकच सत्कृत्य हे मनोबळ वाढवित असते, तर दुष्कृत्य मनाचे बळ खच्ची करीत असते. मनाच्या दुर्बलतेमुळे त्यांना कंसाची भीती वाटणे हे तर सहजच आहे आणि कंसाची भीती म्हणजे काय, तर साक्षात मृत्यूचीच भीती! मरणाची कल्पना ही सर्वसामान्यांना भिववीतच असते. कारण ते तर प्रापंचिकच असतात. परमेश्वराविषयी श्रद्धा व भावना त्यांच्या ठिकाणी निश्चितपणे असते. परंतु त्याचा उद्देश परमेश्वराकडून रक्षण व आधार मिळावा एवढाच मर्यादित असतो. परमेश्वराच्या भक्तिनेच देहाचे ममत्व व मोह नाहीसे होतात व त्यामुळे निर्भयता प्राप्त होते हे खरेच आहे. पण अशी अपेक्षा सामान्यजनांकडून एकदम सुरुवातीलाच धरणे हे योग्य ठरणार नाही. परंतु

मानव जन्मात अशी प्रेमाने भक्ती करण्याची संधी त्यांना नारायणाच्या अवतारामुळे प्राप्त होते आणि कृष्णावतारात तर अशी सुवर्णसंधी सामान्यांनाही मिळून त्यांच्या भक्तिची सोयच कृष्णरूपाने झाली. त्या संधीचे सोने कोणी कोणी केले हा एक वेगळाच इतिहास आहे. परंतु तो इतिहास कृष्णचरित्रातच सामावलेला असल्यामुळे त्याचे वेगळेपणाने वर्णन करणे शक्य होणार नाही व आवश्यकही ठरणार नाही.

हे लक्ष्मी, एक गोष्ट लक्षात ठेव की वसुदेवाला केवळ स्वतःच्याच मृत्यूची भीती नव्हती, तर मुख्यत्वे देवकीच्या मरणाचीही भीती व आत्यंतिक काळजी त्याच्याठायी होती. तशी ती असणे अगदी साहजिकच होते. देवकीला संरक्षण देणे हे तर पती या नात्याने त्याचे प्रथम कर्तव्यकर्म होते. त्यामुळे देवकीचेही प्राण वाचविण्यासाठी त्यांची नवजात अर्भके अत्यंत नाईलाजाने व स्वतःच्या अंतःकरणावर दगड ठेवूनच त्याला कंसाच्या हवाली करावी लागली. बाह्यांगाने त्याचे कृत्य जरी कितीही निर्दयी व निष्ठुर दिसले तरी वसुदेवाची झालेली अगतिकताही लक्षात घेतलीच पाहिजे. स्वतःच्याच पोटी जन्माला आलेल्या कोवळ्या व निष्पाप जीवांच्यापेक्षा देवकीच्या जीवाला मृत्यूपासून वाचविण्याला प्राधान्य देणे त्याच्या दृष्टीने योग्यच होते. एवढेच काय, देवकीचे प्राण वाचविण्यासाठी त्याने वेळप्रसंगी स्वतःचेही प्राण खर्ची घालण्यास मागेपुढे पाहिले नसते. तेव्हा वसुदेवाच्या भूमिकेचे समर्थन जरी करता येणार नाही, तरी प्राप्त परिस्थितीत त्याच्या दुर्बल मनाकडून व अल्प मतीकडून घेतल्या गेलेल्या निर्णयाची कारणमीमांसा मात्र तुला जरूर माहीत असावी. कारण त्यामुळे तुझे मन वसुदेवाविषयी व त्याच्यासारख्या सामान्यांविषयी पूर्वग्रहाने दूषित होऊन न रहाता, त्यांच्याविषयीच्या सहानुभूतीसाठी नित्य मोकळे राहील.

अर्थात एक गोष्ट निश्चित आहे, की एखाद्याकडून कर्म जाणून-बुजून घडो, अगर नकळतपणे घडो, त्याचे फळ मात्र नियतीनुसार अटळ ठरते. जसे अग्नीवर पाय पडला असता तो पाय आत्यंतिक उष्णतेने भाजणारच व तोच पाय बर्फावर पडला असता तो आत्यंतिक गारव्याने गारठणारच! मग तो पाय मुद्दामहून ठेवलेला असो किंवा नकळतपणे पडलेला असो. आणखीन एक गोष्ट आहे, की कळत नकळत घडलेल्या दुष्कर्मांचा खऱ्या अर्थाने पश्चात्ताप झाला तर त्या तापात मनातील पापाची भावना जळून नाहीशी होते व ते मन शुद्ध व सबळ होते. त्यामुळे नियतीनुसार प्राप्त झालेली कर्मफळे भोगणे मनाला सुसह्य होते. त्यासाठी मनाची कशाहीविषयी तक्रार शिल्लक रहात नाही व कोणाहीविषयी राग उरत नाही. पण थोडावेळ शुद्ध झालेले

मन प्रापंचिक विचारांनी व विषयांच्या वासनेने पुन्हा मलिन होणार नाही याची काळजी घेणे व तशी सावधगिरी बाळगणे यासाठी ज्याचे त्याचे प्रयत्नच आवश्यक असतात.

हे लक्ष्मी, कंसाच्या क्रौर्याला बळी पडलेल्या त्या अत्यल्पायुषी बालकांविषयी तुला वाटणारी अनुकंपाही अगदी साहजिक व योग्यच आहे. परंतु या जन्मातील त्या बालकांचे आयुष्य नियतीत तेवढेच ठरलेले होते हे खरेच आहे. त्यामध्ये त्या बालकांचा काही अपराध होता किंवा नाही असा प्रश्नच निर्माण होत नाही. पण त्यांच्या पूर्वकर्मानुसारच तसे घडले हे निश्चित! त्या कर्मांची गणना वा तपशील मात्र कोणालाच ठाऊक असत नाही. एवढ्या थोड्या काळाच्या आयुष्यात त्यांच्याकडून काय कर्म घडले व ते काय जीवन जगले ही तुझी शंकाही बरोबर आहे. परंतु सूक्ष्मपणे विचार केलास तर एक गोष्ट तुझ्या लक्षात येईल, की त्यांच्या जन्माने व मृत्यूने त्यांच्या मातापित्यांना आत्यंतिक काळजी, भीती व दुःख याचा अनुभव देण्यासाठीच त्यांचे अल्पायुष्य कारणीभूत व निमित्तमात्र ठरले. परंतु त्याचबरोबर कृष्णजन्म होण्याचा मार्ग ते जीव मोकळा करीत गेले हेही खरेच आहे! त्या सत्कृत्याचे फळ त्या शापित जीवांना निश्चितच मिळाले. त्यांचा उद्धार होऊन ते पुढे सद्गतीस पावले हेच ते सुफल होय!

लक्ष्मी, आणखीन एक गोष्ट लक्षात ठेव, की नारायणाच्या संकल्पानुसार निर्माण झालेला हा सृष्टीचा खेळ जरी त्याच्या नियतीनुसार चालत असला, तरी त्या खेळाची नियमबद्धता जडसृष्टीला जेवढी बांधून ठेवते, तेवढी ती जीवसृष्टीला बांधून ठेवू शकत नाही हेही खरेच आहे. याला कारण म्हणजे जिवाच्या ठिकाणी असलेले मन हेच होय. सर्व जीवांच्या ठिकाणी जसे आत्म्याच्या रूपाने परमात्मतत्त्व आहे, तसेच त्यांच्या ठिकाणी मन हे एक अद्भूत तत्त्वही आहे. त्या मनाच्या रूपानेच आत्म्याचे चैतन्य मानवी देहात खेळत असते. खरे तर, ते मन हे आत्म्याचाच अंश आहे, त्याचेच चैतन्यरूप आहे. म्हणून जेव्हा ते मन आपल्या मूळ आत्मस्वरूपाच्या जाणिवेने या देहात वावरत असते तेव्हा नियतीच्या नियमात बद्ध राहूनही मोकळेपणाने खेळत असते. त्यावेळी ते मन सहजपणे आपल्या मूळ अस्तित्वाचा आनंद देहाच्या माध्यमाने उपभोगीत असते. परंतु तेच मन जेव्हा आपल्या मूळ आत्मस्वरूपाला विसरते आणि या देहालाच आपले अस्तित्व समजून देहाच्या सुखालाच आपले सुख मानू लागते, तेव्हा नियतीचे नियम बाजूला करून ते खेळू पहाते. नियमाला झुगारून देणारा त्या मनाचा मोकळेपणा स्वैरपणाकडे झुकतो आणि ते मन इंद्रियांना

अयोग्य कर्माकडे प्रवृत्त करते. मग त्या कर्माची फळे म्हणजे अनन्वित दुःखे या देहाला तर अनुभवावी लागतातच, पण स्वतः मनालाही आत्यंतिक क्लेश भोगावेच लागतात.

पण त्यातूनही भाग्याने एखाद्याच्या मनाच्या ठिकाणी त्याचे मूळचे शुद्ध व सात्त्विक संस्कार पुन्हा जागृत होतात आणि त्याला खरेच पश्चात्ताप होतो. त्या तापाने त्याचे मन पुन्हा शुद्ध होऊन सद्विचार करू लागते आणि इंद्रियांना सदाचरणाला प्रवृत्त करते. परंतु पश्चात्तापाने मन शुद्ध होत असतानाच आणखी एक गोष्टही होते. ती म्हणजे पूर्व कर्मांची व फळांची स्मृती मनाठायी कायम रहात असल्यामुळे मन दुर्बल होऊन रहाते. त्यामुळे मनात सुविचार येऊनही तसे आचरण करायला मन घाबरते. कारण आपले विचार खरेच योग्य व चांगले आहेत का याची शंका त्या मनात वारंवार येत रहाते. आणि हीच भीती त्या मनाला कमकुवत करते. अशावेळी खरे तर एखाद्या स्वानुभवी सत्पुरुषाचे मार्गदर्शनच हवे. परंतु सर्वांनाच सर्ववेळी असे मार्गदर्शन उपलब्ध असेलच असे नाही. म्हणून मग सर्वसामान्याच्या दृष्टीने त्याच्यासाठी एकच मार्ग शिल्लक रहातो. तो मार्ग म्हणजे जगन्नियंत्या परमेश्वराची आळवणी हाच होय. तो सर्वव्यापक परमेश्वर जरी कोणाला दिसत नसला, तरी त्याच्या अस्तित्वाविषयी सर्वसामान्याठायी श्रद्धा असते आणि त्याच्या सत्तेविषयी खात्री असते. त्याच श्रद्धेने व विश्वासाने परमेश्वराला आळविण्याच्या निमित्ताने एक गोष्ट मात्र निश्चितपणे घडते, की त्या आळवणीमुळे सर्वप्रथम मन स्थिर होते. नंतर हळुहळू मन शांत होऊन मनाच्या ठिकाणचे शुद्ध संस्कार व सद्विचार एकवटून येतात. त्यांचेच प्राबल्य मनाच्या ठिकाणी वाढते व मनातील सद्भाव तेवढा वेळ बलवान होतो.

हे लक्ष्मी, नेमकी अशीच अवस्था त्या वसुदेवाची कृष्ण जन्माच्या वेळी झाली होती हे आता तुझ्याही लक्षात येईल. त्यामुळे प्राप्त परिस्थितीतून योग्य मार्ग काढण्यासाठी हवे असलेले मनोबळ मिळविण्यासाठी वसुदेवाने परमेश्वराची आळवणी सुरू केली. इकडे देवकीची अवस्थाही वसुदेवासारखीच झालेली होती. तीही परिस्थितीने हतबल होऊन मनाचे सर्व बळ हरवून बसली होती. त्यामुळे वसुदेवाला परमेश्वराची आळवणी करताना पाहिल्यावर तिलाही तिच्या मनःस्थितीतून बाहेर येण्याचा मार्ग सापडला. तीही सहजपणे वसुदेवाच्या जवळ येऊन बसली. तिनेही आपले नेत्र मिटून घेतले आणि दोन्ही कर जोडून मनातल्या मनात अत्यंत काकुळतीला येऊन परमेश्वराला आळवू लागली. थोड्याच वेळात उभयतांच्या नेत्रांतून अश्रू ओघळू लागले. त्यांची मने भावपूर्ण झाल्याचेच ते लक्षण होते. त्यांच्या मुखावरचे भावही बदलत असल्याचे दिसू

लागले. तेथे आता भीतीचा लवलेशही दिसत नव्हता. आलेल्या संकटाला शरण न जाता त्याला धैर्याने सामोरे जाऊन त्या संकटातून मार्ग काढण्याचा निश्चय त्या उभयतांच्या मुखावर प्रतीत होऊ लागला. कुठल्याही परिस्थितीत कृष्णाला कंसाच्या स्वाधीन न करता, कृष्णाचे संरक्षण करण्याचा भाव त्यांच्या ठिकाणी दृढमूल होऊन राहिला.''

नारदाचे बोलणे श्रवण करता करता लक्ष्मीच सुखावत होती. तिच्या मनावर आलेला ताण थोडा थोडा कमी होत होता. तिच्या मुखावरही मंद स्मित दिसू लागले आणि ती एकदम नारदाला म्हणाली,

''अरे नारदा, खरेच, कमालच आहे! सर्व जीवांच्या रक्षणासाठी अवतरलेल्या या नारायणाला कृष्णावतारात जन्मतः स्वतःलाच संरक्षणाची जरुरी निर्माण व्हावी हे तर एक नवलच आहे! मला तर त्याची अगदी गंमतच वाटत आहे. पण ते असो. कृष्णजन्माच्या वेळच्या परिस्थितीचे गांभीर्य काही अजून जराही कमी झालेले नाही. त्यामुळे वसुदेव व देवकी यांना परमेश्वराच्या आळवणीने मनोबळ प्राप्त झाले हे योग्य व चांगलेच झाले. परंतु त्यांना निश्चित काय मार्ग सापडला? काय घडले व कृष्णाचे कंसापासून रक्षण कसे झाले हे सविस्तरपणे ऐकण्यासच मी आतुर आहे. कारण तेच खरे अत्यंत महत्त्वाचे आहे.

हे नारदा, मला तर अगदी पूर्ण खात्रीच वाटते, की त्या कृष्णाकडूनच काहीतरी चमत्कार निश्चितच घडला असणार. त्याचेच दैवी सामर्थ्य असे काही प्रगटले असणार, की बाह्य परिस्थितीची सर्व प्रतिकूलता नाहीशीच झाली असणार. कृष्ण स्वसामर्थ्याने तर कंसाच्या कारागृहातून सुटलाच असणार, पण त्याचबरोबर त्याने वसुदेव व देवकी यांचीही कंसाच्या बंदीवासातून नक्कीच सुटका केली असणार. होय ना? अगदी असेच घडले ना?''

लक्ष्मीच्या बोलण्यातील भावनेचे नारदाला जरी कौतुक वाटले, तरी भावना ही बहुत करून काल्पनिक असते व म्हणून दुर्बलच असते हे नारद जाणून होता. म्हणूनच लक्ष्मीच्या ठिकाणी असलेल्या कल्पनेचे लगेचच निरसन व्हावे या हेतूने नारद लक्ष्मीशी बोलू लागला.

''हे लक्ष्मी, तुझ्या ठिकाणी वसुदेव व देवकी यंच्याविषयीची जी आपुलकीची व सहानुभूतीची भावना आहे ती योग्यच आहे. मला त्याचे कौतुकही वाटते. परंतु त्या भावनेला योग्य समजाची जोड नसल्यामुळे त्यात अपुरेपणा आहे. तेव्हा आधी योग्य समज नीटपणे करून घे.

कृष्णाच्या रूपाने हा नारायणच आपल्या स्वसामर्थ्यानिशी प्रगट झाला होता हे खरे सत्यच आहे. परंतु ते सामर्थ्य कृष्णाकडून जन्मःच प्रगट होणे शक्य नव्हते. अर्थात, या नारायणाच्या बाबतीत जरी काहीच अशक्य नसले तरी तसे ते घडणे योग्य नव्हते. कारण त्यामुळे सामान्यांच्या ठिकाणी अवतारचरित्रांविषयी भ्रामक समजुती निर्माण होतात व त्यांच्या मनाची मुळातली दुर्बलता कायमच रहाते. अशा अवतारचरित्रांतील चमत्कारांच्या पुराणकथा ऐकून तसे चमत्कार आपल्या बाबतीतही घडावेत, अशी भावना त्यांच्या मनाठायी निर्माण होते आणि असे चमत्कार कधी तरी घडतील अशा कल्पनेच्या राज्यांतच सामान्य जीव वावरत रहातो. परंतु त्याचमुळे परिस्थितीची खरी जाणीव त्याला होतच नाही आणि त्यातून योग्य मार्ग काढण्याचे मनोबळही त्याला कधीच प्राप्त होऊ शकत नाही. मुळात कृष्णावताराचे प्रयोजनच मुळी 'सामान्यालाही संसारातून पार पडण्याचे धैर्यबळ मिळावे आणि ईश्वराची भक्ति करण्याचे मनोबळ लाभावे' हेच होते. नारायणाच्या ठिकाणी स्फुरलेल्या या मूळ संकल्पानुसारच कृष्णावतारातील कार्य घडायचे होते. त्यामुळे तेथे अशा बाह्यांगाच्या चमत्कारांना थारा नव्हता.''

नारदाचे बोलणे ऐकून चकित होत असलेली लक्ष्मी न राहवून मध्येच म्हणाली, ''अरे नारदा, मग या चमत्कारांना अस्तित्व आहे की नाही? कारण बऱ्याच वेळा या नारायणाचे सामर्थ्य प्रगट करणारे असे अनेक चमत्कार त्याच्याच सृष्टीत घडताना दिसतात हेही खरेच आहे ना? मग या चमत्कारांचे माहात्म्य आहे की नाही? त्यांचे काहीतरी महत्त्व असेलच ना? हे नारदा, कदाचित चमत्कारांविषयीचे हे माझे प्रश्नच तुला चमत्कारिक वाटतील. परंतु त्या प्रश्नांचे समूळ निरसन करून माझ्या मनात या नारायणाच्या सगुण चरित्राचे माहात्म्य यथार्थपणे ठसविण्याचा चमत्कारही तूच करून दाखवशील याचीही खात्री मला आहे. तेव्हा हा चमत्कार तू त्वरित करावास अशी विनंतीच मी तुला करते. नाहीतर माझ्या मनातील हा कल्पनेचा गोंधळ अधिक विचाराने अधिकच वाढत राहील आणि माझ्या मनाला अधिकाधिक चमत्कारिक वाटत राहील.''

लक्ष्मीचे बोलणे ऐकून नारद अत्यंत मोकळेपणाने हसला आणि लक्ष्मीला म्हणाला, ''हे लक्ष्मी, तुझे बोलणे ऐकून माझ्या मनाला मात्र अजिबात चमत्कारिक वाटत नसून, उलट गंमतच वाटत आहे. कारण 'चमत्कार' हा विषय तसा गूढच आहे. तो नीट कळला तरच ते गूढ उकलते आणि त्याचा आनंद होत रहातो. परंतु तो विषय जर योग्य प्रकारे आकलन झाला नाही, तर त्याची गूढता अधिकच वाढून मनाठायी त्याचा गुंताच होतो आणि मनाचा गोंधळही अधिकाधिक होत रहातो. तरीही मी तुला ते गूढ उलगडून सांगतो. नीट

लक्षपूर्वक श्रवण कर. कारण मी उलगडून दिलेले सूत्र तुलाच तुझ्या ठिकाणी धरून ठेवायचे आहे. आणि त्या सूत्राच्या आधारे तुझ्या मनातील गुंता तुलाच सोडवायचा आहे. एकदा का मनातील गुंता सुटला, की तो गुंता पुन्हा होऊ नये म्हणून श्रवण केलेला विषय तुलाच तुझ्या मनात सुसूत्रपणे बांधून ठेवावा लागेल. त्यामुळेच तुझ्या मनाचा पुन्हा केव्हाही गोंधळ होणार नाही आणि तुझ्या मनाला पुन्हा कधीही चमत्कारिकपणाचा अनुभव येणार नाही. तेव्हा मनःपूर्वक व सर्व व्यवधाने एकवटून श्रवण कर.

हे लक्ष्मी, मुळात चमत्कार म्हणजे तरी निश्चित काय? काय व कसे घडले म्हणून त्याला चमत्कार म्हणायचे? तसे पहायला गेले तर, नारायणाचे सृष्टीरूपाने प्रगटणे हाच एक चमत्कार नव्हे काय? आणि या सृष्टीतही 'मानव देह' हा तर एक मोठाच चमत्कार आहे. 'या मानवी देहाची रचना, त्या देहाकडून घडणारी कर्मे आणि मुख्य म्हणजे त्या देहात आत्म्याच्या रूपाने वास्तव्य करून असलेले या नारायणाचे अस्तित्व, ज्यामुळे त्या मानवी देहात चैतन्य संचार करीत असते', खरोखरी हे सर्व अद्भूतच नव्हे काय? आणि त्याहूनही अद्भूत म्हणजे आत्म्याचा अंश असूनही स्वतःला विसरलेले आणि देहालाच 'मी' म्हणून समजणारे असे 'मन' हे तत्त्व होय. हे मन जेव्हा देहालाच चिकटून रहाते, तेव्हा देहाकडून घडणाऱ्या कर्मांच्या फळांचा काल्पनिक अनुभव घेऊन सुखी अथवा दुःखी होते. जेव्हा त्या मनात सुख मिळाल्याची कल्पना निर्माण होते, तेव्हाही त्या सुखातील अपुरेपणाच्या व अशाश्वततेच्या जाणिवेने ते मन दुःखीच होते. आणि जेव्हा ते मन दुःखाच्या कल्पनेचा अनुभव घेते, तेव्हा निराशेच्या व उद्विग्नतेच्या भावनेने ग्रस्त होऊन अधिकच दुःखाच्या गर्तेत जाते.

तेव्हा हे लक्ष्मी, खरोखरी हे मनच अत्यंत चमत्कारिक आहे आणि हे मनच खरा चमत्कार करू शकते हेही खरेच आहे. कारण एकदा का त्या मनाला जाग येऊन आपल्या मूळ आत्मस्वरूपाची जाण आली व त्याविषयी प्रेम निर्माण झाले, की तेच मन देहाचा संग सोडून देते आणि आपल्याच मूळ स्वरूपाकडे वळते. त्याचेच आकर्षण व प्रेम मनाठायी निर्माण होते, त्याचाच ध्यास मनाला जडतो आणि मन व आत्मा यांचा खेळच सुरू होतो. खेळता खेळता मन अधिकाधिक आत्मप्रेमाने रंगू लागते व त्या मनाचा आत्म्याशी हळूहळू मेळ जमू लागतो. आणि एका क्षणी त्या मनाचे आत्म्याशी मीलनच होऊन रहाते. त्या प्रेमाच्या मनोमीलनातच मन हळुवारपणे विरघळत रहाते आणि आत्म्याशी सहजपणे ऐक्य पावून स्वानंदाच्या

अनुभवात नित्य रममाण होऊन रहाते. म्हणूनच या मनाकडून घडणारा हा अद्‌भूत चमत्कार हाच खरा चमत्कार आहे.

इतर सर्व चमत्कार या सृष्टीत नित्यच घडत असतात. पण मनाच्या आत्म्याशी एकरूप होण्याच्या चमत्कारापुढे ते सर्व चमत्कार अगदीच किरकोळ ठरतात. कारण मुळातच या सृष्टीत जेव्हा अशी एखादी गोष्ट घडते, की जी सामान्याच्या मनाच्या कल्पनेच्या व बुद्धीच्या आकलनशक्तिच्या बाहेर असते, तेव्हाच ती गोष्ट सामान्य जीवाला एक चमत्कार वाटते. आता सामान्य जीवांची कल्पनाशक्ति व आकलनशक्ति एवढी मर्यादित व कोती असते, की त्याला एखादी नियमाबाहेर घडलेली साधी गोष्ट ही चमत्कारच वाटते. तेव्हा चमत्कार ही कल्पना मनाच्या व बुद्धीच्या कुवतीशी निगडित आहे. म्हणून अशा चमत्कारांना जास्त महत्त्वच देता येत नाही. परंतु या सृष्टीत असे काही चमत्कार घडू शकतात आणि घडत असतातही हे मात्र खरे आहे. ज्यांच्या बाबतीत असे चमत्कार घडतात, ते त्यांचे योग्य महत्त्व ओळखतात, पण त्यांची वाच्यता करीत नाहीत. ज्यांच्या बाबतीत असे चमत्कार घडलेले नाहीत, त्यांना त्या बाबतीत तर्क व कल्पना करण्याचे आणि बोलण्याचे कारणही नाही. कारण त्यांना तसा अधिकारच नाही. मुख्य म्हणजे, अपवाद म्हणून घडलेल्या चमत्कारांचा अभ्यासही करता येत नाही किंवा ते चमत्कार पुन्हा घडावेत असा ध्यासही धरता येत नाही. परंतु दुर्बल मनाचा सामान्य जीव मात्र आशेने असा चमत्कार घडण्याची अपेक्षा बाळगत असतो आणि त्याच्या पदरी शेवटी दुःख व निराशाच पडते. तेव्हा हे लक्ष्मी, मन जेव्हा त्याच्या दोषाने, म्हणजे असद्‌भावाने युक्त होते, तेव्हा ते मन चमत्कारिकपणा करते आणि तेच मन जेव्हा त्याच्या गुणाने, म्हणजे सद्‌भावाने युक्त होते, तेव्हा ते मन चमत्कारही करून दाखवते हेच खरे!

असाच चमत्कार कृष्णजन्मामुळे वसुदेव व देवकी यांच्या मनाठायी घडला. कृष्णाच्या सुंदर व सात्त्विक रूपाच्या दर्शनाने त्यांचे मन तर मोहून गेलेच, पण त्या मनाठायीचे सात्त्विक भावही जागृत झाले हे महत्त्वाचे आहे. परंतु केवळ सात्त्विक भाव हा दुर्बल असल्यामुळे वेळप्रसंगी त्याचा प्रत्यक्ष काहीही उपयोग दुसऱ्यालाच काय, स्वतःलाही होऊ शकत नाही. वसुदेव देवकीच्या मनात मात्र कृष्णाविषयी आत्यंतिक प्रेम निर्माण झाले. या प्रेमाचे कारण सकृत्‌दर्शनी जरी पुत्रस्नेह असले, तरी तो प्रेमभाव कृष्णाविषयी असल्यामुळे त्यांचे मन एकदम सबल झाले. त्या मनाच्या ठिकाणची सर्व दुर्बलता व त्यातून निर्माण झालेली भिती

क्षणार्धात नाहीशी झाली आणि अतिशय कठीण प्रसंग येऊन ठाकला असताही, त्या प्रसंगात योग्य निर्णय घेऊन त्याची अंमलबजावणी करण्यास त्यांचे मन सज्ज झाले हाच सर्वात मोठा चमत्कार होय.''

नारदाने उकलून दाखवलेले चमत्काराचे गूढ श्रवण करून लक्ष्मीचे मन बरेचसे मोकळे झाले. विचारांच्या गोंधळाने निर्माण झालेला मनावरील ताण सैल झाला आणि तिला हलके हलके वाटू लागले. त्याच मोकळेपणाने ती नारदाला उद्देशून बोलू लागली.

''हे नारदा, मनाचा चमत्कारिकपणा आणि त्याच्याचकडून घडणारा चमत्कार याविषयीचे तुझे सांगणे अगदी स्पष्ट व यथार्थ आहे. त्यात जराशीही संदिग्धता नाही. त्यामुळे ते बुद्धीला सहज समजते व पटतेही. पण मनाचे मात्र पूर्ण समाधान होत नाही. कारण मनाला प्रत्यक्ष पुराव्याची आवश्यकता वाटत असते. प्रत्यक्षालाच मन प्रमाण मानत असल्यामुळे त्या मनाला प्रत्यक्ष घडलेल्या प्रसंगाचे वर्णनच मानवते व समजते. मनाच्या या स्वभावाला केवळ त्या मनाचा चमत्कारिकपणा असे म्हणून बाजूला करता येणार नाही हे तुलाही ठाऊक आहेच. तेव्हा हे नारदा, तू कृष्णजन्मानंतरचा घडलेला प्रसंग त्वरित सांगावास हेच बरे. कारण त्याच प्रसंगाद्वारे वसुदेव-देवकी यांच्या ठिकाणी निर्माण झालेले मनोबळ प्रगट झाले हे तर सहजच लक्षात येत आहे. तो प्रसंग केवळ बाह्यांगाने वर्णन न करता तू तो त्यातील रहस्यासहित प्रगट करणार हे तर नक्कीच आहे.''

लक्ष्मीच्या बोलण्याने नारदाला संतोष झाला. सगुण प्रेमातून वर आलेली सगुण चरित्र गाण्याची भक्तिभावाची ऊर्मी त्याच्या अंतःकरणात प्रकर्षाने निर्माण झाली मात्र, त्याचे सर्व अंतःकरणच प्रेमाने दाटून आले आणि त्यातून प्रवाहित झालेले सगुण प्रेम त्याच्या वाणीद्वारे दुथडी भरून वाहू लागले. त्याच प्रेमाच्या सखोलतेमुळे आलेल्या उत्कटतेने त्याचा शब्दौघ प्रगट होऊ लागला.

''हे लक्ष्मी, कृष्णकथा श्रवण करताना त्यातील प्रसंगांविषयी, प्रसंगातील व्यक्तींच्या वागण्या व बोलण्याविषयी आणि त्याही मागील भावाविषयी बोलणे, आणि तेही वेळच्या वेळीच, अत्यंत आवश्यकच आहे. परंतु त्याचबरोबर मूळ कथासूत्रही धरून ठेवणे तेवढेच जरुरीचे आहे हे लक्षात ठेव. कारण ते सूत्रच जर या सर्व बोलण्यातून हरवले तर ते सूत्र पुन्हा शोधून काढण्यातच केवढा तरी वेळ वाया जाईल आणि मूळ कथा ही पुढे जाणारच नाही. प्रसंगाच्या प्रवाहाद्वारेच कथा पुढे पुढे सरकत असते आणि कथेद्वारेच चरित्र

प्रगट होत असते. चरित्राद्वारेच अंतःकरणाची अवस्था जाणवत रहाते आणि या जाणिवेतूनच अवतारी पुरुषांचे माहात्म्य लक्षात येऊन त्यांच्या थोरवीची खात्रीच पटते.

तेव्हा वसुदेव व देवकी यांनी त्यांच्या त्यांच्या श्रद्धेप्रमाणे व त्यांच्या त्यांच्या भावनेनुसार परमेश्वराची आळवणी केली असता, त्या उभयतांची मने शांत व स्थिर झाली आणि त्यांचे त्यांनाच मनोबळ प्राप्त झाले. अश्रूंनी भरलेले नेत्र उघडून उभयतांनी एकमेकांकडे पाहिले आणि त्यांना प्राप्त झालेल्या भावबळाची त्यांची त्यांनाच खात्री पटली.

खरे तर, एखादे बालक जन्माला आल्यानंतर त्याच्या नैसर्गिक रडण्याच्या आवाजानेच त्याच्या जन्माची बातमी आजूबाजूच्या सर्वांना लागलीच कळते. परंतु कृष्णाचा जन्म हा हसतमुखानेच झाला. सर्वांना सुख, शांती व समाधान प्राप्त करून देण्यासाठीच त्याचे पुढील सर्व चरित्र घडणार होते, हेच जणु या प्रसंगातून सूचित होत होते आणि तसेच पुढे घडले हाही इतिहास आहेच!

*****



# कृष्णाची बंदीशाळेतून मुक्तता

आतापर्यंत नवजात बालकांच्या रडण्याच्या आवाजानेच कारागृहावरील पहारेकरी धावून येत असत आणि वसुदेवाला त्या बालकांना कंसाकडे घेऊन जाण्यास भागच पाडीत असत. वसुदेवही प्रामाणिकपणे कंसाला दिलेल्या वचनाला जागून त्या बालकांना कंसाच्या म्हणजे जणु साक्षात मृत्यूच्याच हवाली करीत असे. या वेळेस मात्र, नुकत्याच जन्मलेल्या कृष्णाच्या रडण्याचा आवाज कानावर न आल्यामुळे कृष्णाचा जन्म झाल्याचे पहारेकऱ्यांच्या लक्षातच आले नाही. परंतु मनोबळाने युक्त झालेला वसुदेव मात्र आता सावध झाला होता. त्याने ओळखले की त्याच्या हाताशी वेळ अत्यंत थोडाच होता. कृष्णाच्या सुरक्षिततेसाठी काहीतरी उपाययोजना त्वरित करणे अत्यंत आवश्यक होते. वसुदेवाने अंतर्मुख होऊन स्वतःशीच थोडावेळ शांतपणे विचार केला आणि त्याच्या अंतःकरणात अचानक एक ऊर्मी निर्माण झाली. त्याच्या प्रयत्नात खुद्द पहारेकऱ्यांनाच मदतीला घ्यावे असे त्याला एकाएकी वाटू लागले. त्याने आपला विचार देवकीला सांगितला असता देवकी तर चकितच झाली. तिचा विश्वासच बसेना व तिचे मन त्या गोष्टीला तयारच होईना. दुष्ट कंसाचे सेवक असलेल्या पहारेकऱ्यांकडून काही मदतीची अपेक्षा करता येईल, याची तिला कल्पनाही करता येणे अशक्य होते. संभाव्य परिणामाच्या विचारानेच तिचे मन भयभीत झाले. व्याकूळ नजरेने ती वसुदेवाकडे पाहू लागली असता वसुदेवाने तिच्याकडे आश्वासक दृष्टीने पाहून तिला धीर दिला आणि धैर्य धरून त्याने स्वतःहूनच पहारेकऱ्यांच्या कानावर कृष्णजन्माची बातमी घातली.

पहारेकऱ्यांना आत बोलावून घेऊन वसुदेवाने नवजात कृष्णाकडे अंगुलीनिर्देश केला असता, सर्व पहारेकरी आवेगाने पुढे सरसावले व कृष्णाच्या जवळ आले मात्र, कृष्णाच्या प्रसन्न व मंगलमय मुखकमलाच्या प्रथम दर्शनानेच ते सर्वजण स्तंभितच झाले. दुष्टातील दुष्टालाही त्याचे खलत्व विसरायला लावणाऱ्या आणि ज्ञान्यातील ज्ञान्यालाही दिङ्मूढ करणाऱ्या कृष्णाच्या त्या मोहक रूपाने ते पहारेकरीही मोहित झाले यात हे लक्ष्मी, नवल ते काय? कृष्णाच्या त्या बालरूपाला पाहून त्यांच्याही ठिकाणचा वात्सल्यभाव जागा झाला. त्यातील एका पहारेकऱ्याने तर त्या बाळकृष्णाला कौतुकाने उचलून आपल्याजवळ घेतले. परंतु पुढे घडणाऱ्या गोष्टींचा विचार त्याच्या मनात येताच त्याच्याही डोळ्यात पाणी तरारले. त्याच अवस्थेत त्याने बाळकृष्णाला देवकीच्या स्वाधीन केले असता देवकीने बाळकृष्णाला आपल्या हृदयाशी धरले आणि ती स्फुंदून रडू लागली. सर्वांचेच डोळे अश्रूंनी भरून आले आणि तेथील सर्वच वातावरण अत्यंत भावनिक झाले.

सर्वांच्या त्या अवस्थेत काही काळ गेला असता वसुदेव पुढे आला व त्या सर्वांनाच उद्देशून बोलू लागला, ‘‘हे सेवकांनो, तुम्ही कंसाच्या सेवेत आहात हे तर मी जाणून आहे. परंतु त्या आधी तुम्ही एक मनुष्य आहात हेही मी जाणतो. किंबहुना, आपण सर्वच जण प्रथम मनुष्य आहोत आणि नंतरच इतर काही आहोत. हे मनुष्यत्व हाच आपल्या सर्वांमधील एकमेव असा सामाईक दुवा आहे. त्याच एका सूत्राने आपण एकमेकांशी जोडलेले आहोत. आधी आपण मानव म्हणून जन्माला आलो आणि त्यानंतर इतर अनेक नाती व संबंध निर्माण झाले. या नातेसंबंधामुळे निर्माण होणारे माया, मोह, द्वेष, मत्सरादि विकार हे दोष आणि त्यातूनच निर्माण होणारी भीती यांनी आपण सदैव ग्रस्त असतो हे खरेच आहे. पण त्याचबरोबर मनुष्य जन्मामुळे प्राप्त झालेल्या मानवता, भावनिकता, कणव, परोपकारी वृत्ती या गुणांचे वरदानही आपल्याला लाभले आहे हेही सत्यच आहे. याच आपल्या मानवी गुणांना एकवटून त्यांचे बळ घेण्याची वेळ आता खरोखरीच आली आहे. या लहान अर्भकाला बघून जी मनाची भावना व अवस्था माझी व देवकीची झाली तीच तुमचीही झालेली आहे हे मला स्पष्टपणे दिसत आहे. त्यानेच मला धीर येत आहे आणि तुमच्याशी बोलण्याचे हे बळ मी घेत आहे.

तुम्ही जाणूनच आहात की तुमचा धनी, मथुराधिपती कंस हा मृत्यूच्या भीतीने ग्रासून गेला आहे. त्या भीतीपोटीच त्याच्या ठिकाणी आमच्याविषयी द्वेष व आत्यंतिक राग निर्माण झालेला आहे. एवढेच नव्हे, तर त्यामुळे तो केवढ्यातरी पापकर्मालाही प्रवृत्त झाला आहे. स्वतःच्या पूज्य पित्यालाही त्याने कारावासात बंदी करून त्याचे राज्य बळकावले आहे. आमच्या आतापर्यंत जन्मलेल्या सात अपत्यांची जन्मतःच हत्या करून त्याने केलेले महापापकर्म हे तर मानव जातीला काळिमा फासणारेच आहे. पशूही जेवढ्या खालच्या थराला जाणार नाहीत एवढ्या अधोगतीला हा कंस गेलेला आहे. त्याच्या पापकर्माची फळे ईश्वरी नियतीनुसार त्याला तर भोगावी लागणारच आहेत, पण आपलीही त्यातून सुटका नाही हे लक्षात घ्या. कारण आपणही कळत नकळतपणे त्याच्या या दुष्कर्माला सहाय्यभूत झालेले आहोतच याचेही स्मरण आपल्याला असू द्या.

जशी कर्मे तशी फळे हा ईश्वरी नियतीचा नियम सर्वांना म्हणजे सर्वांनाच लागू आहे. कोणालाही म्हणजे कोणालाही तो चुकलेला नाही. तेव्हा आपण वेळीच सावध होऊन या पापकर्मापासून आपल्याला तरी दूर करू या. कंसाला परावृत्त करणे तर आपल्याला शक्यच होणार नाही. परंतु आपले त्याच्या पापकर्माला सहाय्यभूत होण्याचे थांबवणे आपल्याला शक्य करता आलेच पाहिजे. आणि आपण तसे ठरवले तर

आपल्याला तसे निश्चितच करता येईल याची मला पूर्ण खात्री आहे. आपला तसा दृढ निश्चय मात्र झाला पाहिजे. त्या निश्चयानेच आपल्या ठिकाणचा सद्भाव एकवटेल व आपल्या मनाला धैर्यबळ प्राप्त होईल. त्या भावबळानेच आपल्याठायीच्या असद्भावाचे आपल्याला समूळ उच्चाटन करता येईल व आपल्याकडून काहीतरी सत्कृत्य घडेल. त्यानेच आपल्याकडून घडलेल्या पापकर्माचे थोड्या प्रमाणात का होईना, पण काहीतरी क्षालन घडेल आणि मन थोडेसे स्वच्छ होईल.

मनाच्या शुद्धतेशिवाय मनाला स्वस्थता लाभणे केव्हाही शक्य नाही हा अनुभव माझ्याप्रमाणेच तुमचाही असणारच याची मला अगदी खात्री आहे. कारण आपल्याकडून घडलेल्या दुष्कर्मांची सल आपल्या मनाला सदैव टोचत असते आणि मनाला अस्वस्थ करीत असते. त्यामुळे आपण बाहेरून कितीही शांत व समाधानी दिसलो, तरी मनातून नेहमी अशांत व असमाधानीच असतो हे आपल्यालाच ठाऊक असते. कारण त्या अवस्थेचा अनुभव आपणच घेत असतो. इतरांना ते कळणे अशक्य असले तरी समदुःखीच एकमेकांचे दुःख समजू शकतात व परस्परांच्या भावनेशी समरस होऊ शकतात हे खरे आहे. तेव्हा आमच्या या नवजात बालकाला कंसाच्या द्वारे मृत्यूच्याच हवाली करण्यातील आमचे दुःख तुम्हीही निश्चितच समजू शकाल याची मला खात्री वाटते. परंतु आता या बालकाला कंसाच्या तावडीतून सोडवून वाचवणे हे कोणत्याही परिस्थितीत अत्यंत आवश्यक आहे. त्यासाठीच्या माझ्या प्रयत्नांत मला तुम्ही सर्वतोपरीने सहाय्य करावे, अशी मी माझ्या वतीने, माझी पत्नी देवकी हिच्या वतीने आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे, या अर्भकाच्या वतीने तुम्हाला हात जोडून प्रार्थना करीत आहे.''

हे लक्ष्मी, वसुदेवाच्या या प्रभावी बोलण्याचा योग्य प्रभाव त्या पहारेकऱ्यांवर होत होता हे त्यांच्या मुखावरील बदललेल्या भावामुळे सहजपणे दिसत होते. त्यांच्यातील मुलभूत मानवतेला आणि तदनुषंगिक सात्त्विक भावाला साद घालणारे वसुदेवाचे वक्तव्य अपेक्षित परिणाम साधत आहे हे त्यांच्याकडे पाहिल्यावर लगेचच लक्षात येत होते. ते सर्व पहारेकरी एकमेकांकडे पुन्हा पुन्हा पहात होते. एकदा वसुदेवाकडे पहात व पुन्हा एकमेकांकडे पहात. परंतु कोणीच एक शब्दही उच्चारित नव्हते. सर्वांच्याच नजरेत वसुदेवाविषयीचा आदरभाव साठून राहिलेला मात्र पूर्णपणे दिसत होता. शेवटी त्यांच्यातील एका वयस्कर अशा मुख्य पहारेकऱ्याने या शांततेचा भंग केला आणि सर्वांच्या दृष्टीतून लाभलेल्या मूक संमतीने तो वसुदेवाला उद्देशून बोलू लागला.

''अहो वसुदेव महाराज, तुमचे बोलणे आणि त्यातील शब्द अन् शब्द अगदी खरा आहे. तुमच्या मनातील अवस्थेचे वर्णन करतानाच तुम्ही आमच्या सर्वांच्याच मनातील अवस्थेला प्रगट केलेले आहे. आमच्याही मनातील कंसाच्या भितीने एवढा प्रदीर्घ काळ दबून राहिलेल्या भावनांना तुम्हीच आज मोकळे केले आहे. त्यामुळे आमच्या मनावरील दबाव काही प्रमाणात तरी नक्कीच कमी झालेला आहे. केवळ आमचे व आमच्या कुटुंबीयांचे पोट भरण्यासाठी उपजीविकेचे साधन म्हणून या कंसाची आम्ही नाईलाजाने चाकरी करीत आहोत. केवळ तो आमचा धनी व आम्ही त्याचे सेवक या नात्याने वर्षानुवर्षे त्याचेच अन्न खाऊन आम्ही त्याचे जणू मिंधेच झालो होतो. परंतु आज मात्र तुमचे बोलणे ऐकून आम्हाला अगदी शरमिंधे वाटत आहे. कंसाच्या भयाने आम्ही आमचे स्वत्वच गमावून बसलो होतो. परंतु तुमच्या या बोलण्याने आमचे स्वत्व व सात्त्विक भाव पुन्हा जागे होत आहेत. आतापर्यंत कळत नकळत घडलेल्या पापकर्मांचे वेळीच प्रायश्चित्त घेण्याची जी संधी प्राप्त झालेली आहे, ती कोणत्याही परिस्थितीत साधणे अत्यंत आवश्यक आहे. कारण एकदा का आमचे पापाचे घडे पूर्णपणे भरले की आम्हाला या भूतलावर कोणीच वाचवू शकणार नाही याची आम्हाला जाणीव आहे. आपण सांगाल त्याप्रमाणे आपल्याला सर्वतोपरीने सहाय्य करण्याचे बळ आम्हाला निश्चितपणे घेता येईल. परंतु आमच्या मनोवृत्तीत झालेला हा बदल केवळ तुमच्या सांगण्यामुळे झाला नसून, त्याचे खरे व मूळ कारण हा नवजात बालकच आहे. त्याचे रमणीय व मनोहारी मुख आणि त्याचे प्रेमळ व निर्मळ हास्य याने तर आमचे मन पूर्णपणे मोहून गेलेच, पण आमच्या मनाची वृत्तीच पालटून गेली आणि ते मन सत्प्रवृत्तीकडे वळले हे अत्यंत महत्त्वाचे आहे. याचे सर्व श्रेय या सुंदर बालकालाच आहे.

तेव्हा काहीही झाले तरी आणि काहीही करून या निरागस व मनमोहक बालकाला कंसाच्या स्वाधीन न करता, त्याचे प्राण वाचवलेच पाहिजेत. हेच आपणा सर्वांचेच प्रथम कर्तव्यकर्म आहे. हाच आपला प्राप्त परिस्थितीतील स्वधर्म आहे असा आमचा विश्वास आहे. मग त्या कर्तव्य पालनासाठी भले आम्हाला आमचे प्राणही द्यावे लागले तरी बेहत्तर! ते आम्ही आमचे भाग्यच समजू. तो आम्हाला आमचा गौरवच वाटेल. कारण आमच्यासारख्या क्षुद्र जीवांपेक्षा या बालकाचे प्राण कितीतरी पटीने मूल्यवान आहेत. तेव्हा हे वसुदेव महाराज, आपण या बालकाच्या सुटकेची योजना त्वरित आखून ती ताबडतोब कार्यान्वित करावी. कारण फारच थोडा वेळ आपल्या हाताशी आहे. या बालकाच्या जन्माची बातमी अजूनही पसरलेली नाही तोपर्यंतच आपण कुशलतेने व चपळतेने कार्यवाही करणे अतिशय आवश्यक आहे.''

त्या पहारेकऱ्याचे सद्भावाचे व निश्चयात्मक बोलणे ऐकून वसुदेवाला परम संतोष झाला आणि त्याचा उत्साह अधिकच वाढला. पहारेकऱ्याचे बोलणे ऐकत असतानाच वसुदेवाच्या मनातील विचारचक्र चालूच होते आणि त्याच्या मनात एक निश्चित योजना आकाराला येत होती. तेच सूत्र मनात धरून त्याने बोलण्यास सुरुवात केली.

‘‘हे मित्रांनो, खरोखरीच तुमचे कौतुक आहे. तुम्हाला मित्र म्हणून संबोधण्यात मला अत्यंत आनंदच होत आहे. कारण आपत्काळी जे आपल्याला सहाय्यकारी होतात, आपल्या मदतीला धावून येतात आणि त्यासाठी लौकिक, लज्जा, भीड वा भीती यांचीच काय, पण स्वतःच्या प्राणांचीही पर्वा करीत नाहीत तेच खरे मित्र होत. एरव्ही, संकटाची चाहूल लागल्यावरच सोडून जाणारे सामान्य बाजारबुणगेच अनेक असतात. बुडणाऱ्या जहाजावरून प्राणाच्या भीतीने उंदीरही उड्या मारून पळून जातात. परंतु त्या जहाजाचा मुख्य नावाडी आणि त्याचे निष्ठावंत सहकारी मात्र त्या जहाजावरतीच पाय घट्ट रोवून उभे रहातात आणि प्रयत्नांची शिकस्त करून कौशल्याने व प्रयत्नाने ते जहाज सुखरूपपणे पैलतीराला लावतात. त्या नावाड्यावर ज्यांचा विश्वास नाही असे सामान्य लोकही जिवाच्या भीतीने त्या नावाड्याला व जहाजाला सोडून पाण्यात उड्या मारून मृत्यूलाच कवटाळतात. पण त्या नावाड्यावर ज्यांचा दृढ विश्वास आहे ते मात्र त्या नावाड्याची व जहाजाची साथ सोडीत नाहीतच, उलट त्या नावाड्याच्या पाठीशी उभे राहून त्याला सक्रिय सहाय्य करतात. त्यामुळे तो नावाडी तर यशस्वी होतोच पण त्याचे सहकारी सुद्धा त्या यशाचे भागीदार होतात.

हे मित्रांनो, म्हणूनच आज तुम्हीही त्याच भूमिकेने माझ्यासंगे दृढ निश्चयाने उभे आहात याचे मला विशेष कौतुक वाटते व आनंद होतो. परंतु आपला मुख्य नावाडी मात्र तो जगन्नियंता परमेश्वर आहे हे लक्षात ठेवा. त्याच्यावरतीच भरवसा ठेवून आपल्याला त्याच्या चरणी अनन्य भावाने रहायचे आहे. तर तो आपल्या पाठीशी त्याच्या सर्व सामर्थ्यानिशी उभा राहील हे निश्चितच आहे! कारण तेच त्या परमेश्वराचे ब्रीद आहे आणि तो त्याच्या ब्रीदाला नित्यच जागत असतो. तेच तर त्याचे परमेश्वरत्व आहे.

आता या आमच्या सुंदर व मोहक पुत्राला कसे वाचवायचे याचाही विचार माझ्या मनात हळूहळू निश्चित रूप घेत आहे. सर्वप्रथम या मुलाला येथून त्वरित हलवून दुसरीकडे सुरक्षित ठिकाणी नेले पाहिजे आणि तेही सर्वांच्या, अगदी कंसाच्याही नकळत! त्यासाठी सुरक्षित स्थानाचा विचार केला तर एकच विचार

माझ्या मनात येतो आणि तो म्हणजे गोकुळचा. यमुनानदीच्या पैलतीराला असलेले हे राज्य लहान असले तरी दूधदुभत्यामुळे अतिशय समृद्ध आहे. सर्वात मुख्य म्हणजे त्या गोकुळचा राजा 'नंद' हा माझा अत्यंत जवळचा व जिवाला अगदी जीव देणारा असा मित्र आहे. आमच्या मैत्रीसाठी तो कोठलीही जोखीम पत्करील व ती यशस्वीरित्या पार पाडेल याची मला पूर्ण खात्री आहे. आणखीन एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे कंसाच्या बंदीवासात पडण्यापूर्वीच मला माझ्या प्रथम पत्नी रोहिणीपासून झालेला मुलगा बलराम हाही नंदाच्याच घरी वाढत आहे. तेव्हा सर्वांगाने विचार केला असता या आमच्या मुलाला गोकुळात नंदाच्याच घरी ठेवणे सर्वाधिक सुरक्षित ठरणार आहे.

आता या बालकाला येथून गोकुळात कसे न्यावे हाच मोठा कठीण प्रश्न आहे. त्याचीही योजना माझ्या मनात थोडी थोडी तयार होत आहे आणि त्याचसाठी मला तुमच्या मदतीची अत्यंत जरूर आहे. कारण तुमच्या मदतीशिवाय मी काहीच करू शकणार नाही हे सत्य आहे, पण तुम्ही मला सर्वतोपरीने निश्चित सहाय्य कराल याची मला पूर्ण खात्री आहे. माझ्या मनोदेवतेचा तसाच कौल मला मिळत आहे.

तेव्हा आत्ताच्या आत्ता मी या बालकाला गोकुळात नेऊन पोचवतो व ताबडतोब परत येतो. तेवढा वेळा या कारागृहाच्या बंधनातून तुम्ही मला सोडवावे अशी तुम्हांला मी विनंती करतो. काही झाले तरी व कोणत्याही परिस्थितीत मी पुन्हा परत येईन असे मी तुम्हाला ईश्वरसाक्षीने वचन देतो. एवढेच नव्हे, तर तशी शपथ मी या बालकाच्या मस्तकावर हात ठेवून घेतो म्हणजे तुमची निश्चितपणे खात्री पटेल. कारण मला माहीत आहे की तुम्हीसुद्धा मोठी जोखीम घेत आहात. आणि ही जोखीम येथे तर तुमच्या प्राणांचीच आहे. तेव्हा तुमची अडचण मी समजू शकतो. परंतु माझा भरवसा धरा अशी मी तुम्हांला पुन्हा एकदा विनवणीच करतो.''

वसुदेवाच्या बोलण्यावर पहारेकरी काही बोलण्याच्या आधीच देवकी स्फुंदून स्फुंदून रडू लागली. तिला भावनावेग अनिवार झाला. तिच्या मुखातून काही शब्द बाहेर पडणेही अशक्य होऊ लागले. तरीही प्रयत्नपूर्वक ती एकेक शब्द हळूहळू बोलू लागली.

''महाराज, तुमचे बोलणे ऐकून माझ्या मनाची अवस्था मोठी विचित्र झाली आहे. एकीकडे माझ्या हाडामासापासून प्रसवलेला माझा जणु पोटचा गोळाच अशा या बालकाचे प्राण कसे वाचवावेत याचा घोर

माझ्या मनाला लागून राहिला आहे, तर दुसरीकडे त्याला माझ्यापासून कोठेतरी दूर कसे पाठवावे या विचाराने माझे मन व्याकूळ होत आहे. परंतु सर्व बाजूने विचार करता प्राप्त परिस्थितीत यावाचून दुसरा कोणताही मार्ग दिसत नाही हेही खरेच आहे.

महाराज, तुम्ही घेतलेले धैर्यबळ पाहून माझ्याही मनाचे बळ वाढत आहे. आपल्या बालकाच्या मोहक रूपाने जर आपल्या मनाला मोह पडला तर आपल्याच्याने त्याला दूर करणे घडणार नाही. परंतु त्यामुळे त्याच्या जिवाला निश्चितच धोका होईल आणि आपल्यालाही अनन्वित यातना भोगाव्या लागतील. पण त्या बालकाविषयी आपल्याठायी खरेच प्रेम निर्माण झाले असेल तर आपल्याला त्या बालकाच्या हिताचा योग्य निर्णय घेण्याचे मनोबळ प्राप्त झालेच पाहिजे. आणि त्या बालकाचे हित सर्वप्रथम त्याच्या सुरक्षिततेतच आहे. परंतु आता या घनघोर अंधाऱ्या रात्री व मुसळधार पावसात या बालकाला तुम्ही कुठेही घेऊन जाणे खरेच सुरक्षिततेचे आहे का? मला तरी तशी खात्री वाटत नही. पण दुसराही काही उपाय दिसत नाही. तेव्हा त्या परमेश्वरावर संपूर्ण भरवसा ठेवणे हाच एकमेव योग्य मार्ग आहे.''

देवकीचे बोलणे संपताच सर्व पहारेकऱ्यांनी संमतीदर्शक मान डोलवली व एकमुखाने वसुदेवाला उद्देशून म्हणाले, ''वसुदेव महाराज, देवकीमातेचे बोलणे अगदी संयुक्तिक व रास्तच आहे. आत्ताच्या या घडीला या घनघोर पावसात यमुना नदी पार करून गोकुळाला जाणे जरी धोकादायक असले, तरी येथेच रहाण्यात तर पूर्णच धोका आहे. जी काही थोडी फार सुरक्षिततेची संधी आहे ती बाहेरच आहे, येथे तर अजिबातच नाही. या संधीचाच उपयोग आणि तोही अत्यंत त्वरेने करून घेणे आवश्यक आहे. तेव्हा आता विचार वा चर्चा करण्यात अजिबात वेळ न घालवता ताबडतोब कृती करावी हीच विनंती आम्ही तुम्हाला करीत आहोत.''

देवकीचे व पहारेकऱ्यांचे बोलणे ऐकून वसुदेवाचे मनोबळ अधिकच वाढले आणि त्याने दोन्ही हात जोडून परमेश्वराची प्रार्थना केली. 'हे जगन्नियंत्या परमेश्वरा, आम्ही तुझी अज्ञानी, पण लडिवाळ बाळे आहोत. तुझ्याच कृपेने आम्हाला आमच्या दुःखातून बाहेर पडण्याचा मार्ग दिसत आहे आणि तुझ्याच कृपेने आमचे सर्व दुःख नाहीसे होईल असा आमचा विश्वास आहे. तुझ्या सत्तेवर आमची पूर्ण श्रद्धा आहे आणि त्या सत्तेतच आम्ही आमच्या कर्तव्यकर्माला उद्युक्त होत आहोत. आमच्या सर्वांच्याच ठिकाणी तुझ्या माहात्म्याचा भाव एकवटून आला आहे आणि तेच आम्हा सर्वांचे बळ आहे. आमचा निर्णय व आमची कृती

ही तुझीच इच्छा आहे असा दृढ भाव आम्ही तुझ्या चरणाशी धरला आहे. तुझ्याही नियतीला हेच संमत आहे अशी खात्री बाळगून यश प्राप्त होण्यासाठी आम्ही तुझीच मनोभावे आळवणी करतो, तुझीच प्रार्थना करतो.'

वसुदेवाच्या भावपूर्ण प्रार्थनेने सर्वांचेच अंतःकरण भरून आले व ते त्वरित कृती करू लागले. पहारेकऱ्यांनी ताबडतोब एक मोठी टोपली आणली. त्यात देवकीने आपली अत्यंत मऊसर अशी वस्त्रे ठेवून त्या बालकासाठी सुखकर व सुरक्षित अशी शय्या तयार केली. आपल्या स्वकराने व अश्रूपूर्ण नेत्राने तिने आपल्याला लाडक्याला त्या टोपलीत ठेवले. त्याआधी देवकीने त्या बाळाला आपल्या हृदयाशी धरून यथेच्छ स्तनपान करविले आणि आपला वात्सल्यभावाचा पान्हा मोकळा केला. पहारेकऱ्यांनी त्या टोपलीवर घट्ट झाकण लावले. वसुदेवाने ती टोपली दोन्ही हातांनी उचलून आपल्या हृदयाशी धरली आणि सर्वांचा निरोप व सदिच्छा दृष्टीक्षेपानेच घेऊन तो त्वरेने बंदीशाळेतून बाहेर पडला.

अंधःकाराने व कोसळणाऱ्या जलधारांनी पूर्णपणे ग्रासलेल्या मथुरा नगरीच्या रस्त्यावरून झपाझप पावले टाकत वसुदेव यमुना नदीच्या काठी लगेच येऊन पोहोचलादेखील! यमुना नदीचे रौद्र रूप पाहून मात्र वसुदेवही थोडासा बावरलाच आणि जागच्या जागी थबकला. पुढे पाऊल टाकायला त्याचे मन धजावेना. स्वतःपेक्षाही बालकाच्या काळजीनेच त्याचे मन धास्तावले होते. कारण नुसते यमुनानदीच्या पलीकडे जायचे नव्हते, तर त्या बालकासह आणि तेही सुरक्षितपणे पलीकडे गोकुळात जायचे होते हे महत्त्वाचे होते. परंतु वसुदेवाने धीर सोडला नाही. मनोमनी परमेश्वराला सतत आळवीतच तो नदीच्या काठी पार होण्यासाठी योग्य जागा शोधू लागला. अचानक त्याला यमुनानदीच्या पात्रातील अशी जागा दृष्टोत्पत्तीस आली, जेथे पाण्याची खोली कमी जाणवत होती. वसुदेवाने पुन्हा एकदा अंदाज घेऊन मनाची खात्री करून घेतली आणि सर्व धैर्यबळ एकवटून त्याने यमुना नदीच्या जलात प्रवेश केला.

मनाचा हिय्या करून वसुदेव एकेक पाऊल पुढे टाकत होता. जसजसा तो पुढे पुढे जात होता तसतसे यमुना नदीचे पात्र अधिकाधिक सखोल होत होते. वरून आकाशातून कोसळणाऱ्या जलधारांचा वेग आणि खालून नदीच्या प्रवाहाचा सतत वाढत असलेला वेग यांच्या द्वंद्वात सापडलेल्या वसुदेवाला स्वतःच्या शरीराचा तोल सांभाळणे अधिक कठीण होत होते. पण तरीही पैलतीराला जाण्याचा एकमेव ध्यास धरलेला वसुदेव सावकाशपणे व ठामपणाने पाऊल पुढे टाकीतच राहिला. पाण्याची पातळी त्याच्या कमरेच्याही वर जसजशी जाऊ लागली, तसे वसुदेवाने त्याच्या हातातील बालक असलेली टोपली आपल्या शिरावर धरली. पण

यमुनानदीचे जल सतत वाढतच होते. यमुनानदीला जणु उधाणच आले होते. तिला कोणताही धरबंधच राहिला नव्हता.

पात्राच्या भर मध्यभागी आलेला वसुदेव जागच्या जागीच थबकला. पाणी तर त्याच्या खांद्यापर्यंत आलेले होते. पुढे जावे की न जावे या विचाराने त्याचे मन क्षणभरच अडकले. परंतु पुढच्याच क्षणाला त्याला त्याच्या शिरावरील टोपलीतील बालकाचे स्मरण झाले आणि त्याच्या ठिकाणचा पुत्रस्नेह उचंबळून आला. त्याचा विवेक जागृत झाला. त्या विवेकाने विचार करता करता त्याच्या लक्षात आले, की तो तर नदीच्या पात्राच्या मध्यभागापर्यंत येऊन पोहोचलेलाच आहे. आता फक्त अर्धेच अंतर उरलेले आहे. मग पुढे गेले काय आणि मागे गेले काय, अंतर तेवढेच भरून काढावे लागणार आहे. अशा परिस्थितीत धोका पत्करायचाच तर तो पुढे जाण्यासाठी घेणेच अत्यंत योग्य आहे. कारण कुठल्याही परिस्थितीत आपल्या बालकाला घेऊन परत कंसाच्या राज्यात जाणे याच्यापेक्षा दुसरा कोणताही मोठा धोका नाही. अशा विवेकाने प्राप्त झालेल्या मनोबळाने युक्त होऊन, वसुदेव धिमेपणाने पण ठामपणाने पुन्हा एकेक पाऊल पुढे टाकीत नदीच्या प्रवाहातून पुढे पुढे सरकू लागला.

परंतु यमुना नदीच्या पाण्याचा प्रवाह जणू काही हटायला तयारच नव्हता. तो तर सतत वाढतच होता आणि पाण्याची पातळी थोडी थोडी का होईना, पण अधिकाधिक उंचावतच होती. शेवटी वसुदेवाच्या मस्तकावरही पाणी जाणार की काय अशी भीती वसुदेवाला वाटू लागली. तोच अचानक एक जणु नवलच घडले. एवढा वेळ स्वस्थपणे निद्राधीन झालेल्या त्या बालकाची टोपलीमध्ये चुळबूळ सुरू झाली व ते तिथल्या तिथेच थोडी थोडी हालचाल करू लागले. हालचाल करता करताच त्याचा एक पाय टोपलीच्या बाहेर आला. वाढणाऱ्या पाण्याचा स्पर्श त्या पायाला झाला मात्र, पाण्याची पातळी अनपेक्षितपणे ओसरू लागली आणि वसुदेवाला पुढे पुढे जाणे अधिकाधिक सुलभ होऊ लागले. नदीच्या पाण्यात अचानक झालेल्या या बदलाने वसुदेवही चकितच झला. त्यालाही विस्मयच वाटला. परंतु त्यासंबंधी अधिक विचार करण्याची त्याची मनःस्थिती त्या वेळेस नव्हती. त्यामुळे त्याने मनोमनी परमेश्वराचे आभार मानले व परमेश्वराची प्रार्थना केली आणि त्वरित यमुनेच्या पैलतीला येऊन पोहोचला.''

नारदाचा शब्दप्रवाहही थोडासा ओसरल्यासारखा लक्ष्मीला वाटला. त्याच संधीचा तिने उपयोग करून घेतला आणि नारदाला उद्देशून ती बोलू लागली व विचारू लागली.

‘‘हे सगुणकथाप्रेमी नारदा, तुझ्या वक्तव्याच्या प्रवाहाचा वेग तर यमुनेच्या प्रवाहापेक्षाही जास्त असल्याचे मला जाणवत आहे. परंतु तुझ्या शब्दप्रवाहाची सखोलता यमुना नदीच्या प्रवाहापेक्षाही जास्त आहे हेही मी तेवढ्याच निश्चितपणे जाणून आहे. म्हणूनच मी तुला विचारते, की आता जो तू ‘बालकाच्या पदस्पर्शाने यमुना नदीचा प्रवाह ओसरल्याचा’ प्रसंग सांगितलास, त्यात चमत्काराचा भाग किती, भावनेचा भाग किती आणि तथ्याचा भाग किती? कारण तसा प्रसंग घडला हे तर खरेच आहे. त्याचा निव्वळ भावनेने किंवा बुद्धीने विचार करून चालणार नाही हे खरेच आहे. पण त्या प्रसंगात काही थोडी फार तरी तर्कसंगती आहे की नाही? का प्रसंग केवळ ऐकून त्याच्यावर जास्त विचार न करता तो तसाच सोडून द्यायचा? हे नारदा, तू तसे म्हणत असशील तर त्या प्रसंगाच्या जास्त खोल न जाता तो विसरायला माझ्या मनाची पूर्ण तयारी आहे. कारण आता तेवढे काही माझे मन भावनिक व दुर्बल राहिलेले नाही. पुढील कथाप्रसंग ऐकताना माझे मन निश्चितच कोणत्याही प्रकारचा अडथळा निर्माण करणार नाही. परंतु त्या प्रसंगाची काही तर्कसंगत व सुसंगत अशी मीमांसा तुला सांगता येणे शक्य असेल व आवश्यक वाटत असेल तर जरूर सांगावी. ती श्रवण करण्यासाठी मी निश्चितच आतुर आहे.’’

लक्ष्मीच्या बोलण्याचे व विचारण्याचे नारदाला कौतुकच वाटले आणि ते त्याने त्याची मान डोलवून व स्मितहास्याने व्यक्त केले. पण त्याने लागलीच बोलण्यासही सुरुवात केली. लक्ष्मीला उद्देशून तो सांगू लागला, ‘‘हे लक्ष्मी, तुझे विचारणे सुसंगतच आहे. कारण त्यामागील तुझी विचारसरणी सुसंगत आहे. पण तरीही तू घडलेल्या प्रसंगातून कोणत्याही निष्कर्षाप्रत येऊ शकत नाहीस. कारण तुझ्या मनापुढे प्रसंगचित्र स्पष्टपणे येत नाहीये आणि त्यामुळेच तुझ्या मनाची अवस्था काहीशी गोंधळल्यासारखी झालेली आहे.

हे लक्ष्मी, तुला मागेच मी सांगितल्याप्रमाणे मुळात चमत्कार म्हणजे काय याचीच व्याख्या निश्चितपणे करता येत नाही. त्यामुळे कोणत्याही घडलेल्या प्रसंगातील प्रत्यक्ष वस्तुस्थिती जरी एकच असली, तरी ज्याच्या त्याच्या कल्पनेनुसार व समजुतीनुसार, त्याच प्रसंगाकडे पहाण्याचा ज्याचा त्याचा दृष्टीकोन वेगळा वेगळा असतो. कल्पना ही प्रत्येकाच्या मनाच्या भावनेनुसार घडत असते आणि समजूत ही ज्याच्या त्याच्या बुद्धीनुसार होत असते. त्यामुळेच एकाच्या कल्पनेचा किंवा समजुतीचा दुसऱ्याच्या कल्पनेशी किंवा समजुतीशी समन्वय कधीच साधला जात नाही. प्रत्येकजण स्वतःच्याच कल्पनेला व समजुतीला धरून रहात असल्यामुळे स्वतःच्याच दृष्टीकोनाला चिकटून रहातो आणि दुसऱ्याच्या कल्पनेचे व समजुतीचे वेगळे

अस्तित्व मानायला त्याचे मन तयारच होत नाही.  अशा तऱ्हेने स्वतःच्याच कल्पनेत मश्गूल असलेला व स्वतःच्याच समजुतीच्या अहंकारात अडकलेला प्रत्येकजण घडलेल्या प्रसंगाचा वेगवेगळा अन्वयार्थ लावून बसलेला असतो.

हे लक्ष्मी, आता आपण कृष्णचरित्रात घडलेल्या या प्रसंगाकडेच पाहू या ना!  बालरूप कृष्णाचा पदस्पर्श झाला आणि यमुना नदीला आलेला महापूर ओसरू लागला असा प्रसंग घडलेला दिसला.  एखाद्या भाविकाला तो कृष्णाकडून घडलेला चमत्कार वाटेल व त्यातून कृष्णाचे दैवी सामर्थ्यच प्रगट झाले असे जाणवून, तो हात जोडून नतमस्तक होईल.  त्याच्या भावनेचा आदर करूनही असे बुद्धीने म्हणता येईल, की कृष्ण हा नारायणाचा अवतार असल्यामुळे त्याच्याठायी दैवी सामर्थ्य सहजपणे जन्मतःच होते हे जर सत्य आहे, तर मग यमुना नदीचा पूर ओसरण्यासाठी एवढा वेळ लागण्याचे व कृष्णाचा पदस्पर्श होण्याची वाट बघावी लागण्याचे काय कारण होते?  आणि मुळात कृष्णाठायी दैवी सामर्थ्य होते, तर कृष्णाच्या आगमनानेच मुसळधार पाऊस कोसळण्याचे थांबावयास पाहिजे होते आणि कृष्ण नदीच्या तीरावर आल्या आल्याच यमुना नदीचा पूर ओसरायला पाहिजे होता.

विचार केला तर दोन्ही प्रकारचे म्हणणे हे संयुक्तिक वाटते, पण त्याची सांगड तर लागत नाही.  मग त्यातील कुठले म्हणणे खरे मानायचे?  हे लक्ष्मी, एखाद्याला बुद्धीने असे जाणवेल की कृष्णाच्या पदस्पर्शाने नदीचे जल ओसरले यात चमत्कार वगैरे काही नसून, ती केवळ एक नैसर्गिक घटना होती.  तो निव्वळ एक योगायोगच होता.  तर त्यावर दुसरा कोणीतरी भावनेने असेही म्हणू शकेल, की मग तो योगायोग त्याचवेळी का घडला?  निश्चितच त्यात काही तरी ईश्वरी संकेत व संकल्प असला पाहिजे!

एखादा भावनेच्या भरात असेही म्हणू शकेल की, साक्षात नारायणाचा अवतार असलेला कृष्णच यमुनेच्या प्रवाहातून पैलपार होत असल्यामुळे, यमुना नदीच्याही भावना उचंबळून आल्या व ती कृष्णाच्या चरणांना स्पर्श करण्यास अत्यंत आतुर झाली.  त्यामुळेच तिचे पाणी वर वर चढत राहिले आणि कृष्णाचा पदस्पर्श होताक्षणीच यमुना नदीला कृतार्थ वाटून तिचे पाणी ओसरू लागले.  पण बुद्धीने या म्हणण्यावर लगेच असा प्रतिवाद केला जाईल की, नदी ही जरी तिच्या प्रवाही जलामुळे चैतन्यमय दिसली तरी तिच्याठायी काही 'मन' हे तत्त्व नाही.  त्यामुळे नदीच्या ठिकाणी कोणतीही भावनात्मकता मुळातच संभवत

नाही. तेव्हा यमुना नदीकडून अशी भावनात्मक कृती घडण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. तेव्हा हे लक्ष्मी, .........''

पुढे काही नारद बोलणार तोच लक्ष्मीने नारदाला हात जोडले व ती म्हणाली, ''थांब नारदा, तुझे बोलणे येथेच जरा थांबव. कारण कृष्ण व यमुना नदी यांच्यात घडलेल्या एका प्रसंगाचे अनेक संभाव्य दृष्टीकोन दाखवता दाखवता, तू तुझ्या अस्खलित वाणीने असे काही वेगाने वर्णन करून सांगत आहेस, की तुझ्या शब्दप्रवाहाला कशानेही ओसर पडेल असे मला तरी वाटत नाही. मी विचारलेल्या प्रश्नांचा स्पर्श तुझ्या वक्तव्याला झाला तर थोडा वेळ तुझ्या वाणीला ओसर पडल्यासारखा वाटतो. पण ते खरे नसते. कारण तुझ्या अंतःकरणात या नारायणाचे सगुण प्रेम सततच स्पर्शीत होऊन रहात असल्यामुळे त्या अंतःकरणाची अवस्था नेहमी उचंबळलेलीच असणार. त्यामुळे तुझ्या वाक्‌प्रवाहाला नित्याचाच पूर आलेला असतो. कोठल्याही बाह्यांगाने तो ओसरतही नाही आणि वाढतही नाही हेच खरे तर सत्य आहे. परंतु माझे मन मात्र श्रवण करता करता त्या प्रवाहात केव्हा पूर्ण बुडते, तर कधी त्या प्रवाहावरती केवळ तरंगत असते, तर कधी माझ्या मनाला काही कळेनासे होऊन ते निव्वळ गटांगळ्याच खात रहाते व त्याला गुदमरल्यासारखेच होते. तेव्हा हे नारदा, माझ्या मनाला पूर्ण मोकळेपणा येण्यासाठी थोडा अवधी व संधी मिळणे अत्यंत आवश्यक आहे. कारण तरच ते पुढील श्रवण करण्यासाठी आतुर व तत्पर होऊ शकेल.

हे नारदा, एकाच प्रसंगाकडे पहाण्याचे अनेक दृष्टीकोन सांगताना तू ते एवढे पटापट सांगितलेस, की मला ते जरी पूर्णतः आकलन झाले नाहीत, तरी एवढे मात्र माझ्या निश्चितपणे लक्षात आले आहे की, केवळ भावनेचे व बुद्धीचे दृष्टीकोन हे यथार्थ असू शकत नाहीत. तर ते एकांगीच असतात. पण मग अशा प्रसंगाकडे निश्चित कोणत्या दृष्टीने बघावे, की जेणेकरून त्या प्रसंगातील यथार्थता आपल्याला जाणवेल? हे नारदा, कृष्णचरित्रातील घडलेल्या या प्रसंगाच्या आधारानेच कृपया मला समजावून सांगावे आणि ती तुझी दृष्टी मला प्राप्त करून द्यावी.''

लक्ष्मीच्या बोलण्याचा स्मित हास्याने स्वीकार करीत नारद तिच्याशी पुन्हा बोलू लागला. ''हे लक्ष्मी, तुझ्या मनाचा थोडासा गोंधळ उडाला ते साहजिकच आहे. कारण एखाद्या गोष्टीकडे अनेक दृष्टीकोनातून बघता येते हेच कोणाला ठाऊक नसते आणि ज्याच्या त्याच्या दृष्टीतून झालेले ज्याच्या त्याच्या मनाचे मत यालाच जो तो अंतिम मानत असतो. त्यातूनच आपापल्या मताचा आग्रह व हट्ट निर्माण होतो. दुसऱ्याच्या

मताचा मान राखणे तर दूरच, पण दुसऱ्याची मते समजावून घेण्याची गरजही जेव्हा वाटेनाशी होते, तेव्हाच व्यक्ति-व्यक्तिमध्ये संघर्ष सुरू होतो आणि त्यातूनच अशांती व असमाधानाचे वातावरण निर्माण होते. अश वातावरणामध्ये मग सर्वांचीच मानसिकता बिघडते आणि त्यांच्या मनाचा तोल ढळतो. त्यावेळी मनाचा समतोल पुन्हा प्राप्त करून घेणे कठीण होऊन बसते. अशावेळी शांत मनाचे व समतोल वृत्तीचे संतमहात्मेच सामान्याला सहाय्यभूत होऊ शकतात. तेच सर्वांची मने व मते समजूनही घेतात आणि तेच सर्वांना योग्य व अयोग्य समजावूनही सांगतात. असे महात्मेच सर्वांना यथार्थ दृष्टी देऊन त्यांची मने व्यापक करतात. म्हणून सर्वांनी सत्पुरुषांचा आश्रय घेणे अत्यंत आवश्यक आहे. कारण त्यांच्या मार्गदर्शनानुसार जीवन जगले असता जीवनाकडे पाहण्याची दृष्टी अधिकाधिक व्यापक व योग्य होत रहाते आणि जीवनातील कोणत्याही परिस्थितीत मनःस्थिती न ढळता, मनाच्या ठिकाणी कायम शांतीचा व समाधानाचा अनुभव येत रहातो.

असो! परंतु हे लक्ष्मी, तुझ्या मनाचा थोडासा गोंधळ होऊनही तू काढलेला निष्कर्ष मात्र योग्य आहे याचेच मला कौतुक वाटते. कारण तुझ्या ठिकाणच्या विवेकाचे ते लक्षण आहे. 'केवळ भावनेचे व निव्वळ बुद्धीचे दृष्टीकोन यथार्थ असू शकत नाहीत' हे तुझे म्हणणे अगदी संयुक्तिक आहे. कारण अवतारी पुरुषांची चरित्रे ही त्यांच्या अंतःकरणाच्या अवस्थेचे आविष्कार असतात. त्या अंतःकरणाची कल्पना सामान्याच्या मनाला करता येणे शक्यच नसते आणि ते बुद्धीने समजून घेणे तर केवळ अशक्यच असते. तेव्हा अशा अवतारी चरित्रांकडे व त्यातील प्रसंगाकडे काहीवेळा रूपकात्मक दृष्टीने पहाणेच अधिक योग्य ठरते. कारण ती दृष्टी व्यापक तर असतेच, परंतु महात्म्यांच्या स्वानुभवाच्या निरपेक्ष, निःस्पृह व निर्मोही अंतःकरणाला व्यापकतेने प्रगट करणारी असते. त्याचबरोबर त्या त्या प्रसंगातील सापेक्ष अशा भावपूर्णतेलाही ती दृष्टी साकार करीत असते हे अधिक महत्त्वाचे आहे. कारण त्यामुळेच उत्कट अशा प्रेमभक्तिभावाची लक्षणे प्रगट होत असतात. या लक्षणांच्या अभ्यासाने ती प्राप्त होऊ शकत नाहीत हे जरी अगदी खरे असले, तरी ती लक्षणे दृष्टोत्पत्तीस येत असल्यामुळे ती लक्षणे प्राप्त व्हावीत असा ध्यास मात्र धरता येणे शक्य होते. त्या ध्यासातूनच त्या लक्षणांचे मूळ लक्षात येते आणि एकीएक व्यवधान त्या मूळाचे लागते.''

नारदाचे बोलणे ऐकून लक्ष्मी कौतुकाने व विस्मयानेच नारदाकडे पाहू लागली. मनाच्या त्या विशिष्ट भावाच्या अवस्थेतूनच ती नारदाशी बोलू लागली.

‘‘हे नारदा, तुझ्या अंतःकरणात एकेक काय नवीन विषय साठलेले असतात हे खरेच कळणे कठीण आहे. आणि ते विषय अचानक जेव्हा एखाद्या नवीनच अंगाने प्रगट होतात, तेव्हा तर मला चकितच व्हायला होते. अर्थात मी हे पूर्णपणे जाणून आहे की तुझ्याकडून जरी असे विषय बाह्यांगाने अकारण प्रगट होताना दिसले, तरी त्याचे खरे व मूळ कारण तुझ्या अंतःकरणाच्या अवस्थेतच आहे. तुझ्या अंतःकरणात या नारायणाने कायमचे स्थान घेतलेले आहे. त्यामुळे या नारायणाचे सर्वांगीण माहात्म्य तुझ्या अंतरात सततच स्फुरत असणार आणि या नारायणाचे प्रेम त्या अंतःकरणात नितनाविन्याने व सर्व रंगाने प्रसवत असणार. हे नारदा, तुझ्या ठिकाणी असलेला नारायणाविषयीचा उत्कट भक्तिभाव हा या दोन्हीचा मिळून परिपाकच आहे. म्हणूनच ही तुझी नारायणाविषयीची सगुणभक्ति सर्व रंगाच्या प्रेमाने नेहमी रंगलेली आणि सर्व अंगाच्या माहात्म्याने अखंड भरलेली असते हे मी जाणून आहे. या भक्तिभावाचे चिंतन व ध्यास तुझ्याठायी सहजपणे व सततचा लागलेला असतो. तोच अव्यक्त भक्तिभाव नानाविध रूपाने व शब्दाने व्यक्त होत असतो आणि म्हणूनच तो नित नवा जाणवत रहातो. त्यामुळे ‘अवतारी चरित्रांकडे व त्यातील कथा प्रसंगाकडे काहीवेळा रूपकात्मक दृष्टीनेच पहाणे आवश्यक ठरते’ हा तुझ्याकडून बोलण्याच्या ओघात सहजपणे प्रगटलेला विषय जरी नवा दिसला, तरी तो मुळात मूलभूतच आहे. कारण तीच दृष्टी निरपेक्ष असल्यामुळे विशुद्ध असते आणि म्हणूनच तीच दृष्टी आपल्या मनातील विचारांना व बुद्धीच्या समजुतीला शुद्ध करू शकते. विचार शुद्ध होता होताच मन शुद्ध होईल आणि समजूत स्पष्ट होता होताच बुद्धीही शुद्ध होत राहील.

हे नारदा, मला तर असे अगदी मनापासून वाटते की, अवतारी चरित्रांकडे काही वेळेलाच काय, नेहमीच रूपकात्मक दृष्टीने पहायला पाहिजे. कारण तरच ती चरित्रे मनाला कायमची मार्गदर्शक ठरतील आणि मनाला त्याच्या अशुद्ध अवस्थेतून शुद्ध अवस्थेकडे जाण्याचा मार्ग दाखवीत रहातील. अर्थात माझ्या मनाचे हे वाटणे कितपत संयुक्तिक आहे हे तूच खऱ्या अर्थाने जाणतोस आणि तूच मला ते विशद करून सांगशील याची मला खात्री आहे. तेव्हा हे नारदा, सगुण चरित्रांकडे पाहण्याच्या योग्य दृष्टीचा लाभ तूच मला करून द्यावास व कृष्णचरित्रात घडलेल्या प्रसंगातील भावार्थही तूच मला समजावून सांगावास अशी मी तुला प्रेमपूर्वक विनंती करते.’’

लक्ष्मीच्या बोलण्याचेच सूत्र धरून नारद लक्ष्मीशी पुढे बोलू लागला, ‘‘अगं लक्ष्मी, हीच तर मुख्य अडचण आहे. भावार्थ हा असा समजावूनही सांगता येत नाही अथवा वेगळेपणाने तसा दाखवताही येत

नाही. प्रसंगातील वा शब्दातील सरलार्थ हा एकवेळ समजावून सांगता येईल व समजूनही घेता येईल. अर्थात तेही वाटते तेवढे सोपे नाही. कारण एखाद्या सरळ व स्पष्ट गोष्टीतूनही वाकड्या चालीच्या मनाला त्या ठिकाणी वाकडेपणा भासू शकतो. किंवा तिरकस बुद्धीला त्या ठिकाणी काहीतरी अकारण संशयास्पदता वाटू लागते. परंतु भावार्थ हा मात्र मनाला जाणवावाच लागतो आणि मनालाच तो जाणवू शकतो. कारण भाव हा मनाचा गुणधर्म आहे. भावाची अगदी सुरुवातीची प्राथमिक अवस्था म्हणजे जी भावना, ती तर मनाच्याच ठिकाणी निर्माण होते, तेथेच काही काळ रहाते आणि त्या मनाठायीच अंतिमतः विलयही पावते.

हे लक्ष्मी, अशी ही सगुण प्रेमाची भावना सगुण चरित्रे ऐकता ऐकताच व पहाता पहाताच निर्माण होते. परंतु त्याहूनही जेव्हा एखाद्या महात्म्यांचा सहवास करण्याची सुसंधी भाग्याने लाभते, तेव्हा त्यांच्या प्रेमस्वरूप अवस्थेतून नित्य पाझरणारे ईश्वरी सगुण प्रेम प्रत्यक्ष अनुभवण्याचा सुयोगच प्राप्त होतो. त्या प्रेमाच्या स्वानुभवामुळेच ईश्वराविषयी असलेल्या प्रेमाच्या भावनेचे रूपांतर प्रेमभावात होत रहाते. भावना ही तात्काळ निर्माण होते, पण ती तात्कालिकच असते. तर भाव हा हळुहळू घडत जातो, पण तो कायमचा असतो. भावना ही वरवरची असते, तर भाव हा अत्यंत सखोलचा असतो. भावना ही अनिश्चित असते, तर भाव हा निश्चयात्मक असतो. भावना ही दुर्बल असल्यामुळे प्रतिकूल परिस्थितीत हतबल होते, तर भाव हा सबळ असल्यामुळे कोणत्याही परिस्थितीत सुस्थितीत तर असतोच, पण प्रतिकूल परिस्थितीत तो अधिकच बलवान होतो. एवढेच नव्हे तर, पराक्रमाने प्रतिकूलतेवर मात करून व अनुकूलता निर्माण करून, स्वतःच्या भावानुसार प्रेमानुभव घेण्याचे सामर्थ्य त्या भावबळामध्ये असते. हे सामर्थ्य त्या प्रेमभावामध्ये त्याच्या विशुद्धपणातून आलेले असते. मनाठायीचे सर्व विकार, सर्व वासना, सर्व विकल्प मुळापासून नष्ट झालेले असतात आणि मन सगुण प्रेमाच्या अनुभवाने पुष्ट झालेले असते. म्हणूनच त्या मनाचे ठायी प्रत्यक्ष सगुण भक्ति करण्याचे धारिष्ट्य निर्माण होते. हे लक्ष्मी, या रूपकात्मक दृष्टीनेच जर आपण कृष्णचरित्रातील यमुना नदीच्या प्रसंगाकडे पाहिले, तर आपल्याही दृष्टीस हा भावना व भाव यातील फरक स्पष्टपणे दिसेल व त्यातील रहस्य आपल्यासाठी प्रगट होईल.

आता, यमुना नदीचे पाणी कृष्णाच्या चरणांना स्पर्श करण्यासाठी भरभरून वर चढत राहिले, या कृतीमध्ये उत्कटतेची भावना आढळून येते. तर कृष्णाने स्वतःहून आपला चरण टोपलीच्या बाहेर काढून यमुना नदीच्या जलाला स्पर्श केला, या कृतीमध्ये कृष्ण हा यमुनेची उत्कट भावना जाणून संतुष्ट झाला आणि

जणु त्याने तिला आपल्या चरणांचा स्पर्श देऊन तिच्या भावनेची पूर्ती केली असे आपल्या दृष्टीला जाणवेल. कृष्णचरणांचा स्पर्श होताच यमुना नदीचे पाणी ओसरून पुन्हा मूळ स्थितीला आले, यावरून केवळ कृष्णचरणांच्या स्पर्शानेच स्वतः धन्य झाल्याची भावना यमुना नदीची झाली आणि पुन्हा ती आपल्या मूळ अवस्थेला आली असे आपल्याला दिसेल. तेव्हा दृश्यमान गोष्टीच्या आधाराने त्यातील भावार्थ आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल, तर मग त्या दृश्याचा अंत मनाठायी करून त्यातील भावाला आपल्या मनात आपल्याला साकार करता येईल. त्या शुद्ध व निरपेक्ष भावाला मनात दृढ धरून ठेवले असताच हळुहळू आपले मन त्या भावानुसार अनुभव घेण्यासाठी सज्ज होत राहील.''

नारदाच्या बोलण्याने विस्मय पावत असलेली लक्ष्मी काय बोलावे हे न समजून थोडा वेळ गप्पच राहिली. परंतु तिला बसलेल्या आश्चर्याच्या धक्क्याचा परिणाम जेव्हा हळुहळू ओसरू लागला, तशी ती मनाने पुन्हा सावरली व तिच्या मुखातून शब्दांचे उद्‌गार बाहेर पडू लागले.

''अरे नारदा, तुझे हे बोलणे म्हणजे अजब वक्तव्याचा एक उत्कृष्ट नमुनाच आहे. तुझ्या अंतःकरणाची अवस्था म्हणजे मला तरी एक नवलाईची दुनियाच वाटत आहे. त्यातून केव्हा व काय एकेक नवल बाहेर येत राहील याची कल्पना मलाच काय, पण कोणालाही करता येणे शक्य नाही. कारण तुझे अंतःकरण हे सर्व कल्पनांच्या व तर्कांच्या पलीकडेच आहे हेच अगदी खरे आहे. आणि याचे मूळ कारण म्हणजे या नारायणाचेच अंतःकरण आहे हेही मी जाणून आहे. नारायणाचे अंतःकरण हेच तुझे अंतःकरण झालेले आहे. त्याचेच हे लक्षण आहे. परंतु त्या अंतःकरणापर्यंत माझ्या मनाने मला यावयाचे आहे आणि कल्पना करण्याची सवय झालेल्या माझ्या मनाला तुझ्या अकल्पित बोलण्याने मधून मधून असे जोराचे धक्के बसतात. पण त्यातूनच एक गोष्ट मात्र चांगली घडते, ती म्हणजे त्या बसलेल्या धक्क्याने माझे मन पुन्हा भानावर येते व स्वतःला पुन्हा सावरते.

शब्दांचा अर्थ, विषयाचा सरलार्थ आणि विषयातील भावार्थ यातील मुलभूत फरक तू ज्या सहजपणे व समर्पकपणे स्पष्ट करून सांगितलास, त्याने तर तुझ्या परिपूर्ण वक्तव्याची कमाल उंचीच गाठली असेच म्हणावे लागेल. यमुना नदीच्या ठिकाणी आलेला उत्कट भावनेचा महापूर आणि कृष्णचरणाच्या स्पर्शाने स्वतःला धन्य समजून तिला पुन्हा आलेला ओसर, यातील लपलेला भावार्थ तू ज्या पद्धतीने प्रगट करून दाखवलास त्याने तर माझे मन चकितच झाले. परंतु त्याचबरोबर त्या प्रसंगाकडे एक दृष्टांत म्हणून

पहाण्याची जी दृष्टी तू मला दिलीस तीच माझ्यासाठी अत्यंत महत्त्वाची आहे. त्याच दृष्टीने मला सर्व कृष्णचरित्राकडे पहायचे आहे हे तर आता माझ्या पूर्ण लक्षात आले आहे. नव्हे, तशी तर माझी खात्रीच पटलेली आहे. कारण तरच त्या कृष्णचरित्राचा मला पूर्णपणे आनंद घेता येणार आहे.

असो, पण नारदा, एक प्रश्न मात्र माझ्या मनात निर्माण होत आहे, की कृष्णाच्या केवळ चरणस्पर्शाने यमुना नदी खरेच धन्यतेस पावली काय? तिला तसे वाटले हे ठीक आहे व साहजिकच आहे म्हणा! परंतु खरेच तसे घडणे शक्य आहे काय? कारण मला तरी असे वाटते, की कृष्णचरणांचा स्पर्श होणे हे सहज शक्य आहे. परंतु खऱ्या अर्थाने धन्यतेस पावणे हे वाटते तेवढे सोपे नाही. तेव्हा हे नारदा, आता तूच या अंगावर विशेषत्वाने प्रकाश पाडावास व त्याचे अंग न् अंग विशद करून दाखवावेस असे मला वाटते.''

लक्ष्मीचे बोलणे ऐकून नारदाला समाधान झाले व ते त्याने तसे लक्ष्मीला बोलूनही दाखवले. ''हे लक्ष्मी, मला तुझे खरेच कौतुक वाटत आहे. तुझे श्रवण करणे व त्यातून तुझ्या ठिकाणी विचार निर्माण होणे हे दोन्हीही अभ्यासपूर्वक असते. पण तुझे विशेष कौतुक यासाठी आहे, की हा तुझा अभ्यास केवळ विषयाच्या बाह्यांगाचा नसतो, तर त्यामागे विषयातील अंतरंग जाणून घेण्याचा ध्यास असतो आणि हेच अतिशय महत्त्वाचे आहे. कारण निव्वळ बाह्यांगाचा बौद्धिक अभ्यास हा मनाच्याठायी अलिप्तता व कोरडेपणा आणि बुद्धीच्याठायी जडत्व व घमेंड निर्माण करणारा असतो, तर अंतरंगाचा घडलेला अभ्यास हा मनाला अधिकाधिक प्रेमपूर्ण व बुद्धीला विनम्र करीत असतो. त्यातूनच मनाचा ध्यास व आर्तता वाढत रहाते आणि मनाची अवस्था अधिकच भावपूर्ण होते. ही मनाची भावपूर्ण अवस्थाच तर भक्तिभावाचे मूळ आहे आणि म्हणूनच स्वानुभवाच्या आनंदाचे फळ सेवन करता येणे शक्य होते.

हे लक्ष्मी, धन्यता पावण्यासंबंधीचे तुझे बोलणे मात्र अगदी बरोबर आहे. कारण अंतर्बाह्य पूर्ण शुद्धी होऊन अंतःकरण सगुणप्रेमाने पूर्णपणे भरून वाहिल्यानेच मानवी जीवन खरे धन्यतेस पावणार आहे आणि ते जीवन नारायणाच्या कार्यासाठीच संपूर्णतः वाहिल्यानेच त्या जीवनाचे खऱ्या अर्थाने सार्थक होणार आहे हे त्रिवार सत्य आहे.

तेव्हा हे लक्ष्मी, केवळ कृष्णचरणांच्या स्पर्शाने यमुना नदी धन्यतेस पावणे शक्य नाही हे तुझे म्हणणे अगदी खरे आहे. कारण तिच्या जलात केवढी तरी अशुद्धता होतीच. मुख्य म्हणजे, तिच्या प्रवाहातील एका

डोहात कालिया नावाचा एक मोठा विषारी सर्प वस्ती करून होता. त्याच्या विषाने त्या डोहातील सर्व जलच विषमय झाले होते. त्यामुळे तेथील जल पिण्याच्या दृष्टीने घातकच होते. यदाकदाचित जर कोणी ते जल चुकून जरी प्राशन केले तर तो तात्काळ मृत्यूच पावत असे. त्यामुळे यमुना नदीच्या त्या डोहातील जलाचा गोकुळवासीयांना काही उपयोग तर नव्हताच, उलट त्यापासून मृत्यूची भीतीच होती. तेव्हा अशा दोषाने व विषाने युक्त असलेली यमुना नदी कृष्णाच्या केवळ चरणस्पर्शाने शुद्ध व निर्विष होणे तर शक्यच नाही. आणि, शुद्धता नाही तोपर्यंत धन्यता नाहीच नाही. परंतु आपल्यातील अशुद्धतेची व दोषांची जाणीव नसल्यामुळे म्हणा किंवा विसरल्यामुळे म्हणा, यमुना नदी मात्र 'आपण धन्य झालो आहोत' याच भावनेच्या कल्पनेमध्ये मश्गूल होऊन राहिली असणार. परंतु पुढे कृष्णाने मोठे झाल्यावर स्वपराक्रमाने नमुना नदीतील कालियाला त्याचे मर्दन करून निर्विष केले आणि यमुना नदीपासून दूर पळवून लावले. तेव्हाच यमुना नदीचे सर्वच जल खऱ्या अर्थाने विशुद्ध झाले आणि तिचे शीतल व मधुर जल सर्वांच्या जीवनासाठी उपयोगाचे झाले. खऱ्या अर्थाने तिचे सार्थक झाले व ती खरीच धन्यतेस पावली.

हे लक्ष्मी, या रूपकात्मक कथेतून एकच सुबोध प्राप्त करून घ्यायचा आहे आणि तो म्हणजे असा, की सामान्य जन त्यांच्या मनातील सर्व दोषांसह व विकारांसह मोठ्या भाग्यानेच महात्म्यांच्या चरणी आले, तरी त्यांचे अंतःकरण निर्दोष व निर्विकार झाल्याशिवाय त्यांच्या जीवनाचे खरे कल्याण होणे शक्य नाही. परंतु ते थोर महात्मे मोठ्या उदार अंतःकरणाने सामान्यांना आश्रय देऊन त्यांच्या भावनेचाही स्वीकार करतात आणि त्यांच्या ठिकाणची सद्‌भावना राखतात. परंतु तेवढ्यावरच ते महात्मे थांबत नाहीत, तर कृपावंत होऊन पराक्रमाने सामान्यांना दोषमुक्त करून प्रेमगुणयुक्त करतात व त्यांचे भावबळ वाढवतात. तेव्हा सामान्यांचेही अंतःकरण एक दिवस शुद्ध प्रेमाने भरून वाहते व त्यांचे जीवन लोकोपयोगी होते. अशा जीवनाच्या खऱ्या सार्थकतेमुळेच ते धन्यतेस पावतात व या नारायणाचे अत्यंत प्रिय भक्त होऊन रहातात. अशा भक्तांमुळेच आनंदात असलेला नारायण अधिकच आनंदित होतो आणि सृष्टीरूपाने आपण प्रगट झाल्याचे त्यालाही सार्थक वाटते व तोही स्वतःला धन्यच समजतो.''

नारदाच्या सुस्पष्ट व निःसंदिग्ध बोलण्याने लक्ष्मी अधिकाधिक उत्तेजित होत होती, तशीच ती उत्साहितही होत होती. त्याच उत्साहभरीत अवस्थेत ती नारदाला उद्देशून बोलू लागली.

‘‘हे नारदा, तुझे विषयाचे प्रतिपादन करणे अगदी यथार्थ आहे. सामान्यांच्या अज्ञानाचे व भावनेचे आणि महात्म्यांच्या ठिकाणच्या योग्य जाणिवेचे व त्यांच्याठायी असलेल्या सामान्यांच्या विषयीच्या कळवळ्याचे तू केलेले वर्णन अत्यंत योग्य असेच आहे. दयेचा जणु सिंधुच असलेले त्यांचे अंतःकरण दयार्द्र होते, म्हणूनच ते सर्वांनाच त्यांच्या चरणांचा आश्रय देऊ करतात. भाग्याने मिळालेल्या या संधीचा लाभ जे घेतात त्यांनाच त्या महात्म्यांचे प्रेम प्राप्त होते आणि त्यांचाच उद्धार होण्याची शक्यता निर्माण होते हे मी स्वानुभवाने सांगते. या नारायणाचा सहवास, त्याचे प्रेम मला भाग्याने अगदी सहज मिळाले. त्यामुळे हा नारायण माझा आहे हे मला निश्चितपणे कळाले. परंतु त्याच्या अंतःकरणाशी जवळीकता साधणे मात्र तेवढेसे सोपे नाही हे मी अनुभवाने जाणून आहे. मग त्याच्याठायी ऐक्य पावण्याची भाषा तर दूरच राहिली. परंतु माझ्यावरील आत्यंतिक प्रेमाने त्याने मला देऊ केलेले सख्य हाच माझ्यासाठी आशेचा किरण आहे. सख्यत्वाच्या या नाजूक पण बळकट सूत्रानेच त्याने मला बांधून ठेवले आहे व त्याला स्वतःलाही त्याच सूत्राने त्याने बांधून घेतले आहे. या प्रेमभक्तिच्या सुलभ सूत्रानेच मी त्याला त्याच्या अंतःकरणत गाठू शकेन व त्याला माझ्या अंतःकरणात भेटू शकेन अशी मला पूर्ण खात्री आहे. आपले सख्यत्व देऊन त्याने जो विश्वास माझ्यावर ठेवला आहे, त्या त्याच्या विश्वासाला पात्र होता होताच मी त्याच्याशी निश्चितपणे ऐक्य पावेन असा आत्मविश्वासही माझ्या ठिकाणी त्याच्याच कृपेने निर्माण झालेला आहे.

पण तरीही हे नारदा, मी कुठेतरी नेहमी कमी पडत असते, काहीतरी कमतरता माझ्या मनाठायी माझ्या कळत नकळत राहून जाते असे मला नेहमीच जाणवत असते. पण ती कमसरसता नेमकी कशामुळे आहे व नेमकी कशामुळे जाईल हे माझे मलाच कळेनासे होते. हे नारदा, तुझ्या मुखातून नारायणाचे सगुणचरित्र श्रवण करताना काही काही वेळा मला त्या कमतरतेवरील उपाययोजना सापडल्यासारखी वाटते, परंतु निश्चितपणे मला काही ती धरता येत नाही. त्यामुळे ती प्रत्यक्ष अमलात आणणेही अशक्य होते. तेव्हा हे नारदा, तू मात्र या नारायणाचे कृष्णावतारातील चरित्र सांगत नव्हे, गातच रहा म्हणजे मला त्याच्या श्रवणातूनच खात्रीलायक उपाय हाती गवसण्याची शक्यता आहे. त्यासाठी तू कृष्णचरित्रातील पुढील कथाप्रसंगच वर्णन करून सांगणेच अधिक योग्य आहे, कारण तेच अत्यंत आवश्यक आहे.

अरे नारदा, तो वसुदेव कृष्णासह मोठ्या धैर्याने, जिद्दीने व पराक्रमाने यमुना नदीच्या भर महापुरातून पार होऊन पलीकडे गेलासुद्धा! आपण मात्र अजूनही यमुना नदीच्या जलप्रवाहातच खेळत राहिलो आहोत

असे मला वाटते. आपल्याला त्या प्रवाहात केवळ डुंबत बसायचे नाही किंवा त्या प्रवाहाबरोबर वाहातही जायचे नाही, तर आपल्याला त्या प्रवाहाच्या पार होऊन वसुदेवाच्या पाठोपाठ गोकुळात कृष्णलीला बघण्यासाठी जायचे आहे हे विसरून चालणार नाही. तेव्हा हे नारदा, वसुदेव कृष्णासह गोकुळात येऊन पोहोचल्यावर पुढे काय लीला घडली हेच तू मला आता सांगावेस हेच उत्तम! कारण यमुना नदी पार करून वसुदेव एका मोठ्या संकटातून पार पडला हे जरी खरे असले तरी पुढे येणाऱ्या अजून कितीतरी संभाव्य अडचणी मला माझ्या दृष्टीसमोर दिसत आहेत. त्या अडचणींवर वसुदेवाकडून कशी मात केली गेली हे ऐकायची माझी उत्सुकता अगदी शिगेला पोहोचली आहे. त्यातून कृष्णाचेच माहात्म्य प्रगट होणार आहे हे मी नक्की जाणून आहे. कारण वसुदेवाकडून जो काही पराक्रम घडला तो कृष्णप्रेमामुळेच घडला असणार हे तर निश्चितच! या प्रेमाचेच तर सारे माहात्म्य आहे आणि या प्रेमानेच सर्व आश्चर्य घडते. होय ना नारदा?''

लक्ष्मीच्या बोलण्याने संतुष्ट झालेल्या नारदाला लक्ष्मीच्या बोलण्याचे मात्र हसू येत होते आणि ते त्याच्या मुखावर पूर्णपणे फुलून राहिले होते. त्या हास्यातील मोकळेपणाचाच भाव त्याच्या वाणीतूनही सहजपणे मोकळा होऊ लागला, तरी त्याच्या बोलण्यातील गंभीरता मात्र तशीच व तेवढीच कायम होती.

''हे लक्ष्मी, तुझे बोलणे मोठे चतुरपणाचे आहे. ज्या चातुर्याने तू मला मूळ कथासूत्राचे स्मरण करून दिलेस, ते तर अत्यंत कौतुकास्पदच आहे. परंतु त्याचवेळी तुझ्या मनाठायीची तुला जाणवणारी कमतरता व त्याची वाटणारी खंतही तू प्रगट केलीस त्याचे मला जास्त अप्रूप वाटते. कारण बुद्धीचे चातुर्य मनाच्या अवस्थेला लपवण्यासाठी न वापरता त्या अवस्थेला उघड करण्यासाठी उपयोगात आणण्यातच मनाचा प्रामाणिकपणा व बुद्धीचा सरळपणा आहे. तीच गोष्ट अत्यंत महत्त्वाची म्हणून दुर्मीळही आहे. असो!

आता, सगुण प्रेमानेच सारे आश्चर्य घडते हे तुझे म्हणणे मात्र अगदी योग्यच आहे. परंतु या सगुण प्रेमाचेच सर्व माहात्म्य आहे हे जे तुला वाटत आहे, ते मात्र तेवढेसे बरोबर नाही. कारण नारायणाचे माहात्म्य सर्व सृष्टीरूपाने प्रगट होऊनही त्याच्या पलीकडे केवढेतरी व्यापकतेने आहे. तेव्हा ते माहात्म्य सर्व त्याच्या प्रेमातच भरून राहिले आहे असे नाही. परंतु ते व्यापक माहात्म्य नारायणाच्या प्रेमामुळेच जाणता येते आणि त्याच्या प्रेमातूनच वर आलेल्या त्याच्या भक्तिने त्या माहात्म्याचा अनुभव घेऊन ते स्वानुभवाचेही होऊन रहाते, हे मात्र अगदी शंभर टक्के सत्य आहे. तेव्हा नारायणाच्या माहात्म्याचा अनुभव आणून देणारे

त्याचे प्रेम हे मुलभूत असल्यामुळे अत्यंत महत्त्वाचे तर आहेच, परंतु ते प्रेममूळ जेव्हा नारायणाच्या माहात्म्याच्या स्वानुभवाच्या फलरूप अवस्थेपर्यंत येते तेव्हाच परिपूर्णतेला पोहोचते. तेव्हा तुझ्या ठिकाणी नारायणाविषयी प्रेम निर्माण होऊनही तुला त्या प्रेमात जी काही कमसरसता जाणवते, ती एकतर त्या नारायणाच्या माहात्म्याचे विस्मरण झाल्यामुळे किंवा दुसरे म्हणजे त्या नारायणाचे माहात्म्य व्यापकतेने व यथार्थतेने न जाणल्यामुळेच!

प्रेमासाठी जसा प्रत्यक्ष सहवास, सेवाभाव व प्रेमाचा अंगसंग यांची नितांत आवश्यकता असते, त्याचप्रमाणे नारायणाच्या माहात्म्याच्या सततच्या जागृतीसाठी मात्र नारायणाची अनेक सगुण चरित्रे व त्यातील निरनिराळ्या भावाचे अनेक वेगवेगळे प्रसंग श्रवण करणे व त्यातील नारायणाच्या अंतःकरणातील अनुभवाची एकीएक अवस्था जाणून त्याचा निश्चय करणे हेच महत्त्वाचे आहे. कारण तसा बुद्धीचा निश्चय झाला तरच चित्ताच्या ठिकाणी नारायणाच्या माहात्म्याचा नित्य अनुभव घेण्याचा ध्यास दृढतेने लागू शकतो. या ध्यासामध्ये नारायणाच्या प्रेमाची मनात जागृती व नारायणाच्या माहात्म्याची बुद्धीठायी निश्चिती या दोन्हींचा समन्वय झालेला असतो. किंबहुना प्रेम व माहात्म्य यांचा मेळ साधला असताच चित्ताच्याठायी ध्यास निर्माण होतो. तेव्हा मनात नारायणाचे सगुण प्रेम, बुद्धीठायी नारायणाच्या माहात्म्याचा निश्चय व चित्ताठायी नारायणाशी ऐक्य पावण्याचा ध्यास या त्रयीमधूनच स्वानुभवाची अवस्था साकार होत असते.

हे लक्ष्मी, नारायणाचे प्रेम हे जसे त्याच्या नित्याच्या सहवासातच अनुभवता येते, त्याचप्रमाणे नित्याच्या सहवासातच त्याच्या माहात्म्याचे विस्मरण होण्याचीही शक्यता असते, हीच एक मोठी गंमत आहे आणि तीच ती माया आहे. कारण अति परिचयाने अवज्ञा व अति सहवासाने अनादर होण्याचीही शक्यता तेवढीच असते. परंतु नारायणाच्या माहात्म्याचे विस्मरण अगदी अपवाद म्हणूनही जर झाले नाही, तरच नारायणाचा परिचय जसा जसा वाढतो तसे तसे त्याच्यावरील आपले प्रेमही अधिकाधिक वाढते आणि त्याचा सहवास वाढला असता त्याचे माहात्म्यही अधिकच जाणवून, नारायणाविषयीचा भक्तिभावही अधिकाधिक वाढत रहातो. म्हणूनच नारायणाच्या माहात्म्याच्या पूर्ण जाणिवेने व त्याच्यावरील आत्यंतिक प्रेमाने त्याचा सहवास व संग केला असता, त्याच्या माहात्म्याचा विसरही कधी होत नाही आणि त्याच्या प्रेमाला कधी ओसरही पडत नाही. त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे नारायणाच्या अंतःकरणाविषयीचा ध्यास कायमचा जडतो व नित्य वाढतच रहातो. या ध्यासातूनच निर्माण झालेल्या आर्ततेची पूर्तता केवळ नारायणाच्या

अंतःकरणासारखी अवस्था प्राप्त झाल्यानेच होत असल्यामुळे नारायणाच्या अंतःकरणाशी ऐक्य पावणे भागच पडते. या आंतरिक बळामुळेच मन, बुद्धी व चित्त यांचे वेगळेपण सहजरित्या गळूनच पडते आणि अशा रितीने विशुद्ध झालेल्या अंतःकरणातच नारायणाशी ऐक्य पावल्याचा अनुभव होऊन रहातो. त्या अनुभवाठायी नित्य स्फुरणारी जाणीव सर्वांगाला आनंदाचा अनुभव देत रहाते आणि सर्वांगाने आनंदाचा अनुभव घेत रहाते. हीच ती परमानंदाची परमोच्च अवस्था होय. याच अवस्थेत हा नारायणही नित्य रममाण झालेला असतो. परंतु सगुण प्रेमाच्या भुकेपोटी भक्तांचा रमण होऊन त्यांनाही आपल्या सगुण प्रेमाने रंगवितो आणि त्यांच्या ठिकाणीही हेच प्रेम निर्माण करून त्यांनाही त्यातच रमवितो. म्हणूनच नारायणाच्या अंतःकरणातील स्वानंदाचा अनुभव हा भक्ताच्याही अंतःकरणाचा अनुभव होऊ शकतो. हे लक्ष्मी, अंतःकरणाच्या या अवस्थेतून जे प्रेमाचे पूर लोटत असतात त्यापुढे त्या यमुना नदीला आलेला महापूर तर काहीच नाही. यमुना नदीला आलेला पूर हा मुसळधार पाऊस व जोरदार वारा या बाह्य कारणांमुळे असल्यामुळे कालांतराने ओसरलाही असणार. परंतु माझ्या आंतरिक प्रेमप्रवाहाला आलेल्या पुराला ना कधी ओसर पडणार, ना कधी विसर पडणार!

तेव्हा हे लक्ष्मी, मला कृष्णचरित्र वर्णन करण्याविषयीचे स्मरण व व्यवधान पूर्णपणे आहे. मी ते अजिबात विसरलो नाही. परंतु या सगुण चरित्राच्याद्वारे नारायणाच्या सगुण प्रेमाचा अनुभव घ्यायचा आहे हे मात्र माझ्या लक्षात पूर्णपणे आहे. किंबहुना, सगुण चरित्र वर्णनाचा तोच तर मूळ हेतू आहे, तेच तर मुख्य कारण आहे. त्यामुळे होते काय? तर जेव्हा मी या नारायणाच्या सगुण प्रेमकथा वर्णन करू लागतो, तेव्हा माझ्या अंतरात नित्य निनादणारा प्रेमसूर नादरूपाने बाहेर प्रगट होतो व माझ्या सगुण कथा वर्णनाचे रूपांतर सगुण प्रेम गायनात होते. त्या प्रेमसूरांच्या लयीत माझा मीच विलयाला गेल्यासारखा होतो आणि त्या प्रेमनादाची तर एक धुंदीच माझ्याठायी निर्माण होऊन माझे तर सर्व देहभानच हरपल्यासारखे होते. या सर्वांतून माझ्या अंतःकरणात नित्य स्त्रवणारा प्रेमरस अधिकच जोराने व वेगाने पाझरू लागतो. त्या प्रेमरस सेवनाने जरी परमतृप्ती झाली तरी समाधान होत नाही. त्या असमाधानामुळेच प्रेम अनुभवून प्रेम वर्णन करण्याची व प्रेम वर्णन करून प्रेम अनुभवण्याची ऊर्मी अंतरात पुन्हा पुन्हा निर्माण होत रहाते. या प्रेम ऊर्मीमुळेच पुन्हा देहभान येते आणि देहाच्या अस्तित्वाच्या आधारानेच या प्रेम ऊर्मीची पूर्ती होत रहाते. त्या पूर्तीसाठीच पुन्हा सगुण चरित्र माहात्म्य अंतरात स्फुरू लागते आणि पुन्हा सगुण चरित्र कथाच प्रगट होऊ लागतात.

तेव्हा हे लक्ष्मी, जोपर्यंत सगुण चरित्र वर्णनाची ही आंतरिक प्रेरणा कायम आहे, आणि तशी ती देहाचे अस्तित्व असेपर्यंत नेहमीच असणार, तोपर्यंत सगुण कथांचे गायन होत रहाणार आणि रहाणारच! परंतु लक्ष्मी, एका गोष्टीची मनात निश्चितपणे खूणगाठ बांधून ठेव की, आपल्याला वसुदेवाच्या पाठोपाठ गोकुळात जायचे नसून, कृष्णाच्या बरोबर गोकुळात प्रवेश करायचा आहे आणि नित्य त्याच्या बरोबरच रहायचे आहे. माझे म्हणणे बरोबर आहे ना लक्ष्मी?''

नारदाचे बोलणे ऐकून लक्ष्मीने आपले दोन्ही कर जोडून त्याला वंदन केले व स्मित हास्यपूर्वक त्याला म्हणाली,

''हे नारदा, तू बोलण्यात शब्दाने कोणालाही हार जाणे शक्यच नाही आणि कोणीही तुला शब्दातही पकडू शकणार नाही. अर्थात तू केवळ शब्दांचे खेळ करीत नाहीस किंवा तुझे बोलणे हे केवळ शब्दांच्या सामर्थ्यावर घडत नाही हे मला ठाऊक आहे. तुझे सर्व सांगणे व बोलणे एवढेच नव्हे, तर तुझे सर्व वागणे व जगणे हे एकीएक भावबळाचेच असते हेही मी पूर्णपणे जाणून आहे. हे भावबळ तुला आत्मबळातूनच प्राप्त होत असणार आणि हे आत्मबळ देखील तुझ्याठायी या नारायणालाच तू आत्मसात केल्यामुळे असणार याची मला पूर्ण खात्री आहे. परंतु मुख्य प्रश्न व अडचण हीच आहे की नारायणाला आत्मसात कसे करावे? यासाठी काही निश्चित मार्ग व उपाय आहे का हे जाणून घेण्यास मी सदैव आतुर असते. खरे सांगायचे तर तुझ्या मुखातून या नारायणाच्या सगुण चरित्रकथा श्रवण करीत असतानाही असे काही खात्रीलायक उत्तर सापडते का हेच मी शोधीत असते. खरेच नारदा, या नारायणाला अगदी पूर्णपणे आत्मसात तू केलेस तरी कसे? तू तरी काही निश्चितपणे सांगू शकशील का?''

लक्ष्मीच्या बोलण्यावर मंदस्मित करून उत्स्फूर्तपणे नारद उद्गारला, ''अगं लक्ष्मी, या नारायणाला स्वबळाने, ज्ञानाने, तपश्चर्येने, व्रतवैकल्याने किंवा कोणत्याही बाह्य उपायांनी कधीच आत्मसात करता येणार नाही. फक्त त्याच्या अनन्य भक्तांनाच तो प्रेमाने वश होतो व स्वतःहून स्वतःला त्यांच्या स्वाधीन करीत असतो. म्हणूनच भक्तांना त्याची प्राप्ती होत असते हे त्रिवार सत्य आहे. त्यामुळे 'मी नारायणाला आत्मसात केले' असे अहंकाराने म्हणण्यालाही कोणालाच संधी अथवा वाव नाही. अर्थात, आता एकच महत्त्वाचा प्रश्न शिल्लक रहातो, तो म्हणजे या नारायणाचे अनन्य भक्त व्हावे कसे? ही अनन्यता यावी कशी? तर त्याचेही उत्तर या नारायणाठायीच आहे. अंतःकरणाच्या प्रेमस्वरूप अवस्थेमुळे हा नारायण प्रेमाचा अनुभव

घेण्यासाठी नित्य आसुसलेला असतो.  स्वतःठायीच स्वप्रेमाचा स्वानंद अनुभवीत असताना, तो प्रेमानंद बाह्यांगानेही अनुभवण्याची प्रबळ ऊर्मी त्याच्या अंतःकरणात अचानक, अकारण व उत्स्फूर्तपणे निर्माण होते. त्यातूनच तर या सृष्टीची आणि सृष्टीतही मानवाची निर्मिती झाली.  त्यामुळे साहजिकच नारायणाला मानवाविषयी आत्यंतिक आपलेपणा वाटत असतो.

स्वतःचे प्रेम अनुभवण्यासाठी नारायणालासुद्धा या एवढ्या प्रचंड सृष्टीत मानव हेच एकमेव माध्यम उपलब्ध आहे.  त्यामुळे हा नारायण त्याच्या सगुण अवतारात सर्व मानवांशी जवळीकता साधण्यास नित्य आतुरच असतो.  कारण ती त्याची स्वतःचीच आत्यंतिक गरज असते.  सामान्यजन काळाच्या ओघात आपण नारायणाचे अंश आहोत हेच विसरून जातात.  परंतु नारायणाच्या अवतारचरित्रात मात्र त्याच्या ठायी ती जाणीव सदैव असते.  सामान्याच्या ठिकाणी अज्ञानाने विस्मरण घडते व विस्मरणाने अज्ञान अधिकच वाढते. एवढेच नव्हे, तर पुढे चुकीच्या व विपरीत ज्ञानाने अज्ञान घट्ट होत जाऊन, त्याचा हट्टच होतो व त्या अज्ञानाठायी अहंकारच निर्माण होतो.  या अहंकाराचा छेद घेणे व तो नष्ट करणे अत्यंत कठीण होऊन बसते आणि अहंकार नाहीसा झाल्याशिवाय अज्ञान दूर होणे तर शक्यच नाही.

अशाही परिस्थितीत स्वतःच्याच प्रेमस्वरूपाचा बाह्यांगानेही अनुभव घेण्याच्या सखोल व उत्कट ऊर्मीपोटीच, जणु त्याची स्वतःचीच आत्यंतिक निकड म्हणून या नारायणाने कृष्णावतारात एक पाऊल पुढेच टाकले.  त्याने स्वतःहून पुढाकार घेऊन सामान्य, अज्ञानी जीवांना जवळीक देऊ केली, स्वतःचा सहवास देऊ केला आणि स्वतःचे प्रेम देऊन त्यांना आपल्या जवळ घेतले, हेच कृष्णचरित्रातील विशेषत्व आहे आणि हीच कृष्णचरित्रातील खासियत आहे.''

नारदाचे बोलणे ऐकून आश्चर्य पावणाऱ्या लक्ष्मीचे नेत्रही विस्फारीत होत होते.  त्याच अवस्थेतून तिच्या मुखातून पटकन शब्द बाहेर आले, ''हे नारदा, नारायणाने हे पुढे टाकलेले पाऊल म्हणजे त्याने उचललेली ही केवढी तरी जोखीमच नव्हे काय?  दुसऱ्यांच्या हितासाठी म्हणून का होईना, परंतु त्यांनी स्वतःहून इच्छा व्यक्त केली नसताना किंवा एखादे वेळेस त्यांना नकोही वाटत असताना, थोडेसे त्यांच्या इच्छेविरूद्धच म्हणा ना, परंतु सामान्यांशी अशी स्वतःहून जवळीक साधणे कितपत आवश्यक होते?  व ते योग्य होते का?  कारण एखाद्याला जरुरी वाटत नसतानाही त्याला एखादी मूल्यवान गोष्ट देऊ केली तर त्याच्याकडून त्याचे अवमूल्यन होण्याचीच शक्यता जास्त आहे.  हे नारदा, खरेच असे विशेष कृष्णचरित्र

श्रवण करण्याची माझीच निकड आता अगदी पराकोटीला गेली आहे. ती माझी निकड भागवणे आता केवळ तुझ्याच हातात आहे, म्हणजे खरे तर तुझ्या हृदयातच आहे. परंतु मला अजूनही एक गोष्ट लक्षात येत नाही, की विनाकारण दुसऱ्याशी जवळीकता साधून त्याला आपले प्रेम देऊ करण्याच्या या नारायणाच्या प्रगटलेल्या स्वभावाला म्हणावे तरी काय?''

लक्ष्मीच्या बोलण्याने उत्तेजित होत असलेला नारद लागलीच उद्गारला, ''आत्यंतिक आपलेपणा! हे लक्ष्मी, तुझ्या सर्व प्रश्नांचे उत्तर या दोन शब्दातच आहे. तेच नारायणाच्या सर्व चरित्राचेही कारण आहे. सृष्टीरूपाने प्रगट होणे, त्यात मानवांची निर्मिती करणे, पुन्हा स्वतः त्यात मानव देहाने अवतरणे आणि त्यातही आपल्या प्रेमाचे भक्त निर्माण करून आपण स्वतः त्यांचा देव होणे व देवभक्तांचा आनंददायी प्रेमखेळ रंगवणे या नारायणाच्या सर्व अद्‌भूत लीलांचे एकच कारण म्हणजे या नारायणाठायी सहजपणे व स्थायीभावाने असलेल्या आत्यंतिक आपलेपणातून निर्माण झालेले अकारण प्रेम हेच होय! अर्थात हे लक्ष्मी, हा आपलेपणा व हे प्रेम सुरुवातीला एकतर्फी म्हणजे नारायणाकडूनच असणार हे तर साहजिकच आहे. त्याचा आनंद तो नेहमीच अनुभवीत असतो. त्यातूनच तो आपलेपणा व ते प्रेम दुतर्फा निर्माण झाले, की मग त्या नारायणाच्या आनंदाला जणु उधाणच येते. अशा प्रेमाच्या देवघेवीतूनच भक्त घडत असतात व त्या भक्तांचा सहवास नारायणाला अत्यंत प्रिय असतो. अशा प्रेमी भक्तांच्या परिवारातच हा नारायण शोभून व उठून दिसतो आणि त्याच्या व भक्तांच्या आनंदाला पारावार उरत नाही. तेव्हा आधी सामान्यांत मिसळणे, मग त्यांच्याशी मिळणे व त्यातूनच प्रेमीभक्तांचा मेळ साधून त्यांचा मेळा जमविणे हा कृष्णावतारात नारायणाने मांडिलेला खेळ खरेच अद्‌भूत तर होताच, परंतु अत्यंत रोमहर्षक व मुख्यतः अतीव परमानंदाचा होता. हे लक्ष्मी, आता मात्र त्या प्रेमरसपूर्ण कृष्णचरित्राचे रसभरित वर्णन केल्याशिवाय मला चैन पडणार नाही.''

*****

# नंद-वसुदेव भेट

नारदाच्या बोलण्यावर लक्ष्मीने स्मितहास्य करून संमतीदर्शक मान डोलवली. नारदाची सगुणसंकीर्तन करण्याची अंतरातील ओढ आणि लक्ष्मीची श्रवणभक्ती करण्याची मनातील आर्तता अशा परस्पर पूरक अवस्थांच्या संयोगातून निर्माण झालेला सगुणभक्तीचा प्रेमरस नारदाच्या वाणीतून स्त्रवू लागला.

''हे लक्ष्मी, कृष्णासह वसुदेव मोठ्या पराक्रमाने यमुना नदीला पार करून गोकुळात सुखरूप येऊन पोहोचला. हे परमेश्वराच्या कृपेनेच घडले असे जाणून त्याने कृतज्ञता भावाने परमेश्वराचे आभार मनातल्या मनात मानले. साक्षात नारायणच कृष्णरूपाने अवतरला आहे याचे अज्ञान जरी त्याच्या ठिकाणी असले, तरी त्याच्या ठिकाणी परमेश्वराच्या व्यापक सत्तेबद्दल मात्र नितांत श्रद्धा होती आणि त्याच्या अवस्थेनुसार ते योग्यच होते. अज्ञान असणे ही सहजावस्था आहे, परंतु ईश्वराविषयीचा आस्तिक्यभाव असणे हे महत्त्वाचे. कारण त्यामुळे परमेश्वरासंबंधीचे विचार व कृतज्ञताभाव तरी मनात कायम रहातो. तीच कृतज्ञता मनाला थोडावेळ का होईना, पण प्रसंगाला सामोरे जाण्याचे धैर्यबळ प्राप्त करून देते आणि प्रसंगात रक्षण मिळावे म्हणून परमेश्वराला आळवण्याची बुद्धी तरी होते. असो.

येथे गोकुळातही श्रावणधारा नुसत्या बरसत नव्हत्या तर कोसळतच होत्या. सर्व सृष्टीच जलमय झाल्यासारखी दिसत होती आणि एकीएक जलच सर्वत्र दृष्टीला येत होते. अशा पर्जन्य ऋतुच्या ऐन बहरात वसुदेव नंदराजाच्या वाड्यापर्यंत मोठ्या मिनतवारीने येऊन पोहोचला. मध्यरात्रीची वेळ, बाहेर दाट काळोख, तर राजवाड्यात दिव्यांचा अतिशय मंद प्रकाश आणि त्यातून पावसाने धरलेला अभूतपूर्व जोर, अशा परिस्थितीत राजवाड्यातील एकंदरीत वातावरण सामसुमीचेच होते. काही तुरळक व्यक्तिमात्रांचे केवळ आकार मात्र दिसत होते. परंतु व्यक्तिची ओळख अजिबात होत नव्हती. तशाही परिस्थितीत ज्यामध्ये कृष्णाला झोपवले व लपवले आहे अशी मोठी टोपली आपल्या हातात धरून व आपला चेहरा साध्या वस्त्राने झाकून वसुदेव नंदाच्या वाड्यात प्रवेश करता झाला. त्याची नजर त्याच्या परममित्र नंदराजाला शोधित होती. परंतु नंदराज कोठेच त्याच्या दृष्टोत्पत्तीस येईना. बरे, आजूबाजूला कोणाला विचारणेही शक्य नव्हते. सर्व गोष्टी गुपचूपच करायच्या होत्या. असा थोडा वेळही वसुदेवाच्या दृष्टीने अत्यंत काळजीचा होत होता.

तोच अचानक साक्षात नंदराजच नकळतपणे, म्हणजे अगदी योगायोगानेच वसुदेवाच्या समोर आला. नंदराजाचे तर लक्षच नव्हते आणि वसुदेवाला तर त्याने त्यावेळी ओळखणे शक्यच नव्हते. एक तर नंदराजाला त्यावेळी वसुदेवाला गोकुळात अपेक्षित करण्याचे कारणच नव्हते आणि दुसरे म्हणजे तशी त्याची व वसुदेवाची बऱ्याच कालावधीत भेटही झालेली नव्हती. परंतु वसुदेवाचेच नंदराजाकडे चटकन लक्ष गेले. कारण अर्थातच नंदभेटीसाठी वसुदेवच अत्यंत व्याकूळ झालेला होता. वसुदेवाने साहजिकच नंदराजाला लगेचच ओळखले आणि आपल्या हाताने त्याच्या हाताला स्पर्श करून त्याचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले. नंदाने एकदम आश्चर्याने वळून वसुदेवाकडे पाहिले असता आधी तर त्याने वसुदेवाला ओळखलेच नाही. प्रश्नार्थक चेहऱ्याने तो वसुदेवाकडे पहातच राहिला असता वसुदेवाने स्वतःच्या चेहऱ्याला झाकणारे वस्त्र थोडेसे बाजूला केले व तो हळुवार स्वरात उद्गारला, 'अरे नंदा, माझ्या मित्रा, मी तर तुझा मित्र वसुदेव आहे. मला ओळखलेस ना?' वसुदेवाच्या बोलण्याने एकदम चकित झालेल्या व जरासा भयभीतही झालेल्या नंदाने प्रथम वसुदेवाला प्रेमाने जरी आलिंगन दिले, तरी त्याची भयचकितता जराही कमी झाली नव्हती. त्याने आधी वसुदेवाला बाजूला एकांत जागी घेतले आणि मनाच्या साशंक अवस्थेतच तो वसुदेवाशी हळू आवाजात बोलू लागला.

''अरे वसुदेवा, माझ्या परममित्रा, तू आत्ता इकडे कसा? माझा तर माझ्या डोळ्यांवरही विश्वास बसत नाहीये. तुला तर त्या दुष्ट कंसाने देवकीसह तुरूंगात टाकलेले होते. एवढ्यानेच त्या नराधमाचे समाधान न होता, त्याने तुमच्या सात नवजात पुत्रांची अमानुषतेने हत्याही केली. अशा क्रूरकर्मी पाप्याला तर नरकातही जागा मिळणे शक्य नाही. त्याच्या या पापकृत्यांची सर्व बातमी मला माझ्या मथुरेतील मित्रांमार्फत मिळत होती. ते ऐकून माझी तळपायाची आग अगदी मस्तकापर्यंत पोहोचत होती. माझ्या मनात तर आगीचा डोंब उसळत होता. परंतु मलाही काहीच करता येणे शक्य नव्हते हे तूही समजून आहेसच. तुझी असहाय्यता मलाही कळत होतीच, परंतु मी स्वतःच अगतिक झाल्यामुळे मलाही नुसते स्वस्थ बसून रहाणे भागच पडत होते. ते असो.

पण मित्रा वसुदेवा, तुला येथे पाहून मला मात्र आश्चर्याचा सुखद धक्काच बसला आहे. तरीही मला तुझी अत्यंत काळजीच वाटत आहे. कारण अशा काळोख्या मध्यरात्री आणि तुफान वादळात तू मथुरेहून आणि तोही एकटा येऊच कसा शकलास? आणि तुझ्या हातात ही टोपली कसली? त्यात काय अशी

महत्त्वाची गोष्ट आहे, की जी तू या भयानक वातावरणातही तुझ्याजवळ बाळगली आहेस? बरे, देवकीची काय खुशाली आहे? ती तरी सुखरूप आहे ना? हे वसुदेवा, तू मला सर्व काही निःसंकोचपणे सांग. काहीही अनमान करू नकोस. तुझ्यावर आलेल्या कोणत्याही संकटात व अडचणीच्या परिस्थितीत तुला सर्वतोपरी मदत करणे हे केवळ माझे मित्रकर्तव्यच आहे असे नसून, तो तर माझा स्वधर्मच आहे. खरे म्हणशील, तर माझ्याही मनात थोडीशी काळजी व अस्वस्थताच निर्माण झालेली आहे. परंतु ते सर्व बाजूला करून आधी तुला मदत करणे हे माझे प्रथम कर्तव्य आहे. तरीही हे वसुदेवा, आता जराही वेळ न दवडता मला सर्वकाही त्वरित सांग.''

नंदाच्या बोलण्यातून वसुदेवाविषयीचे मित्रप्रेम व त्याच्याविषयीची आस्था अगदी भरभरून वहात होती. त्याचाच स्पर्श वसुदेवाच्या मनाला झाला आणि एवढा वेळ मोठ्या धैर्याने व प्रयासाने त्याने मनात आवरून धरलेले त्याचे दुःख व काळजी यांचा त्याच्या मनावरील ताण हळुहळू सैल होऊ लागला. त्याच्याठायी नंदाविषयीचे असलेले मित्रप्रेम व कृतज्ञताभाव दाटून आला व नेत्राद्वारे ओघळू लागला. त्यामुळे त्यालाही बरेचसे हलके वाटू लागले.

वसुदेवाने आपल्या हातातील टोपली आधी अलगदपणे एका बाजूला सुरक्षित जागी पण अगदी जवळच ठेवली आणि त्याने नंदाला सर्व इतिहास व घडलेल्या घटना क्रमवार सांगितल्या. त्या ऐकता ऐकता नंदाचेही अंग रोमांचून आले व त्याचेही नेत्र अश्रूपूर्ण झाले. वसुदेवाने बरोबर आणलेल्या टोपलीचे झाकण बाजूला करून ती टोपली नंदासमोर धरली असता, त्यातील त्या सुकुमार, गोंडस व तेजस बालकाला पाहून तर नंदाचे सर्व देहभानच हरपले. त्याने एकदम त्या अर्भकाला उचलून आपल्या छातीशी धरले असता नंदाच्या ठिकाणचा पितृभाव एकदम जागा झाला आणि त्याच्या नेत्रातून वाहणाऱ्या अश्रूंच्या धारांनी जणु त्या बालकालाच स्नान होऊ लागले. आपला भावनावेग नंदाने कसाबसा आवरला व त्याने स्वतःला सावरले. त्या सुकुमार बालकाला त्याने पुन्हा हळुवार हाताने त्या टोपलीत ठेवले आणि भावपूर्ण मनाने व स्वराने तो वसुदेवाला उद्देशून बोलू लागला.

''हे वसुदेवा, तुला ज्या कठीण परिस्थितीतून व ज्या घोर संकटातून जावे लागत आहे, ते ऐकून व पाहून माझे अंतःकरण तर अगदी कळवळूनच गेले आहे. माझ्याच काय, पण कोणाही सहृदय माणसाच्या अंतःकरणाला पीळ पाडणारा असाच तुझा जीवनातील अनुभव आहे. केवळ तूच म्हणून या कठीण प्रसंगातून

धैर्याने तगून आहेस नव्हे, तर प्रत्यक्ष आज तरूनही आला आहेस. खरेच, तुझ्या पराक्रमाचे व तू घेतलेल्या भूमिकेचे मला अत्यंत कौतुक आहे. तुझ्या पाठीशी तर प्रत्यक्ष परमेश्वरच उभा आहे याची मला पूर्ण खात्री आहे. आणि तुझ्या पाठीशी नव्हे, तर तुझ्या बरोबरीने उभा राहून मी तुला सर्वतोपरीने सहाय्य करण्यासाठी सदैव सज्ज आहे. आता तू पुढे काय करायचे ठरवले आहेस? या तुझ्या सुदैवी पुत्राला तू इथपर्यंत तर सुखरूप आणलेस. आता पुढे त्याची तजवीज कोठे व कशी करण्याची तुझी योजना आहे? मला तू सविस्तर व सत्वर सांग. म्हणजे आपण ताबडतोब त्याच्या कार्यवाहीला सुरुवात करू. वेळ अत्यंत कमी आहे. आणि तू पुढे काय करणार आहेस? कारण थोड्या वेळानंतर तुझी शोधाशोध कंसाकडून तातडीने सुरू होईल. तूर तर स्वतःला कुठेही लपवू शकणार नाहीस व कंसाच्या तावडीतून वाचवूही शकणार नाहीस. आणि मग देवकीचे काय? तिच्या सुरक्षिततेसाठी तुझी काय योजना आहे? तू काहीतरी मनात निश्चितपणे ठरवूनच येथे आलेला असणार याची मला खात्री आहे. तेव्हा तू सर्व काही अगदी मोकळेपणाने सांग बघू. अजिबात वेळ दवडू नकोस.''

नंदाच्या खंबीर व आश्वासनपूर्वक बोलण्याने वसुदेवाला मनात अगदी मोकळे मोकळे वाटले आणि त्याच मोकळेपणाने तो बोलू लागला, ''हे नंदा, तुझे मित्रप्रेम हाच मला मनापासून व पहिल्यापासून आधार वाटत होता. तुझाच भरवसा धरून मी येथपर्यंत आलो आणि तुझाच भरवसा धरून मी आता येथून जाणार आहे. कोठल्याही परिस्थितीत मला पुन्हा मथुरेला सूर्योदयाच्या आत परत जाऊन कंसाच्या कारावासात पुन्हा अडकून बसलेच पाहिजे. कारण मी तेथे नाही हे कंसाला कळल्यावर तो क्रूरकर्मा देवकीला जिवंत ठेवणे शक्यच नाही. पुढे मलाही शोधून काढणे त्याला कठीण होणार नाही आणि माझीही गत तो नक्कीच देवकीसारखीच करणार याची मला पूर्ण खात्री आहे. तेव्हा कुठल्याही परिस्थितीत मला मथुरेला परत जाणे अत्यंत आवश्यक आहे आणि ते मी हरप्रयत्नाने शक्य करीनच. ज्या परमेश्वराच्या कृपेने मी मथुरेहून येथपर्यंत गोकुळात आलो, त्याच परमेश्वराच्या कृपेने मी येथून परत मथुरेला सुखरूपपणे जाईन असा माझा विश्वास आहे.

आता मुख्य आणि महत्त्वाची गोष्ट या माझ्या सुपुत्राची आहे. तो अतिशय भाग्यवान तर आहेच, कारण कंसाच्या कारागृहात जन्माला येऊनही त्याची त्वरित सुटका झाली. परंतु त्याचबरोबर तो अत्यंत पराक्रमीही आहे. जन्माला आल्याबरोबरच त्याने त्याचा पराक्रम दाखवायला सुरुवात केली. पहिला पराक्रम

त्याने केला तो म्हणजे त्याने मला आयुष्यात प्रथमच एवढा पराक्रम करण्यासाठी उद्युक्त केले. कंसाच्या त्या पहारेकऱ्यांच्या कठोर मनाच्या ठिकाणीही दया व कळवळा निर्माण करून, त्यांना माझ्यासाठी सहाय्यभूत केले हा तर या माझ्या पुत्राचा केवढातरी मोठाच पराक्रम आहे. त्याच्या मनमोहक रूपाने व हास्यानेच हा सर्व पराक्रम घडला आहे हे तर निश्चितच. अशा माझ्या या पुत्राला सुरक्षितपणे कुठे ठेवावे हा प्रश्न हे नंदा, तूच सोडवू शकशील. कारण माझ्यासाठी तुझ्यापेक्षा खात्रीलायक व भरवशाची जागा व व्यक्ति दुसरी कोणी असणे शक्यच नाही. याच खात्रीने व योजनेने मी येथपर्यंत तुझ्याकडे येण्याचे धाडस करू शकलो. तेव्हा हे माझ्या मित्रा, या बालकाला तुझ्याच राजवाड्यात तू सांभाळावेस व वाढू द्यावेस अशी मी तुला माझ्यातर्फे व देवकीच्याही तर्फे कळकळीची विनंती करतो. कारण हीच जागा अशी सुरक्षित आहे की ज्याची शंका कंसाच्या मनात कधीही येणार नाही. अर्थात तुलाही तुझी पत्नी यशोदा हिच्याशी विचारविनिमय करावा लागेल हे मीही जाणून आहे. तीही या योजनेला विरोध न करता संमती देईल याचा मला विश्वास आहे.

पण मित्रा, एक गोष्ट मी तुला निश्चितपणे सांगतो, की तुझीही काही अडचण असल्यास ती तूही मला तेवढ्याच मोकळेपणाने सांगितली पाहिजेस. कारण जशी माझी अडचण ही तुझी अडचण आहे, तसेच तुझी अडचण ही सुद्धा माझीच अडचण आहे. मगाशी आपल्या प्रथम भेटीतच तुझ्याकडे पाहिले असता तूही काहीतरी काळजीत असावास असे मला पाहताक्षणीच जाणवले. तेव्हा तशीच काही अडचणीची परिस्थिती असल्यास मोकळेपणाने सांग. अशा परिस्थितीत तुझ्यावरती अकारण वृथा भार टाकावा असे माझ्या मनात कधीही येणार नाही. तुला जर ही जबाबदारी घेणे केवळ अशक्यच असेल तर तू तसे मला स्पष्टपणे सांगावेस. तुझ्या नकाराने माझ्या मनात कोणतीही नाराजी किंवा तुझ्या मैत्रभावाविषयी शंका येणार नाही याची तू खात्री बाळगून रहा. पण एक गोष्ट मात्र मी तुला निश्चितपणे सांगतो की यदाकदाचित जरी तुला काही कारणामुळे माझ्या या पुत्राला तुझ्याकडे ठेवणे शक्य झाले नाही, तर मी त्याला दुसऱ्या कोठेही न ठेवता परत मथुरेला कंसाच्या कारागृहात घेऊन जाईन. मग पुढे काय घडेल ते त्या परमेश्वराच्या इच्छेनुसार आणि माझ्या, देवकीच्या व या बालकाच्याही प्राक्तनानुसार घडेल असा विश्वास माझ्या ठिकाणी आहे. परमेश्वरी नियतीनुसार जे काही घडेल, मग अगदी मृत्यूही जरी आला तरी मी त्याचा विनातक्रार, कोणालाही दोष न देता व आनंदाने स्वीकार करीन.''

एवढे बोलून वसुदेव स्तब्ध झाला व स्वस्थ उभा राहिला. त्याच्या बोलण्यातील काकुळती, आत्मीयता व धीरोदात्तता हे सर्व भाव त्याच्या मुखावरही तेवढ्याच प्रकर्षाने प्रगट झालेले होते.

वसुदेवाचे भावपूर्ण व निश्चयात्मक बोलणे ऐकून नंदही भारावला. त्याच अवस्थेत तो वसुदेवाच्या आणखीन जवळ आला. त्याने वसुदेवाचे दोन्ही हात आपल्या हातात धरून किंचित दाबले आणि त्याच्याकडे आश्वासनपूर्वक नजरेने पाहून तो बोलू लागला.

''हे वसुदेवा, तू ज्या विश्वासाने व माझा भरवसा धरून माझ्याकडे आला आहेस तो योग्यच आहे. कोणत्याही परिस्थितीत तुझा माझ्यावरील विश्वास व भरवसा मी सार्थ ठरवीन असे मी तुला वचनच देतो. मग तर झाले? आता अजिबात काळजी करू नकोस. या तुझ्या सुलक्षणी पुत्राची सर्व जबाबदारी मी केवळ मित्रकर्तव्य म्हणूनच नव्हे, तर स्वखुशीने व आनंदाने स्वीकारीत आहे. तुझ्या पुत्राला मी माझ्या पुत्रासारखाच, माझा जीव की प्राण म्हणूनच सांभाळेन व वाढवेन. तू अगदी निश्चिंत रहा. आता तू मात्र येथून त्वरित निघण्याचे करावेस हेच अधिक योग्य होय. क्षणन् क्षण महत्त्वाचा आहे. थोडीशी दिरंगाईही घातक ठरू शकेल आणि एवढ्या कष्टपूर्वक व पराक्रमाने तू पार पाडलेली ही योजना क्षणात बारगळण्याची शक्यता आहे. तेव्हा तशा संधीला अवधीच न देता तू तुझ्या परतीच्या प्रवासाला त्वरित निघावेस हेच बरे. तुझ्या पुत्राची खुशाली तुला कळवण्याची व्यवस्था मी कोणत्या ना कोणत्या प्रकारे करीत राहीन. त्यानंतर ईश्वरी नियतीत काय घडेल ते पाहू व त्याचा धैर्याने स्वीकार करू. तो ईश्वरच आपल्याला सबळ करील अशी पूर्ण खात्री माझ्याठायी आहे. त्याच्याच कृपेने या कंसाच्या दुष्टचक्रातून आपली सर्वांचीच सुटका होईल व पुन्हा शांती व सुख-समाधानाचे दिवस आपल्या सर्वांनाच लाभतील अशी निश्चित ग्वाही, माझी ईश्वरावरील गाढ व दृढ श्रद्धा मला देत आहे.''

नंदाचे धैर्याचे व धीराचे शब्द ऐकून वसुदेवालाही निश्चिंत वाटले व त्याचेही नेत्र पाणावले. त्याने नंदाच्या खांद्यावर हात ठेवून त्याला अत्यंत कौतुकाने व प्रेमाने थोपटले. एका मोठ्या काळजीतून मुक्त झाल्याचा विश्वास व आनंद त्याच्या मुखावर सहजपणे दिसू लागला. तरीही थोड्याशा सावधपणे तो नंदाशी पुन्हा बोलू लागला.

‘‘हे नंदा, तुझ्या मित्रप्रेमाचे कौतुक करायला खरेच माझ्यापाशी शब्दच नाहीत. तुझे आभार मानून मी आपल्या स्नेहभावाला जरासुद्धा गालबोट लावू इच्छित नाही. माझ्या पुत्राच्या येथे रहाण्यामुळे तुझ्यावरही पुढे संकटे येण्याची शक्यता तुला माहीत असूनही, तू केवळ माझ्या हितासाठी म्हणून हा निर्णय घेण्याचे धैर्य दाखवलेस, याला तर या जगात कसलीच तोड नाही. आपल्या मैत्रीला तर तू धन्यच केलेस यात शंकाच नाही.

परंतु हे नंदा, या मित्रकर्तव्यातील व मित्रप्रेमातील माझ्या बाजूचीही पूर्ती मलाही करायचीच आहे. येथे आल्यानंतर तुझ्या चेहऱ्यावरही काळजी व दुःखाची छटा आहे हे माझ्या लगेचच लक्षात आले होते. परंतु माझ्या दुःखाचा भर माझ्या ठिकाणी जास्त असल्यामुळे माझीच व्यथा माझ्याकडून आधी प्रगट झाली खरी. पण तरीही तुझ्या दुःखी व व्यथित मुद्रेला मी विसरलेलो नाही. तुझेही दुःख जाणून घ्यायचा माझाही तेवढाच हक्क आहे. माझ्या संकटात जसा तू मला सहाय्यभूत झालास तसे मी तुला सध्याच्या माझ्या परिस्थितीत बाह्यांगाने काहीच सहाय्य करू शकणार नाही हे खरे आहे. पण तरीही तुझ्या दुःखात सहभागी होऊन निदान तुझे दुःख थोडेसे का होईना पण हलके केल्याचे समाधान तरी मला लाभेल. तरीही हे मित्रा, जसे मी माझे दुःख तुला सांगितले तसे तूही तुझे दुःख मला सांगून तुझे मन मोकळे करावेस. कारण हे अगदी आपल्या मैत्रीला धरून व योग्यच होईल.’’

वसुदेवाच्या बोलण्याने नंदाचा चेहराही एकदम गंभीर झाला. वसुदेवाच्या दुःखात एवढा वेळ विसरलेल्या त्याच्या दुःखाचे त्याला पुन्हा स्मरण झाले आणि त्याच्या व्यथित भावाने पुन्हा त्याच्या अंतराला क्षणात ग्रासून टाकले. मोठ्या कष्टाने त्याच्या मुखातून एकेक शब्द बाहेर येऊ लागले.

‘‘हे मित्रा, वसुदेवा! तुझे म्हणणे अगदी बरोबर आहे. तू येण्याच्या समयाला मीही मोठ्या अडचणीतच आलो होतो. अरे तुला काय सांगू? किती विचित्र योगायोग आहे बघ हा! वसुदेवा, ज्या वेळेस तू तुझ्या पुत्राला घेऊन माझ्या वाड्यात प्रवेश करीत होतास, त्याच्या आधीच थोडावेळ माझ्या पत्नीने, म्हणजे यशोदेने एका कन्यारत्नास जन्म दिला होता. एवढ्या मध्यरात्री ही वार्ता प्रसूतीस सहाय्य करणाऱ्या सुईणीने मला येऊन सांगितली असता, मी मोठ्या आनंदाने यशोदेच्या महालात एकटाच प्रवेश करता झालो. यशोदा अजूनही ग्लानीच्या अवस्थेतच होती. मी त्या लहान बालिकेला प्रेमाने उचलून न्याहाळीत असता माझ्या एकदम लक्षात आले की ती बालिका मृतच झालेली होती. जन्मतःच ती मृत होती,

की काही काळानंतर तिच्यावर मरण ओढवले हे मला कळायला काहीच मार्ग नव्हता. परंतु ज्या अर्थी त्या सुईणीलाही हे कळले नाही त्या अर्थी बहुतेक ती बिचारी बालिका जन्मानंतर थोड्याच वेळात मृत झाली असावी असे मला तरी वाटते. पण मला दुःख याचे नाही तर मला काळजी एकाच गोष्टीची वाटते, ती म्हणजे यशोदेची!

ग्लानीत म्हणजे जवळ जवळ बेशुद्धावस्थेतच असल्यामुळे तिला काय घडले आहे याचा काहीच पत्ता नाही. तिला मुलगा झाला आहे की मुलगी झाली आहे हेही जेथे तिला ठाऊक नाही, तेथे तिचे मूल जिवंत आहे किंवा नाही अशी शंकाही तिच्या मनात येण्याचे कारणच नाही. परंतु वस्तुस्थिती तिला कळल्यावर तिच्या दुःखाला पारावारच रहाणार नाही आणि तो आघात तिच्या मनाला व शरीराला अशा दोन्हीला कदापिही झेपणे शक्य नाही. कारण तिचे मन व शरीर हे दोन्हीही अत्यंत नाजूक व दुर्बल अवस्थेत आहेत. अशा मनाच्या अत्यंत चिंताग्रस्त अवस्थेतच मी यशोदेच्या महालाच्या बाहेर आलो होतो आणि त्यातून आता काय मार्ग काढावा अशा काळजीतच मी इकडे तिकडे फिरत होतो, तोच तुझी दृष्टी माझ्याकडे गेली. तू मला आपली ओळख करून दिलीस तेव्हा मला मित्रभेटीचा आनंद तर झालाच, पण माझ्या मनाला मोठा आधार मिळाल्यासारखेच मला वाटले. परंतु तुझ्या मुद्रेवरूनच मी लगेचच ओळखले की तूच कुठल्यातरी मोठ्या संकटात सापडलेला आहेस. तुझ्या दुःखाची कथा व व्यथा ऐकता ऐकता माझे दुःख कुठल्या कुठे हरवल्यासारखे झाले होते. परंतु तुला जेव्हा माझी काळजी लक्षात येऊन तू माझी आपलेपणाने चौकशी केलीस, तेव्हा मात्र माझ्या मनातून बाजूला झालेल्या दुःखाने माझ्या मनाला आता पूर्णपणे वेढले आहे. परंतु तू माझी काळजी करीत बसू नकोस. कारण माझ्या दुःखातून काहीतरी उपाय काढण्याचे मनोबळ माझ्यापाशी निश्चितपणे आहे. ईश्वरी कृपेने यातून मला योग्य मार्ग सापडेल असा माझा पूर्ण विश्वास आहे. सुदैवाने माझ्याशिवाय ही गोष्ट राजवाड्यातील दुसऱ्या कोणालाही अजून तरी ठाऊक झालेली नाही.

तेव्हा हे वसुदेवा, आता तू माझी वृथा काळजी करीत येथे क्षणभरही थांबू नकोस. तू तुझ्या पुत्राच्या काळजीतून आता मुक्त झालेला आहेस, तरी तुझ्यावरील संकट अजून पूर्णपणे सरलेले नाही हे लक्षात ठेव. खरे तर, या तुझ्यावरील संकटाची तीव्रता तू पुन्हा मथुरेला गेल्यानंतरच वाढणार आहे. तेव्हा आता तू त्वरित मथुरेला जाण्याचे करावेस हेच योग्य आहे.''

नंदाच्या बोलण्याने वसुदेवही व्यथित तर झालाच पण थोडासा बावरलाही. निश्चित काय व कसे करावे हे त्यालाही सुचेना. एकीकडे तर त्याला तेथे क्षणभरही थांबणे देवकीच्या व्यवधानामुळे शक्य होत नव्हते, तर दुसरीकडे त्याच्या परममित्राला, नंदाला तो ऐन संकटात असताना सोडून जाणेही त्याच्याकडून घडत नव्हते. अशा मनाच्या द्विधा अवस्थेत असतानाच त्याच्या ठिकाणचा विवेक जागृत झाला. त्यामुळे त्याचे मन शांत झाले व स्थिर झाले. स्थिर मनाने तो सर्व परिस्थितीचा सम्यक विचार करू लागला असता, त्याला त्या दुर्गम परिस्थितीतही थोडा थोडा मार्ग दिसू लागला. जणु घनघोर अंधारात आशेचा प्रकाश किरण चमकू लागला. त्याच्या मनातील निश्चयात्मक भावाचे प्रतिबिंब त्याच्या मुखावर पूर्णपणे प्रतिबिंबित झाले. त्याच निश्चयाने एक पाऊल पुढे टाकीत तो नंदाच्या अगदी जवळ आला आणि त्याचा हात आपल्या एका हातात धरून दुसऱ्या हाताने नंदाच्या खांद्यावर थोपटू लागला. त्याच्या हाताद्वारे होणाऱ्या आश्वासक स्पर्शाने नंदही थोडासा सावरला असता, वसुदेवाच्या मुखातून निश्चयात्मक शब्द थोड्याशा वेगानेच बाहेर पडू लागले.

''मित्रा नंदा, खरेच तुझे दुःख व व्यथा मीच योग्य प्रकारे समजू शकतो. तुझे दुःख तू मला मोकळेपणाने सांगितलेस याने मला तर बरे वाटलेच, पण तुलाही नक्कीच थोडेसे हलके वाटले असणार. कारण आपले दुःख आपल्या प्रेमाच्या व्यक्तिला त्या दुःखात सहभागी करून घेतले असता कमी होते, तर आपले सुख आपल्या प्रेमाच्या व्यक्तिला त्यात सहभागी करून घेतले असता वाढते, हाच त्या आपलेपणाचा सहज गुणधर्म आहे. हा आपलेपणा केवळ सहभागापुरताच मर्यादित नसतो, तर त्या आपलेपणापोटी सुखदुःखाच्या सर्व प्रसंगात प्रत्यक्ष सहकार्यही देणे व घेणेही घडते. एवढेच नव्हे, तर या आपलेपणातून फक्त बाह्यांगाने सहभाग व सहकार्य न घडता, त्या त्या प्रसंगातील भावनेशी अगदी मनापासून समरस होणेही घडते. असा आपलेपणा ज्यांच्या ठिकाणी आपल्याला अनुभवता येतो त्याच व्यक्ति आणि तीच नाती खरी आपली होत, नाही का? म्हणूनच सर्व नात्यासंबंधामध्ये मैत्रीचे प्रेमसंबंध हे अत्यंत श्रेष्ठ होत. तसे म्हटले तर या मैत्रीमध्ये कोणतेही व्यावहारिक नाते नाही आणि तसे म्हटले तर या मैत्रीच्या प्रेमसंबंधामध्ये सर्व नातीही सहजपणे सामावलेली आहेत. ही मैत्री निखळ प्रेमाच्या पायावर आधारलेली असल्यामुळे निर्मळ असते. त्यामध्ये कुठल्याही नात्यातील सक्तीला व अपेक्षेला अस्तित्व नसल्यामुळे कर्तव्यकर्मातून मनात निर्माण होणारा मळ तेथे संभवतच नाही. हे नंदा, म्हणूनच हे परममैत्रीचे प्रेमसंबंध सर्व नात्यापरते असतात. असे हे प्रेममैत्रीचे संबंध आपण अनुभवीत आहोत हे खरोखरी आपले परमभाग्यच आहे असेच म्हणावे लागेल.

हे मित्रा, आपल्या उभयतांवरील ओढवलेल्या दुःखाच्या प्रसंगात एक विचित्र योगायोगही आहे आणि तो म्हणजे आपण समदुःखी आहोत. आपल्या उभयतांचे दुःख हे आपल्या संतती संबंधातीलच आहे. यात मला तरी, काहीतरी ईश्वरी संकेत असावा असे जाणवत आहे. नाहीतर त्या ईश्वरी नियतीने आपल्या उभयतांना असे एकत्र आणि तेही असे अत्यंत असंभवनीय असताना, आणलेच नसते. मला तर असे आता निश्चितपणे वाटू लागले आहे, की आपले उभयतांचे समदुःख हेच त्या दुःखावरील उपाययोजना काढायला सहाय्यभूत होणार आहे. आपल्या एकमेकांच्या दुःखामध्येच त्यावरील मार्ग सामावलेला आहे. फक्त तो झाकोळला गेलेला आहे एवढेच. तरी आपण उभयतांनी शांत मनाने विचार केला, तर या दुःखातून काहीतरी सामायिक उपाय सापडेल असे मला खात्रीपूर्वक वाटते. आपल्याला वेळ अत्यंत कमी आहे हे खरेच आहे. परंतु त्या थोड्या वेळातही आपल्या दुःखातून योग्य मार्ग काढण्यासाठी आपण उभयतांना सहाय्यकारी झालेच पाहिजे. ती केवळ आपलीच नव्हे, तर काळाचीही गरज आहे असे मला अगदी माझ्या अंतःकरणातच जाणवत आहे.''

एवढे बोलून वसुदेव स्तब्ध झाला तरी त्याच्या मनातील विचार मात्र चालूच होते. मुळात त्याचे बोलणे हे विचारातून येत होते आणि तो बोलत असतानाही त्याचे मन विचार करीतच होते. परंतु त्याचे मन केवळ विचारचक्रातच अडकून राहिलेले नव्हते, तर त्याच्या मनामध्ये विचारातून आलेला विवेक आणि विवेकातून पुन्हा घडणारा सम्यक विचार अशी प्रक्रिया वेगाने चालू झालेली होती.

इथे नंदाचीही मनःस्थिती अगदी वसुदेवाच्या मनःस्थितीसारखीच झालेली होती. वसुदेवाचे विचारपूर्वक बोलणे नंदासाठी विचारप्रवर्तक ठरले. त्याच्याही मनातील विचारांना आधी चालना मिळाली आणि मग विचारातून निर्माण झालेल्या विवेकामुळे विचारांना योग्य दिशा मिळाली. उभयतांच्या अशा विचारमग्न अवस्थेतील थोडासा काळही त्यांना दीर्घ काळासारखा जाणवला. परंतु दोघेही त्यांच्या सखोल विचारांच्या अवस्थेतून बाहेर आले आणि त्यांनी एकदमच एकमेकांकडे पाहिले मात्र, उभयतांचे चेहरे उजळून निघाले. दोघांच्याही विचार मंथनातून एकाच निष्कर्षाचे नवनीत निघाले असल्याचेच ते लक्षण होते. गायक आणि त्याचे तालवाद्यावरील साथीदार एकदम समेवर आल्यासारखेच ते दृश्य दिसत होते. उभयतांच्या ठिकाणी असलेला एकच भाव त्यांच्या नजरेतून बाहेर येत होता. एकमेकांना एकच दृष्टी लाभल्याची खात्री त्यांच्या नजरेतून आता स्पष्टपणे दिसत होती. एकाच भावाने युक्त झालेले नंद व वसुदेव एकमेकांच्या

अधिकच जवळ आले आणि त्यांनी परस्परांचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन ते प्रेमाने व निश्चयात्मक भावाने पण हळुवारपणे दाबले. उभयतांच्या ठायी असलेल्या एकीएक भावाला आता शब्दरूप कोण देणार असा विचार मनात येण्याच्या आधीच वसुदेवाच्या मुखातून शब्दोच्चार घडूच लागला.

''हे मित्रा, नंदा! तुझ्या मनात आलेला विचार आणि माझ्या मनात आलेला विचार हा एकच आहे. होय! आणि आपला विचार अगदी योग्य व विवेकयुक्तच आहे यात तीळमात्रही संशयाला जागा नाही. तोच एकमेव मार्ग सध्याच्या उभयतांच्या परिस्थितीत उपलब्ध आहे, हे मला निश्चितपणे जाणवत आहे आणि तुलाही अगदी तसेच वाटत असणार याची मला खात्री आहे. तेव्हा आता कोणतेही अनमान न करता आणि जराही विलंब न लावता आपण त्वरित त्या मार्गाचे अवलंबन करूया. कारण त्यातच आपले सर्वांचेच हित आहे हे निःसंशय!

हे नंदा, आता आपण एवढेच करूया आणि खरे तर, सध्याच्या परिस्थितीत आपल्याला तेवढेच करणे शक्य आहे, की माझ्या या मुलाला तू यशोदेच्या कुशीत नेऊन ठेव आणि तिच्या पोटी मृत म्हणूनच जन्माला आलेल्या कन्येला माझ्या स्वाधीन कर. ज्या टोपलीतून मी माझ्या मुलाला मथुरेपासून गोकुळापर्यंत आणले, त्याच टोपलीतून आता तुझ्या कन्येला गोकुळातून मथुरेला परत घेऊन जाईन आणि देवकीकडे सुपूर्द करीन. उद्या सकाळी तो क्रूरात्मा कंस नेहमीप्रमाणे आमच्या समाचाराला व मुख्यतः देवकी प्रसूत झाली की नाही हे पहाण्यासाठी निश्चितपणे येईलच. तेव्हा ही मृत कन्याच देवकीच्या पोटी जन्माला आली असे त्याला आम्ही सांगू. आमच्या सांगण्यावर त्याचा विश्वास बसणार नाहीच हे मला ठाऊक आहे. परंतु शेवटी ते मान्य करण्यावाचून त्याला दुसरा पर्यायच असणार नाही. कारण सर्व पहारेकरी आम्हाला अनुकूल आहेत व सहाय्यकारीही आहेत. मग त्यातून पुढे काय होईल ते आम्ही बघून घेऊ. होणाऱ्या परिणामाला सामोरे जाण्याचे जे धैर्यबळ मला व देवकीला प्रसंगाच्या निमित्ताने प्राप्त झाले आहे, ते केवळ तात्पुरते नसून आता ते बळ कायमचेच आमचे झाले आहे याची मला पूर्ण खात्री आहे. तेव्हा तू आमची अजिबात काळजी करू नकोस.

हे नंदा, येथे तर, यशोदेच्या पोटी मृत कन्या आली आहे हे तर सुदैवाने तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाही माहीत नाही. आणि तू ते कोणालाही माहीत करूनही देऊ नकोस. थोड्या वेळाने जेव्हा यशोदा शुद्धीवर येईल तेव्हा तिच्या कुशीत असलेला हा माझा पुत्र तिला तिचाच पुत्र वाटेल व ती हर्षोन्मादित होईल.

ही वार्ता सर्व गोकुळवासीयांना कळल्यावर जिकडे तिकडे एकीएक आनंदीआनंदच होईल. मला खात्री आहे की माझ्या पुत्राला यशोदेकडून मातृवात्सल्य व तुझ्याकडून पितृप्रेम पूर्णपणे मिळेल. याच भावाच्या निश्चितीने मी नेहमी निश्चिंत व समाधानी राहीन. आपली भेट पुन्हा केव्हा होईल मला माहीत नाही. परंतु एक दिवस आपली भेट नक्की होईल असा माझा विश्वास आहे. तोपर्यंत त्या दिवसाची व त्या भेटीच्या क्षणाची आपण वाट पहात राहूया. हे मित्रा, एका गोष्टीची मात्र तू अत्यंत काळजी घे, की माझ्या पुत्राच्या व तुझ्या कन्येच्या जन्माचे हे गुपित नेहमी गुपितच राहील. पुढे काळाच्या ओघात योग्य वेळी योग्य गोष्टी घडतीलच. पण केव्हा घडतील हे आपल्याला सांगता येणार नाही. ते आपण ईश्वरी नियतीवरच सोपवूया. ईश्वर आतापर्यंत जसा आपल्याला संकटात आधार देत राहिला व त्यातून मार्गही दाखवीत राहिला, तसाच तो पुढेही आपल्याला आधारभूत व सहाय्यभूत होत राहील अशी दृढ श्रद्धा त्या ईश्वरावर ठेवून त्यालाच मनोभावे आपण नेहमी आळवत राहूया.

हे नंदा, तुला आणखीन एकच शेवटची विनंती करतो. माझी दुसरी पत्नी रोहिणी हिच्यापासून झालेला माझा पुत्र बलराम, ज्याला कंसाच्या भयाने मी आधीच तुझ्याकडे ठेवलेले आहे, त्याला तर तू पुत्रवत सांभाळीत आहेसच. त्यालाही इतर कोणत्याच गोष्टीच्या माहितीचा स्पर्श होऊ देऊ नकोस. त्याच्या संगतीत माझा दुसरा पुत्रही खेळत खेळत वाढेल आणि त्यांच्यातही सहजगत्या बंधूप्रेम निर्माण होईल असा मला विश्वास आहे. खरे तर तुला मी अशी विनंती करणे हेही अयोग्य आहे, नव्हे तसे करणे हा आपल्या मैत्रीचा अवमानच ठरेल. कारण माझ्या दोन्ही पुत्रांवर तुझे पितृप्रेम सहज भावाने रहाणार आहे. माझ्या दोन्ही पुत्रांना माझे पूर्ण आशीर्वाद आहेत. यशोदेलाही माझा प्रणाम सांग आणि तुझ्यासाठी तर माझ्याकडे फक्त एकच आहे, ते म्हणजे प्रेम अन् प्रेमच!''

असे म्हणून वसुदेवाने नंदाला दृढ प्रेमालिंगन दिले व अश्रूंच्या रूपाने आपल्या अंतरातील सर्व भावभावनांना मोकळी वाट करून दिली. नंदाचीही अगदी तशीच भावपूर्ण अवस्था झाली होती. वसुदेवाच्या मुखातून प्रगटणाऱ्या शब्दांनी केवळ वसुदेवाचेच नव्हे, तर नंदाचेही भाव साकार झाले होते. म्हणून तो निःशब्द झालेला दिसत असूनही मनातून मोकळा झालेला होता. त्याचे वेगळे म्हणून काही बोलणे वा सांगणे शिल्लकच राहिलेले नव्हते. दोघांनी एकमेकांना त्वरित सावरले आणि ते पुढच्या कृतीला लागले. नंदाने त्या टोपलीतील बालकाला आपल्या दोन्ही हातांनी उचलून घेतले व छातीशी घट्ट धरले आणि तो त्वरेने यशोदेच्या

महालात शिरला.  यशोदा अजूनही पूर्ण ग्लानीतच होती.  नंदाने आपल्या हातातील बालकाला तिच्या कुशीत अलगदपणे ठेवले आणि त्या मृत बालिकेला आपल्या हातात हळुवारपणे उचलून घेतले.  तिलाही त्याने तेवढ्याच ममतेने व वात्सल्यभावाने आपल्या छातीशी धरले आणि तिला घेऊन तो बाहेर वसुदेवापाशी आला.  त्या बालिकेच्या मुखाला प्रेमाने एकवार पुन्हा कुरवाळून नंदाने तिला वसुदेवाच्या हातात ठेवले आणि अश्रूपूर्ण नेत्रांनी वसुदेवाला निरोप देण्यासाठी दोन्ही हात जोडून नमस्कार केला.  वसुदेवानेही अश्रूंनी दाटलेल्या नेत्रांनी नंदाच्या भावाला प्रतिसाद दिला.  त्यानेही एकदा त्या बालिकेला आपल्या छातीशी दृढपणे धरून तिच्या मस्तकाचे अवघ्राण केले.  तिला आपल्याबरोबर आणलेल्या मऊसर व उबदार वस्त्रात गुंडाळून घेतले आणि हळुवारपणे टोपलीत ठेवले.  त्या टोपलीला बाहेरून पुन्हा दुसऱ्या जाड वस्त्रात बांधून वसुदेवाने ती टोपली उचलून आपल्या हातात धरली.  नंदाकडे प्रेमाश्रुपूर्ण नेत्रांनी पुन्हा एकदा पाहून मंद स्मित केले आणि मागे वळूनही न पहाता त्वरेने तो नंदाच्या राजवाड्याबाहेर पडला.

नंद मात्र कितीतरी वेळ जागच्या जागीच खिळून राहिल्यासारखा उभा होता.  नंतरही बऱ्याच काळाने तो आपले एकेक पाऊल हळुहळू टाकीत पुन्हा यशोदेच्या महालात कसा व कधी गेला हे त्यालाही कळलेच नाही.  परंतु यशोदेच्या महालात गेल्यावर मात्र तो पूर्ण भानावर आला आणि प्रेमपूर्ण नजरेने यशोदेकडे व त्या नवजात बालकाकडे पाहू लागला.  तो पुढे होऊन यशोदेला सावध करणार, तोच त्या बालकाने मोठ्या आवाजात रडण्यास सुरुवात केली.  त्या बालकाच्या रडण्याने यशोदा तर हळुहळू सावध होऊ लागलीच, परंतु सर्व राजवाड्यालाच एकदम जाग आली आणि सर्व परिसरच पूर्णपणे जागा झाला.  सावध झालेल्या यशोदेने रडणाऱ्या बाळाला हाताने थोपटीत शांत केले आणि प्रेमाने त्याला आपल्या जवळ घेतले, तर तो त्वरेने यशोदेच्या कुशीतच शिरला.  त्या बाळाचा स्पर्श यशोदेला झाला मात्र, तिला अनेक धारांनी वात्सल्यभावाचा पान्हा फुटला.  तिचे सर्व अंगच रोमांचून आले.  एका आगळ्या वेगळ्या प्रेमभावाचा प्रत्यय तिच्या अंतःकरणाला व सर्व अंगालाच तिला येऊ लागला.  एका दिव्य सुगंधाचा अनुभव तिला तिच्या शरीराच्या कणाकणातून येऊ लागला.  त्याने तिचे देहभानच हरपल्यासारखे झाले.  त्याही अवस्थेत तिने त्या बाळाला आपल्या छातीशी घट्ट धरले व त्याच्या मुखात आपला पान्हा मोकळा करू लागली.  यशोदेच्या कुशीतील उबेत ते बालक स्थिरावले व चुरू चुरू आवाज करीत पान्हा सेवन करून शांत झाले.  यशोदेने त्या बालकाच्या मस्तकावर प्रेमाने थोपटीत थोपटीत त्याला अधिकच आपल्या जवळ घेतले.  बराच काळ झाला तरी तो पान्हा सेवन करून ना त्या बालकाची तृप्ती होत होती, ना त्या यशोदेचे समाधान होत होते.  ते

वात्सल्यभावपूर्ण दृश्य पहाता पहाता नंदाचेही नेत्र पाणावत होते आणि सुखावतही होते. आता तर त्याच्या सुखाला अंतपारच राहिलेला नव्हता. त्या सुखाच्या परमावधीच्या अवस्थेत तो स्वतःला पूर्णपणे हरवूनच बसला होता.

इकडे वसुदेव नंदाच्या राजवाड्याबाहेर आला. त्याने आपल्या हातातील टोपली पुन्हा सावरून घट्टपणे व सुरक्षितपणे हातात धरली. तो पुढे पाऊल टाकणार तोच त्याच्या कानावर मागे राजवाड्यातून लहान बालकाच्या मोठ्याने रडण्याचा आवाज आला आणि क्षणभर त्याचे पाऊल थबकले. त्याच्या मनाची थोडीशी चलबिचल झाली. एकीकडे पुत्राविषयीचा दाटून आलेला प्रेमभाव आणि दुसरीकडे त्या पुत्राच्या होत असलेल्या वियोगाचे दुःख अशा मनाच्या द्विधा अवस्थेतून त्याने विवेकाने स्वतःला लगेचच सावरले. पुत्राच्या सुरक्षिततेविषयीच्या खात्रीने झालेले समाधान आणि पुत्राच्या प्रथम रडण्याचा आवाज ऐकून झालेला हर्ष या भावाचा संयोग त्याच्या मुखावर विलसू लागला आणि त्याचा निश्चय त्याच्या मुखावर दिसू लागला. नेत्रातून ओघळणाऱ्या अश्रूंना आवरीत त्वरेने पावले पुढे टाकीत तो मुख्य रस्त्यावर आला. पाऊस अजूनही पडतच होता, फक्त त्याचा जोर मात्र जरासा कमी झाल्यासारखा वाटत होता एवढेच!

वातावरणातील या थोड्याशा झालेल्या अनुकूल बदलाचा जास्तीत जास्त लाभ उठविण्याच्या विचाराने वसुदेव झपाझप पावले पुढे टाकीतच राहीला. त्याचे एकीएक व्यवधान आता मथुरेकडे आणि तेही कंसाच्या बंदीवासात अडकून पडलेल्या देवकीकडे लागले होते. त्याचे मन तर केव्हाच तिथे जाऊन पोहोचलेले होते. देवकीच्या मनाची काय स्थिती झाली असेल? तिने प्रयत्नपूर्वक धरून ठेवलेला मनाचा धीर अजूनही कायम असेल ना? कंस एखादेवेळेस त्याच्या मनाच्या अस्वस्थतेपोटी आधीच देवकीच्या भेटीस आलेला तर नसेल ना? आणि जर यदाकदाचित तसे घडले असेल तर मग देवकीची परिस्थिती किती कठीण झाली असेल याचा विचारही करणे कठीणच आहे. कारण तो दुष्ट कंस क्रौर्याच्या बाबतीत कोणत्याही थराला जाणे शक्य होते हे वसुदेवाला अनुभवाने अगदी पक्के ठाऊक होते. मनातील अशा अनेक प्रश्नांच्या व विचारांच्या गुंतागुंतीतून स्वतःच्या मनाला वसुदेव विवेकाच्या सहाय्याने सोडवत होता आणि धैर्याने पुढे पुढे जातच होता.

मथुरेहून गोकुळाला येताना पुत्राच्या काळजीने व त्याच्या सुरक्षिततेच्या विचाराने त्याच्या चालण्याला सहज वेग येत होता आणि आता गोकुळाहून मथुरेला परत जातानाही देवकीच्या काळजीने व तिच्या सुरक्षिततेच्या विचारानेही त्याचे चालणे सहजपणे तितक्याच वेगाने होत होते. यमुना नदीच्या काठी येऊन

पोहोचला असता, वसुदेवाच्या लक्षात आले की यमुना नदीच्या जलप्रवाहाचा वेग अजूनही तसाच जोरात आहे, पण तिला आलेला पूर मात्र थोडा थोडा ओसरत होता. हीच अनुकूलतेची खूण जाणून वसुदेव भर प्रवाहात मोठ्या धैर्याने उतरला. स्वतःची आणि टोपलीतील त्या दुर्दैवी मृत बालिकेचीही तेवढीच काळजी घेत वसुदेव हळुहळू यमुना नदीच्या पार होऊ लागला. त्या दुर्दैवी बालिकेचा जीव जरी केव्हाच गेलेला असला तरी वसुदेव जाणून होता की ती बालिका नंद व यशोदेच्या दृष्टीने जणु त्यांचा जीवच होती. त्यामुळे ती बालिका मृत आहे असा विचारही मनात न येता, वसुदेवाच्या मनात त्या बालिकेविषयी आत्यंतिक प्रेम व जिव्हाळा सहज होता आणि तोच त्याच्याकडून तिची अत्यंत काळजी घेण्याच्या कृतीतून व्यक्त होत होता.

शेवटी महत् प्रयासाने वसुदेव नदीच्या पलीकडे पोहोचला. मथुरेत आल्यावर वसुदेवाने पुन्हा आपला चेहरा वस्त्राआड लपवला आणि तशा संपूर्ण भिजलेल्या अवस्थेतच तो कारागृहाच्या प्रवेशद्वारापर्यंत आला. दारावरील पहारेकऱ्यांनी त्याला लागलीच ओळखले. ते तर त्याची केव्हापासूनचीच वाट पहात होते. वसुदेवाच्या प्रामाणिकपणावर व शब्दांवर जरी त्यांचा पूर्ण विश्वास असला तरी त्यांना परिस्थितीचा आणि त्यातून येणाऱ्या अडचणींचा मात्र अजिबात भरवसा वाटत नव्हता. त्यामुळे वसुदेव पुन्हा परत येईपर्यंत त्यांच्या जिवाची सारखी धाकधूकच होत होती आणि ते अगदी साहजिकच होते. त्यामुळे वसुदेवाला पाहिल्याबरोबर त्यांचा जीव जणु भांड्यात पडल्यासारखाच झाला. म्हणून त्या पहारेकऱ्यांनी जेव्हा त्वरित वसुदेवाला त्याच्या बंदीवासाच्या खोलीत नेले व बाहेरून पूर्वीसारखेच कड्या कुलुपे लावून घेतली, तेव्हाच त्यांच्या जिवात जीव आला आणि त्यांच्या जीवाला निर्धास्त वाटले.''

नारदाच्या बोलण्याचा अखंड प्रवाह अचानक नारदानेच स्वतःहून थांबवला व तो लक्ष्मीकडे साभिप्राय नजरेने व हास्यमुखाने पहात राहिला. नारदाचे बोलणे का थांबले हे लक्ष्मीला कळले नाही, पण त्याच्या पहाण्यातील भाव मात्र तिच्या लगेचच लक्षात आले. नारदाकडे पाहून तिने स्मितहास्य केले व नारदाला म्हणाली,

''हे नारदा, तू माझ्याकडे सूचक दृष्टीने का पहात आहेस ते माझ्या लक्षात आलेले आहे. माझ्या लक्षात आलेले आहे हे बहुधा तुझ्याही लक्षात आलेले असावे. कारण म्हणूनच तू माझ्याकडे पाहून हास्य करीत आहेस. तुझ्या मुखातून यमुना नदीच्या वेगाने प्रगटणारे वक्तव्य अखंडपणे बराच वेळ श्रवण करीत असूनही मी तुला मध्येच थांबवून अजूनही काही प्रश्न कसा केला नाही, याचेच तुला नवल वाटत असावे

आणि तेच तुझ्या मिश्किल हास्यातून निर्देशित होत आहे असे मला जाणवते. परंतु नारदा, यात नवल वाटावे असे काहीच नाही. कारण तू वर्णन करून सांगत असलेला प्रसंगच एवढा कारूण्यपूर्ण आणि तरीही भावपूर्ण आहे, की त्या प्रसंगात माझे मन अगदी सहजपणे व पूर्णपणे समरस पावलेले होते. त्यामुळे प्रश्न विचारण्यासाठी जो काही मनाचा वेगळेपणा असायला हवा, तोच नसल्यामुळे मनात काही प्रश्न निर्माण होण्याचा प्रश्नच निर्माण होत नव्हता. परंतु आता मात्र तू सांगितलेल्या प्रसंगातील वेगळेपण व विशेषत्व मला थोडे थोडे जाणवू लागले आहे. माझ्या मनात जरी काही प्रश्न निर्माण होत नसले, तरी काहीतरी बोलावेसे मात्र मला जरूर वाटत आहे.

हे नारदा, वसुदेव व नंद यांच्या मित्रप्रेमाचे तू केलेले वर्णन तर केवळ अजोडच आहे. खऱ्या मित्रभावाचे यथार्थ चित्रण याच्यापेक्षा दुसरे म्हणून काही करता येणारच नाही. कठीण प्रसंगाच्या कसोटीस पूर्णपणे यशस्वी ठरलेले मित्रत्व हेच खरे व श्रेष्ठ होय. सुखदुःखाच्या कोणत्याही प्रसंगातील सहभाग, सहकार्य व समरसता ही तू प्रतिपादन केलेली त्रिसूत्री खरेच अत्यंत महत्त्वाची आहे. तेच खऱ्या मैत्रीचे मूळ आहे, त्यातच खऱ्या मैत्रीचे सच्चेपण सामावलेले आहे. मुख्यतः त्या मैत्रीतील जो त्याग आहे तोच निरपेक्ष मैत्रीचे द्योतक आहे. म्हणूनच नंद व वसुदेव यांची मैत्री ही अत्यंत कौतुकास्पद आहे. उभयता समदुःखी असूनही स्वतःच्याच दुःखात चूर होऊन न रहाता, दुसऱ्याच्या दुःखाचा विचार करून त्याला सहाय्यभूत होणे आणि त्यासाठी स्वतःच्या दुःखाचा विचार बाजूला करता येणे याला मनाचा केवढातरी मोठेपणा व मनाची कणखरताच असावी लागते. येथे केवळ मनाची दुर्बल भावनाप्रधानता असून उपयोगाची नाही, तर मन प्रेमाच्या भावाने सबळच असावयास हवे आणि तेच प्रेम हे या विशुद्ध मैत्रीचा गाभा आहे. म्हणूनच नंद व वसुदेव हे या भावनिक पण कठीण प्रसंगात सबलतेने उभे तर राहिलेच, परंतु एकमेकांना पूरक असलेल्या त्यांच्या त्यागभावामुळे ते विशेषत्वाने उठून दिसले. त्यासाठी त्यांनी पत्करलेल्या जोखमीतून निर्माण होणारा केवढातरी मोठा धोकाही त्यांना यःकश्चित वाटला यात काहीच नवल नाही. अर्थात त्याग करतानाही त्यांचा विवेक पूर्ण जागा होता हे सर्वात मुख्य होय. त्यांनी घेतलेला निर्णय हा केवळ भावनेच्या भरातील नव्हता, तर अत्यंत वस्तुनिष्ठही होता हे अत्यंत महत्त्वाचे. पण हे नारदा, या सर्वांत विशेषत्वाची मला जाणवलेली एक गोष्ट म्हणजे नंद व वसुदेव यांनी त्या प्रसंगात घेतलेला एकमताचा निर्णय ही होय. त्यासाठी त्यांना परस्परांशी विचारविनिमयही करावा लागला नाही. त्याची त्यांना आवश्यकताच वाटली नाही. एकमत होणे हेच तर एकमन झाल्याचे द्योतक आहे आणि ही मनाची ऐक्यता हेच तर सख्यत्वाचे मुलभूत लक्षण आहे.

हे नारदा, एक गोष्ट माझ्या मनात वारंवार येत आहे की नंद व वसुदेव यांच्या मैत्रीची यशस्वीपणे कसोटी ज्याच्यामुळे लागली आणि त्यांच्यातील मैत्रभावाने कमाल उंची गाठली, त्याच्या मुळाशी तर कृष्णजन्म हेच कारण झालेले आहे. त्याच्या अस्तित्वामुळेच व त्याच्या सुरक्षिततेसाठीच तर हे सर्व घडले आणि नंद व वसुदेव यांच्या मित्रभावाने अगदी कळस गाठला. पुढे घडलेल्या कृष्णचरित्रात त्याने सर्वांना स्वतःहून देऊ केलेले मित्रत्व हेच त्याच्या चरित्रातील प्रमुख वैशिष्ट्य आहे असे जे तू मला सुरुवातीलाच सांगून ठेवलेले आहेस, ते अगदी खरेच असले पाहिजे असे मला आतापासूनच, म्हणजे या प्रसंगापासूनच जाणवू लागले आहे. 'लहान मुलाचे पाय पाळण्यातच दिसतात', म्हणजे एखाद्याच्या पुढे घडणाऱ्या जीवनाची सूचक सुरुवात अगदी लहानपणापासूनच होते असे जे नेहमी म्हटले जाते, ते या कृष्णाच्या बाबतीत अगदी हजार हिश्शांनी खरे आहे असे मला ठामपणे वाटत आहे. अरे नारदा, ज्याच्या जन्मप्रसंगाच्या मुळातच जेथे सर्वांच्या ठिकाणचा सद्भाव जागा होऊन त्याचे बळ त्यांनी घेतले आणि ज्याच्यामुळे मित्रभावाच्या उत्कट प्रेमाचा विजय झाला, त्या कृष्णाच्या पुढील सर्व जीवनात ही मैत्री व सख्य हेच विशेषत्वाने फुललेले व बहरलेले असणार याची मला तरी पूर्ण खात्री आहे. तशी ग्वाहीच जणु या प्रसंगातून आपल्याला मिळत आहे. होय ना, नारदा?''

लक्ष्मीच्या बोलण्याने नारदाला अतिशय समाधान झाले व त्याला लक्ष्मीचे अत्यंत कौतुकही वाटले. त्याच कौतुकभावाला व्यक्त करीत नारद लक्ष्मीला लगेचच म्हणाला, ''हे लक्ष्मी, अगदी बरोबर! तू तर मुख्य सूत्र नेमके पकडलेस. म्हणूनच मला तुझे अत्यंत कौतुक वाटते. कारण तुझ्याकडून केवळ श्रवण घडत नसून खरी श्रवणभक्तिच घडत असल्याचे हे लक्षण आहे. श्रवण व श्रवणभक्ति यातील हाच तर महत्त्वाचा फरक आहे. पुष्कळ श्रवण करून त्यातील पुष्कळसे प्रयत्नपूर्वक स्मरणातही ठेवता येईल, परंतु त्या श्रवणाचा भावार्थ जर जाणवला नाही तर ते भाराभार श्रवण बुद्धीला केवळ भारच होऊन रहाते. पण जेव्हा श्रवण हे भक्तिभावाने होते, तेव्हा श्रवणाचा गाभा लक्षात येतो व त्याचे मुख्य सूत्र मनाठायी सहजपणे धरले जाते. त्यामुळेच श्रवणातील निरनिराळ्या व भिन्न भावांच्या विषयांची मनाठिकाणी गल्लत व गुंतागुंत न होता, मन मोकळेपणाने श्रवणाचा खरा आनंद घेते आणि पुढील श्रवणालाही त्याच मोकळेपणाने सादर होते. असो.

हे लक्ष्मी, कृष्णचरित्रातील मूळ सूत्र व मुख्य गाभाही या सख्यत्वातच आहे हे अगदी बरोबर आहे. त्याने स्वतःहून सर्वांशी मैत्री केली व जवळीक साधली हे अगदी खरे आहे. त्यामुळे अनेकांना कृष्णाच्या

जवळ येण्याची संधी मिळाली हेही खरे आहे. अर्थात त्या मिळालेल्या संधीचा कोणी व किती लाभ करून घेतला ही ज्याच्या त्याच्या भावाची व पराक्रमाची बाब आहे. त्याचा उल्लेख पुढे कृष्णचरित्राच्या वर्णनात सहजपणे येईलच. सध्यातरी आपण कृष्णजन्मापासूनच्या कथासूत्राच्या आधारानेच वर्णन करीत पुढे जाणे योग्य ठरेल.''

नारदाच्या बोलण्याला अनुमोदन देत लक्ष्मी उद्गारली, ''हे नारदा, तुझे म्हणणे अगदी योग्य आहे. पुढे काय व कसे घडले वा घडेल याचा विचार आताच करणे संयुक्तिक नाहीच. कारण पुढील गोष्टींचा विचार करताना मनात काहीतरी कल्पनाच निर्माण होणार आणि आताच्या श्रवणाकडे मनाचे लक्ष पूर्णपणे लागणारच नाही. त्यामुळे आताच्या वर्णनाचा व श्रवणाचा खरा आनंद तर अनुभवता येणार नाहीच, पण पुढील वर्णनाचा आनंदही गमावला जाईल. पण तरीही एक गोष्ट खरी आहे, की पुढे काहीतरी घडलेले हे असतेच. कारण म्हणूनच तर सांगण्यासाठी इतिहास हा शिल्लक रहातो. तेव्हा हे नारदा, पुढे कृष्णचरित्र केवढ्यातरी व्यापकतेने घडलेले हे असणारच आणि ते श्रवण करण्याची माझी आतुरताही अगदी साहजिकच आहे. किंबहुना आतापर्यंत तुझ्या मुखातून प्रगटलेल्या कृष्णचरित्राचे श्रवण योग्य प्रकारे झाल्याचाच तो परिपाक आहे. त्याहीपेक्षा तुझ्या कथनात जी स्वानुभवाची सखोलता असते त्यामुळे तुझे बोलणे सहजगत्या भावपूर्ण होते. ही तुझी भावपूर्णताच माझ्या मनाला केवळ स्पर्श करून जात नाही, तर ती माझ्या मनात हळुहळू उतरत रहाते आणि माझ्या मनालाही भावपूर्ण करून ठेवते. या भावपूर्णतेमुळेच या नारायणाच्या सगुण चरित्राचे व त्याच्या सगुण प्रेमभक्तिचे माहात्म्य माझ्या अंतःकरणातही अगदी खोलवर जाऊन बसते. त्यामुळेच माझ्याकडून श्रवणही केवळ वरवरचे न घडता सखोलतेने घडते. म्हणूनच त्या श्रवणाचा मला अंतःकरणात अतिशय आनंद होत असतो. तेव्हा असा माझ्या आनंदाला कारणीभूत होत असलेला आणि माझ्या आनंदाला वाढवीत असलेला तुझा आनंद, हे नारदा, तू या नारायणाच्या सगुण प्रेमभक्तिच्या कथा निरूपणाद्वारे व्यक्त करीतच रहा अशी मी तुला अत्यंत प्रेमाची विनंतीच करते. कारण त्याचा श्रवणानंद घेण्यासाठी मी अगदी आतुरलेली आहे. या श्रवणाचे व्यवधान तूच निर्माण केलेले आहेस, तूच ते व्यवधान वाढवीतही असतोस आणि त्या व्यवधानाची पूर्तीही तूच करीत असतोस म्हणून बरे आहे!

तेव्हा हे नारदा, कृष्णचरित्रातील पुढील कथाभाग त्वरित सांगण्याचे करावेस. कृष्णचरित्राची सुरुवातच अत्यंत रोमहर्षक प्रसंगाने झालेली आहे. कृष्णाचा कंसाच्या कारागृहातील जन्म काय, वसुदेवाने

मुसळधार पावसात त्या कृष्णाला गोकुळात नंदाकडे घेऊन जाणे काय आणि नंदाच्या मृत जन्मलेल्या कन्येला घेऊन पुन्हा तेवढ्याच जोरदार जलवृष्टीत परत मथुरेला कंसाच्या बंदीवासात येणे काय, खरोखरी सर्वच अद्‌भुत होय.  तीच अद्‌भुतता पुढील प्रसंगातही तशीच कायम असणार याची मला अगदी खात्री आहे. कारण पुढे ती मृत कन्या पाहून कंसाची काय प्रतिक्रिया झाली असणार याच्या नुसत्या विचारानेच माझ्या मनात केवढी तरी भीती निर्माण होत आहे.  मग प्रत्यक्ष वसुदेव व देवकी यांची मनःस्थिती काय झाली असेल याची तर मला कल्पनाच करवत नाही.''

*****



# कंसाचे क्रौर्य

लक्ष्मीच्याच बोलण्यातील सूत्र घेऊन नारदाने पुढे बोलण्यास सुरुवात केली. ‘‘हे लक्ष्मी, तू म्हणतेस त्याप्रमाणे प्रसंग खरोखरीच कठीणच होता. खरे तर, एक संकटांची मालिकाच सुरू झाल्यासारखे झाले होते. एका प्रसंगातून पार पडल्याचे समाधान मिळते न मिळते तोच दुसरा प्रसंग समोर येऊन असा उभा ठाकत होता, की तो आधीच्या प्रसंगापेक्षाही अधिक बिकट ठरत होता. विशेषतः वसुदेव व देवकी यांच्या सहनशीलतेची व धैर्याची कसोटी क्षणाक्षणाला लागत होती आणि त्यात ती उभयता यशस्वी होत होती, हीच त्यांच्यावरील परमेश्वराची कृपा म्हणायची! असो.

हे लक्ष्मी, तुझ्या मनाला जी कंसासंबंधी भीती वाटत आहे ती अगदी खरीच आहे. कारण अगदी तसेच घडले. देवकीच्या पोटी मृत कन्या जन्मली आहे ही बातमी पहारेकऱ्यांनी कंसाच्या कानावर घातली मात्र, तो संतापाने अगदी लालीलाल झाला. आधीच संशयाने ग्रस्त झालेल्या कंसाचा त्या गोष्टीवर विश्वासच बसेना. देवकीच्या पोटी मृत बालक कसे काय येऊ शकते या विचाराने व शंकेने कंसाच्या मनाचा पूर्णपणे ताबा घेतला. त्याची मती भ्रष्ट झाली आणि त्याचे मन विकृतभावाने युक्त होऊन क्रोधीत झाले. खरे तर, हे सर्व दूषित भाव कंसाच्या ठिकाणी नेहमीच असत. कारण तोच तर त्याचा सहज स्वभाव होता. या स्वभावानुसारच तो निरनिराळ्या योजना आखून तशी तशी कर्मे करीत असे. त्याच्या योजनेनुसार जेव्हा गोष्टी घडत तेव्हा साहजिकच तो खुशीत असे. परंतु एखादी गोष्ट जेव्हा त्याच्या योजनेच्या विरूद्ध घडत असे, तेव्हा मात्र त्याच्या अंतःकरणात साचलेला मळ वर येत असे आणि त्याच्या मनाला पूर्णपणे ग्रासून टाकीत असे. म्हणूनच देवकीच्या पोटी मृत कन्या जन्माला आली आहे असे त्याला कळल्यावरही नेमके तसेच घडले. त्या घटनेचे निमित्त होऊन त्याचे मन विपरीत भावाने पुन्हा ग्रस्त झाले आणि त्याच्या ठिकाणी सुप्त असलेल्या राक्षसी वृत्तीने जागे होऊन पुन्हा डोके वर काढले. आत्यंतिक रागाने त्याच्या मनाचा नुसता जळफळाट होऊन राहिला आणि त्या रागाच्या आगीच्या दाहात त्याचेच मन होरपळून जाऊ लागले. तशाच मनाच्या भडकलेल्या अवस्थेत तिरीमिरीने तो वसुदेव व देवकी यांच्या कारागृहाच्या कोठडीत धावतच आला.

आपल्या मांडीवर मृत कन्येला घेऊन देवकी आपल्या पुत्राच्या वियोगाचा शोक करीत होती, तर वसुदेव तिच्या शेजारी शांतपणे बसून तिचे सांत्वन करीत होता. त्या दोघांना तशा स्थितीत पाहिल्यावर

कंसाच्या रागाचा पारा अधिकच वर चढला आणि त्याचा संताप त्याला अनावर झाला. त्या संतापाच्या भरातच त्याच्या तोंडून तडातड शब्द फुटून बाहेर पडू लागले.

''अरे वसुदेवा, अगं देवकी, तुमच्या या ढोंगीपणाला मी अजिबात फसणार नाही हे लक्षात ठेवा. तुम्ही दुःखाचे कितीही सोंग केले तरी ते माझ्यापुढे उघडे पडल्याशिवाय मुळीच रहाणार नाही. या देवकीच्या पोटी मृत पोरगी जन्माला येते याचा अर्थ काय? भविष्यवाणीनुसार हिच्या पोटी आठवा मुलगाच, आणि तोही म्हणे माझा वध करण्यासाठी येणार असताना, ही सटवी मध्येच कशी काय आली? आणि माझा वध करणे तर बाजूलाच राहिले, ही तर मृत म्हणूनच जन्माला आली. पण हे तरी खरे आहे काय? मला तरी यात काहीतरी काळेबेरे असल्याचाच संशय येत आहे. नव्हे, नव्हे. मला तर पूर्ण खात्रीच वाटत आहे, की या मुलीला जन्मल्यानंतर माझ्या हातून मरण टाळण्यासाठी तुम्हीच ठार केले असले पाहिजे आणि वरती शोक करण्याचे हे नाटक करीत आहात. परंतु तुमची ही सर्व नाटके मी पूर्णपणे ओळखून आहे. मला तुम्ही कधीच फसवू शकणार नाही याची तुम्ही पक्की खात्री बाळगून असा. ते काहीही असो. तुमच्या या अपत्याला मारण्याचा मी जो संकल्प केला आहे, तो कोणत्याही परिस्थितीत मी पुरा करणारच. मग ते बालक जिवंत असो की मृत असो. माझ्या दृष्टीने त्यात काहीच फरक पडत नाही. मी माझ्या स्वतःच्या हाताने या मुलीला ठार करणारच आहे. मेलेल्यालाही पुन्हा मारण्याचा आनंद मी तर घेणारच आहे.

आता राहिला तुमचा प्रश्न! तुम्हाला असे वाटत असेल की हे बालकही आता माझ्या दृष्टीने निरुपद्रवी झालेले असल्यामुळे मी तुम्हाला मोकळे करून सोडून देईन. पण तुम्ही असल्या खोट्या भ्रमात राहू नका. कारण मला तर तुमचा भरवसा मुळीच वाटत नाही. आणखीन या भविष्यवाणीची काय खात्री बाळगावी? तुमच्या आठव्या पुत्राकडून माझा वध आहे असे म्हणता म्हणता आठवी तर मुलगीच झाली आणि तीही मृतच! मग एखादे वेळेस तुमचे नववे वा दहावे अपत्यही माझ्या नाशाला कारणीभूत होऊ शकेल. भविष्यात काय घडेल हे काहीच सांगता येत नाही आणि मला तशी जोखीमही घ्यायची नाही. खरे तर, तुम्हा उभयतांना ठार केले तर सर्व प्रश्नांचे मूळच नाहीसे होणार आहे. परंतु मृत्यूने तुमची सर्व दुःखातून व कष्टातून कायमची सुटका होईल आणि ते मला मुळीच मानवणारे नाही. त्यापेक्षा तुम्ही कारावासात खितपत पडून नित्य मरणप्राय यातना भोगण्यात जे सुख व समाधान माझ्या मनाला मिळेल, त्या आनंदाला मला अजिबात मुकायचे नाहीये.''

अशी दुष्ट व क्रूर वचने बोलून कंसाने त्या मृत बालिकेला देवकीच्या हातातून हिसकावूनच घेतले. त्याला विरोध करण्यासाठी मध्ये पडलेल्या वसुदेवालाही त्याने बळजबरीने ढकलले. हातात धरलेल्या त्या बालिकेच्या देहाला वर उचलून त्याने देवकी ज्या दगडी आसनावर बसली होती, त्या दगडावर मृतदेहाला पुन्हा पुन्हा जोराने आपटले व त्या देहाला रक्तबंबाळ व छिन्न अवस्थेत तसेच तेथेच टाकून कंस रागाने फणफणतच तिथून निघून गेला.''

नारदाचे बोलणे ऐकणे लक्ष्मीला केवळ कठीणच नव्हे, तर अशक्यच होऊ लागले. तिचा तिच्या कानावर जणु विश्वासच बसेना की काय, म्हणून तिने आपले हात आपल्या दोन्ही कानांवर ठेवून ते झाकूनच घेतले. एवढेच नव्हे, तर नारद वर्णन करून सांगत असलेल्या कंसाच्या भीषण कृत्याचे दृश्यच तिच्या नजरेसमोर उभे राहिले आणि तिने आपले दोन्ही नेत्रही घट्ट मिटून घेतले. भीती, उद्विग्नता आणि विशेषतः अत्यंत रागाच्या भावाने तिचा चेहरा पूर्णपणे भारलेला होता. तिची ती अवस्था पाहून नारदही स्वस्थच बसून राहिला. आपणहून काही बोलून त्याने लक्ष्मीच्या मानसिक अवस्थेला अजिबात धक्का पोहोचू दिला नाही. थोड्या वेळाने लक्ष्मीने स्वतःची अवस्था स्वतःच सावरली. कानावरील आपले हात खाली करून तिने आपले नेत्रही हळुहळू उघडले. पण तरीही तिच्या लाल झालेल्या नेत्रातून तिच्या मनातील राग अजूनही बाहेर पडतच होता आणि तिचे दोन्ही हातही रागाने थरथरतच होते. शेवटी अनावर झालेला राग तिच्या मुखातून शब्दरूपाने बाहेर पडू लागलाच.

''अरे नारदा, केवढे हे क्रूरकर्म? काय हा नीचपणा? याला राक्षसीवृत्ती म्हणणे सुद्धा कमीच ठरेल. असे अघोरी कृत्य करायला एखादा धजावतोच कसा? आणि त्याला त्यापासून रोखणारी कोणीच व्यक्ती वा कोणतीच सत्ता असू शकत नाही म्हणजे काय? हे नारदा, अशा व्यक्तिंमुळे व त्यांच्या अघोरी कृत्यांमुळे सामान्यांचा ईश्वरी अस्तित्वावरील व नियतीवरील विश्वासच उडाला तर नवल ते काय? बरे, त्यांना त्याचा दोष देता येणार नाही. नाही का? मग महात्म्यांचे सामर्थ्य ते काय? व अवतार चरित्रांचे प्रयोजन ते काय? इकडे कृष्णरूपाने नारायणाचा अवतारही झालेला आहे आणि इकडे कंसासारख्या राक्षसांच्या दुष्कृत्यांचा जोरही वाढतच आहे, हे कसे काय? या दोन्हींचा मेळ कसा काय घालावा ते, हे नारदा, तूच मला समजावून सांग. माझी बुद्धी तर काम करेनाशी झालीच आहे, पण माझे मनही सुन्न झाले आहे. त्यामुळे माझी बुद्धी काही विचारच करू शकत नाही, आणि माझ्या मनालाही काही सुचेनासेच झाले आहे. तेव्हा हे नारदा, कृपा

करून तूच माझ्या मनाला या गुंत्यातून व बुद्धीला तिला पडलेल्या पेचातून सोडवून मोकळे कर. कारण तरच माझे मन सगुण कथांचा रसास्वाद घेण्यासाठी आणि माझी बुद्धी त्यातील रहस्य जाणून घेण्यासाठी उत्सुक व उद्युक्त राहतील.''

लक्ष्मीच्या बोलण्यातील उद्विग्नता व राग नारदाला जाणवला. तिच्या भावनेचा आवेग त्याच्या लक्षात आला. लक्ष्मीच्या कोमल मनावर झालेल्या आघातामुळे तिची अशी प्रतिक्रिया झालेली आहे हे त्याने ओळखले. तिची भावनात्मकता जाणत असल्यामुळे तिच्या मनःस्थितीचे त्याला नवल तर वाटले नाहीच, परंतु दुसऱ्याचे दुःख आणि क्लेश सहन न होण्याची तिच्या मनाची संवेदनक्षमता पाहून त्याला समाधानच वाटले. कारण सर्वसामान्याला परदुःख एकतर जाणवत नाही आणि जाणवलेच तर त्यांचे त्याच्याशी काहीच देणे घेणे नसल्यासारखे ते अगदी त्याच्यापासून अलिप्त असतात. संवेदनाशील व्यक्ती या मात्र दुसऱ्यांच्या सुख-दुःखाशी चटकन समरस होऊन, त्या सुख-दुःखाच्या भावनेचा स्वतःही अनुभव घेते होतात. परंतु मनाची ही अवस्था दुर्बलतेतून आलेली असेल तर त्याची परिणती मनाची दुर्बलता अधिक वाढण्यातच होते. नारद हे पूर्णपणे जाणून होता आणि म्हणूनच त्याने लक्ष्मीशी सुसंवाद साधायला स्वतःहून सुरुवात केली.

''हे लक्ष्मी, तुझी संवेदनाशीलता पाहून मला खरेच बरे वाटते. कारण यामुळेच तुला वसुदेव व देवकी यांच्या दुःखाची केवळ कल्पनाच आली असे नाही, तर त्यांचे दुःख व क्लेश तुझ्याही मनाने अनुभवले आणि त्याचीच परिणती एवढा राग व चीड येण्यात झाली हे खरे आहे. क्रूरकर्म हे केव्हाही आणि कोणीही केले तरी नेहमीच निंद्य व निषेधार्ह आहे. त्याचा कोणालाही राग येणे अगदी साहजिकच आहे. पण हे रागवायचे कोणावर आणि या नुसत्या रागावण्याचा उपयोग तरी कोणाला आणि किती होणार हाही एक म्हटले तर मोठा प्रश्नच आहे. त्या प्रश्नाचे उत्तर शोधून काढणेच आधी महत्त्वाचे आहे व अतीआवश्यक आहे. कंसाच्या हातून असे निंद्य क्रूरकर्म घडले हे सुद्धा तो अत्यंत क्रोधाविष्ट झालेला असल्यामुळेच घडलेले होते. अनावर झालेल्या रागाच्या आवेगानेच त्याच्या मनाचा तोल ढळलेला होता व विवेक सुटलेला होता. अर्थात त्याची परिणती मात्र भिन्न लोकांच्याठायी वेगळी वेगळी होते. हे वेगळेपण त्यांच्या भिन्न भिन्न प्रकृती स्वभावानुसार झालेले असते.

सत्त्वगुणी व्यक्तीकडून प्रसंगाने रागाच्या भरात अपशब्द उच्चारले गेले वा अपकृत्य अविवेकाने घडले, तरी रागाचा भर ओसरल्यावर त्याच्या मनाला वाईट वाटते व त्याची चूक सांगितल्यावर त्याच्या लगेचच

लक्षात येते. परंतु चूक कबूल करण्याचे धैर्य नसल्यामुळे व झालेली चूक सुधारण्याचे बळ नसल्यामुळे ती व्यक्ती मनात खंत बाळगत हळहळत स्वस्थ बसते. त्या व्यक्तीवर रागावून वा तिचा राग करून काहीच व कोणालाच उपयोग होत नाही. कारण रागावल्यावरती अशा व्यक्तींना पश्चात्ताप निश्चितपणे होतो, परंतु त्यांच्या मनाला एवढे वाईट वाटते की त्या व्यक्ती स्वतःच्या वागण्यात व बोलण्यात सुधारणा करण्याचे मनोबळ न घेता, केवळ उदासीन व निष्क्रिय होऊन रहातात. अशा व्यक्तींना काही व कितीही समजावून सांगण्याचाच जेथे उपयोग होत नाही, तेथे प्रत्यक्ष रागवून तरी काय व किती परिणाम होणार हा प्रश्नच आहे आणि या प्रश्नाचे उत्तर नकारात्मकच आहे.

अशा व्यक्तीशी बोलणे म्हणजे सच्छिद्र घड्यात पाणी भरून ठेवण्यासारखेच आहे. जसा तो घडा थोडा वेळ भरल्यासारखा दिसला तरी थोड्याच वेळात पूर्ण रिकामा व कोरडा होतो, तसेच सात्त्विक स्वभावाच्या व्यक्तीचे होते. त्यांना कोणतीही गोष्ट न रागावता जर समजावून सांगितली तर ती त्यांच्या सात्त्विक बुद्धीला लगेच पटतेही. ते कोणताही वाद कधीही घालत नाहीत. सर्व शांतपणे ऐकूनही घेतात आणि सांगितलेले त्यांच्या सर्व लक्षातही येते. परंतु तो झालेला परिणाम त्यांच्यावर तात्कालिकच रहातो, कारण त्यांच्या मनाचा निश्चय आधी होत नाही, आणि झाला तरी तो जास्त वेळ टिकत नाही. ऐकलेले सर्व विचार व बोध त्यांच्या मनातून हळुहळू गळक्या घड्यातील पाण्याप्रमाणे गळून पडतात व पुन्हा त्यांचे मन मूळस्थितीला म्हणजे दुर्बलतेला सहजपणे येऊन रहाते. त्यामुळे त्यांचे वागणे बोलणे जसेच्या तसेच घडत रहाते व त्याची फळे ते शांतपणे, विनातक्रार व आपल्या नशिबाला बोल लावीत भोगीत रहातात.

हे लक्ष्मी, रजोगुणी व्यक्ती या उत्साही व नेहमी कृती करणाऱ्या असतात. परंतु याच उत्साहाच्या भरात त्यांच्याकडून बरेच वेळा जरुरीपेक्षा जास्त किंवा नको ते बोलणे वा वागणे घडते. स्वतःचे सुख जास्तीत जास्त भोगण्याच्या नादात आपण दुसऱ्यांना दुःख व क्लेश देत आहोत हे तर त्यांच्या खिजगणतीतच नसते. एवढेच काय, सुख अनुभवण्याच्या अतिरेकामुळे ते स्वतःही केवढे तरी दुःख व कष्टच अनुभवतात. हे जर त्यांच्या क्वचित लक्षात आले, तर ते थोडावेळ स्वतःवरच नाराज होतात. पण थोडावेळच. पुन्हा नवीन उत्साहाने व त्याच वृत्तीने नवीन नवीन सुखसाधनांच्या मागे धावतच रहातात. त्यांच्या अति उत्साहामुळे दुसऱ्यांना त्रास होत आहे असे त्यांच्या निदर्शनास जर कोणी आणून दिले, तर आपली चूक कबूलही करतात, पण पुन्हा स्वतःच्या मूळ स्वभावानुसार वागतच रहातात. नवीन उत्साहाने

स्वतः तर अनेक व्याप करून स्वतःच्याच देहाला व मनाला कष्टवितातच, पण इतर अनेकांनाही व्यापात पाडून त्यांनाही कष्ट व क्लेश देण्यास कारणीभूत होतात. स्वतःच्या वृत्तीत बदल करणे एकतर त्यांना आवश्यक वाटत नाही किंवा त्यांना तसे करणे शक्य होईल असे वाटत नाही. त्यामुळे त्यांच्याकडून तसे प्रयत्नसुद्धा अजिबात घडत नाहीत. आपला स्वभाव व वागणे हे आपले व आपल्या संबंधितांचे प्रारब्ध आहे अशी स्वतःच्या मनाची खोटी व सोईस्कर समजूत करून घेऊन ते स्वस्थ बसतात.

हे लक्ष्मी, अशा रजोगुणी वृत्तीच्या व्यक्तींना काही सांगणे हे म्हणजे पालथ्या घड्यावर पाणी ओतण्यासारखेच आहे. अगदी मुसळधार जल-वर्षावातही एखादा घडा पालथा करून कितीही दीर्घकाळ जरी ठेवला, तरी जसा तो कधीच न भरता नेहमी कोरडाच रहातो, नेमके तसेच या रजोगुणी स्वभावाच्या व्यक्तींचे असते. त्यांना कितीही समजावून सांगा, थोडा वेळ त्यांना सर्व समजल्यासारखे व कळल्यासारखे वाटते, परंतु स्वतःची मनोभूमिका व त्या भूमिकेचा हेका ते कधीच सोडत नाहीत किंवा सोडू शकत नाहीत, ते केवळ स्वतःच्या स्वभावाच्या घट्टपणामुळे! परंतु बाहेरून मात्र ते सर्वांशी मोकळेपणाने व मिळून मिसळून वागत असतात. त्यामुळे थोडावेळ कोणी जरी त्यांच्यावर नाराज झाले तरी कोणाचीही कायमची नाराजी ते स्वतःवर कधीच ओढवून घेत नाहीत. हेच त्यांच्या स्वभावाचे विशेषत्व असते व त्यातच त्यांचे बळही असते.

हे लक्ष्मी, सर्वात कठीण मनःस्थिती असते ती तमोगुणी व्यक्तींची. म्हणून त्यांच्यामुळेच वारंवार कठीण परिस्थितीही निर्माण होत असते. स्वतःच्या भूमिकेचे एवढे काठिण्य त्यांच्या ठिकाणी असते, की त्यांची भूमिका व ते स्वतःही कठोरच होऊन रहातात. मनामध्ये विकारांच्या प्राबल्यामुळे वारंवार निर्माण होऊन साचून राहिलेली घाण आणि डोक्यात साठवून ठेवलेले शाब्दिक ज्ञान यांची अत्यंत चमत्कारिक व अपवित्र युती त्यांच्या ठिकाणी झालेली असते. मनातील मळाचा दुर्गंध व स्वतःच्या ज्ञानाच्या अहंकाराची दर्पोक्ती त्यांच्या वाणीतून व वागण्यातून सतत सहजतेने प्रगट होत असते. सर्व वस्तू, व्यक्ती व परिस्थिती या विषयसुख भोगण्यासाठीच आपल्या आहेत अशी त्यांची धारणाच होऊन राहिलेली असते. परंतु यात दुसऱ्याविषयीचा आपलेपणा काडीमात्रही नसतो. किंबहुना स्वतःच्या वासनांची भूक भागवल्यानंतर त्यांच्या दृष्टीने त्या सर्व गोष्टी कःपदार्थच ठरतात. कारण त्यांची गरज व जरुरी संपलेली असते. तेथे दुसऱ्यांच्या

भावनेचा व दुःखाचा विचार तर नसतोच, पण तेथे माणुसकी, दया, कणव इत्यादी सात्त्विक गुणांचा लवलेशही नसतो.

हे लक्ष्मी, या तमोगुणी व्यक्तींच्या कृती या परस्परविरोधी अशा दोन टोकाच्या असतात. एक तर निष्क्रिय, आळशी, आयतोबा व तोंडाने एक चकार शब्द न बोलता स्वतःच्या स्वतःतच मन बुडवणारे असे ते असतात. तेव्हा त्यांचा कोणालाच कसलाही त्रास नसतो. पण तसाच त्यांचा कोणालाही काहीही उपयोगही नसतो. तेच सर्वांचा उपयोग स्वतःच्या उपभोगासाठी करीत असतात. ते कोणाच्याही अध्यात व मध्यात नसतात, परंतु त्यांच्या सुखाच्या मध्ये कोणी व्यक्ती किंवा परिस्थिती अडथळा निर्माण करते आहे असे जेव्हा त्यांना वाटते, तेव्हा मात्र ते बोलण्याचे व वागण्याचे दुसरे टोक गाठतात. विवेकाचा पूर्ण अभाव त्यांच्याठायी असल्यामुळे त्यांचा त्यांच्यावरीलच ताबा सुटतो व त्यांच्याठायीच्या दुष्ट प्रवृत्ती व आसुरी भाव उफाळून वरती येतात. असद्भावाने सर्व अंतरंग व्यापून गेल्यामुळे ते उन्मत्त बनतात आणि दुराचाराला उद्युक्त होतात. त्यांच्याठायीचा राग एवढा शिगेला पोहोचतो की त्या भरात युद्ध, अत्याचार, मनुष्यवध, निष्पाप जीवांची हत्या इत्यादी अघोरी कृत्ये त्यांच्याकडून सहजतेने घडतात. अनेक जिवांच्या अकारण क्लेशाला व नाशाला कारणीभूत होत असल्याचा त्यांच्याठायी ना खेद असतो ना खंत! स्वतःच्या देहाची, मनाची व बुद्धीची सर्व शक्ती काहीतरी चांगले घडवण्याऐवजी सर्व गोष्टी बिघडवण्यात व त्यांची मोडतोड करण्यातच खर्ची पडत असते. त्यांच्या मनाला शांती व समाधान तर नसतेच, पण दुसऱ्यांनाही ते लाभू न देण्यातच त्यांना पराक्रम व पुरुषार्थ वाटत असतो. अशा लोकांच्या जवळपासही कोणी जेथे फिरकू शकत नाही, तेथे त्यांच्याशी बोलण्याचा वा त्यांना काही समजावून सांगण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही.

हे लक्ष्मी, एकूण काय, तर सत्त्व, रज व तम अशा तीन गुणांच्या भिन्न भिन्न स्वभावाने बांधल्या गेलेल्या व्यक्तींना त्यांच्या आचार-विचाराविषयी काही समजावून सांगणे व त्यांच्याकडून काही बदलाची अपेक्षा करणे हे एकंदरीत कठीणच आहे.''

नारदाचे बोलणे लक्षपूर्वक ऐकत असलेली लक्ष्मी थोडीशी गोंधळातच पडलेली दिसत होती. नारदाचे बोलणे तिच्या बुद्धीला सहजपणे कळत होते, पण त्याचा भावार्थ तिला पूर्णपणे आकलन होत नव्हता. तिचे मन तर अधिकच बुचकळ्यात पडल्यासारखे झाले होते. म्हणून थोडावेळ न बोलता ती स्वस्थ बसून राहिली

व आपल्या मनाला स्थिर होण्यासाठी तिने अवधी दिला. मन पूर्णपणे शांत झाल्यावर ती नारदाला उद्देशून बोलू लागली.

‘‘हे नारदा, एखाद्या विषयाचे समग्र व संपूर्ण प्रतिपादन करावे तर तूच! जसा कापूस पिंजून पिंजून त्यातील सरकी बाहेर काढावी, त्याप्रमाणे हाती घेतलेला विषय सर्व अंगाने वर्णन करून तू त्या विषयाच्या अधिकाधिक खोलात जातोस व त्या विषयात लपलेला आशय तू बाहेर काढून दाखवीत असतोस. म्हणूनच तुझे बोलणे हे साधे बोलणे न रहाता ते निरूपणच होते. अनेक अंगाने प्रगट होणारे हे तुझे निरूपण अनेक नानाविध रंगाने रंगत असते. त्या श्रवणात माझेही मन रंगून रहाते हे निश्चित. परंतु त्याचवेळी तू दाखवत असलेल्या विषयातील आशयाकडील माझे लक्ष मात्र अजिबात विचलित होत नाही म्हणून बरे आहे. आत्ताच तू जे तीन भिन्न गुणांच्या व्यक्तींच्या स्वभावाविषयी व त्यामुळे त्यांच्याकडून घडणाऱ्या भिन्न भिन्न कृतीविषयी विस्तारपूर्वक विवेचन केलेस त्यामुळे तो विषय अत्यंत सुस्पष्ट दिसू लागला हे अगदी खरे आहे. परंतु त्याचा आशय मात्र अजून मला तेवढासा कळलेला नाही. त्यामुळे तुझ्या निरूपणाच्या श्रवणात माझे मन जरी रंगले तरी आनंदित मात्र झालेले नाही हेही माझ्याच लक्षात येत आहे. कारण आशयाशिवाय विषय म्हणजे जणु सुगंधाशिवाय सुमन किंवा रसाशिवाय फळ असेच म्हणावे लागेल. त्या फुलाचा व फळाचा बाह्यरंग अगदी शोभायमान व मनाला आकर्षित करणारा असेल तर त्याने मनाला सुख होईल, परंतु त्या फुलाचा गुण सुवास व त्या फळाचा गुण सुरस याचे सेवन केल्याशिवाय मनाला खरा आनंद अनुभवता येणार नाही हे निश्चित.

हे नारदा, तू प्रतिपादन केलेल्या विषयांचा आशय मला असा जाणवत आहे, की तीन भिन्न गुणांनी असलेल्या व्यक्ती त्या गुणांच्या बंधनात एवढ्या घट्ट जखडलेल्या असतात की त्यातून त्यांची जणु सुटकाच नाही. त्यातून केव्हाही, कधीही व कशानेही सुटका होण्याचा जणु काहीही मार्गच नाही. त्या जशा आहेत तशाच त्यांना मान्य करून त्यांचा स्वीकार केला पाहिजे आणि त्याचे होणारे परिणाम स्वस्थपणे अनुभवीत राहिले पाहिजे. मग मानवी प्रयत्नांना काहीच वाव नाही का? सर्व गोष्टी जशा आहेत तशा निमूटपणे तक्रार न करता सहन करीत रहायचे आहे असे म्हटले, तर मग सर्व जीवन अगदी यंत्रवत् व कृत्रिम होईल. बुद्धीच्या कोरड्या ज्ञानाने व मनाच्या भावविरहित अशा निर्लेप अवस्थेने जीवन जगणे केव्हाही आनंदाचे तर होणार नाहीच, तर ती केवळ आजन्म कारावासाची एक कठोर शिक्षाच ठरेल. पण जीवन ही तर शिक्षा नसून ते या नारायणाने दिलेले एक ‘वरदान’ आहे, सगुण प्रेमभक्तीचा आनंद लुटण्यासाठी प्राप्त झालेली ती एक

'सुवर्णसंधी' आहे, मानवी देहात वेगळेपणाने राहूनही, या नारायणाशी संयोग पावल्याचा परमानंद अनुभवण्याचा तो एक 'अमृतयोग' आहे असे, हे नारदा, तूच तर नेहमी सांगत असतोस आणि ते सत्यच आहे. परंतु असे असतानाही तू सांगितलेल्या विषयाच्या आशयात मला जेव्हा थोडासा नकारात्मकतेचा सूर जाणवला तेव्हाच माझ्या लक्षात आले, की अजूनही तो विषय सर्वांगाने प्रगट झालेला नाही. म्हणून त्यातील आशयही अजून पूर्णपणे बाहेर आलेला नाही. कारण तुझ्या सांगण्यात व बोलण्यात कधीही नकारात्मकतेचा लवलेशही असणार नाही याची मला अगदी खात्री आहे. हे नारदा, तीनही गुणांच्या व्यक्तींचे नुसते यथार्थ वर्णन करून तो विषय तू संपवणे शक्यच नाही. त्या बंधनातून सुटण्याचा व आपला स्वभाव सुधारण्याचा काहीतरी मार्ग व शक्यता असलीच पाहिजे. तेच तू कृपा करून मला विशद करून सांगावेस अशी विनंती मी करते. कारण स्वभावाच्या बंधनात पडणे जरी सहज असले तरी त्यातून सुटणे हेच अधिक महत्त्वाचे आहे, खरे ना?''

लक्ष्मीच्या बोलण्यातून प्रगटलेला आशय नारदाला अगदी मनापासून आवडला आणि त्याला परम संतोष झाला. त्याला मान डोलवून व हास्यपूर्वक दाद देऊन नारद पुन्हा लक्ष्मीशी बोलू लागला.

''हे लक्ष्मी, मला खरेच तुझे अत्यंत कौतुक वाटते. विषय श्रवण करीत असताना आशयाकडे लक्ष ठेवण्याची ही तुझी दक्षता व तत्परता खरेच विशेष व स्पृहणीय आहे. परंतु विषय व आशय हे एकमेकांशी एवढे निगडित किंवा एकरूपच आहेत, की त्यांना खरेच वेगळे करता येणारच नाही. निदान ते तसे एकरूप असावयास हवेत. नाहीतर आशय विरहित विषय प्रतिपादनाला काही अर्थच उरणार नाही. एकतर ते केवळ बोलण्यासाठी बोलणे होईल व त्यातून केवळ शब्दजंजाळच निर्माण होईल, नाहीतर ते बोलणे केवळ शब्दखेळ होऊन त्यातून मनाचे केवळ रंजनच होईल आणि तेही थोडावेळच. अशा बोलण्याचा मनावर किंवा बुद्धीवर काहीही परिणाम होणार नाही आणि त्यातून काहीही निष्पन्न होणार नाही. नुसती तोंडाची वाफ फुकट जाऊन काळाचा व वेळेचा तो अपव्ययच ठरेल.

हे लक्ष्मी, तूच दिलेल्या उदाहरणाप्रमाणे विषय व आशय हे फुल व सुगंध आणि फळ व रस याप्रमाणे अभिन्न आहेत. ते एकमेकांपासून वेगळे करताच येणार नाहीत आणि वेगळेपणाने अनुभवताही येणार नाहीत. मग कापूस पिंजून त्यातून सरकी वेगळी करण्याचा प्रश्न येतोच कुठे व कसा? कारण विषयांचे विश्लेषण करून त्यातील आशय हाती सापडणार तर नाहीच, परंतु त्या विश्लेषणाने मनाला व बुद्धीला निव्वळ क्लेशच

होतील.  तरीपण एक गोष्ट मात्र सत्य आहे, की त्या फुलाचा सुगंध व फळाचा रस याला कारण त्यांचे खोलवर असलेले मूळ आहे आणि त्या मुळालाही कारण खरे तर त्याचे बीजच आहे.  त्याचप्रमाणे प्रगटणाऱ्या आशयपूर्ण विषयांचे कारण नित्य अनुभवाच्या मुळात आहे आणि अनुभवाचे बीज खोलवर असलेल्या प्रत्यक्ष जाणिवेत आहे.  ज्याप्रमाणे बीजातून वृक्षाचे मूळ निर्माण होते व त्यातूनच फुले व फळे यांचा बहर येतो, त्याचप्रमाणे ईश्वरी अस्तित्वाच्या जाणिवेच्या मुळातूनच ईश्वरी अनुभवाचे मूळ निर्माण झालेले असते व त्यामुळेच आशयपूर्ण विषय नित्य नाविन्याने व सौंदर्याने प्रगट होत रहातात.  तेव्हा विषय व आशय वेगळे वेगळे करण्याचा अट्टाहास करीत न बसता, प्रगटलेल्या विषयांच्या सौंदर्याचा आस्वाद रसिकतेने अनुभवूनच त्यातील आशयाचे रसपान मात्र पूर्णपणे करायचे आहे.  त्यातच इंद्रियजन्य सुख व इंद्रियातीत आनंद यांचा सुरेख संगम झालेला असतो.  या सुखानंदाच्या संगमात नित्य नहात रहाण्यातच परमानंदाचा अनुभव आहे.

हे लक्ष्मी, तुझे हेही म्हणणे अगदी बरोबर आहे, की विषयांच्या प्रतिपादनातून प्रकटणारा आशय हा नकारात्मक नसावा, तर तो होकारात्मक असावा.  परंतु तसे फक्त या नारायणाच्या बाबतीतच शक्य आहे.  कारण त्याचेच अस्तित्व हेच एकमेव होकारात्मक आहे.  बाकी त्याच्यातूनच निर्माण झालेले, पण त्याच्यापासून वेगळे झालेले हे सर्व विश्व हे नकारात्मकच आहे.  कारण त्या विश्वाला कधी ना कधी तरी अंत हा आहेच.  त्यामुळे त्या विश्वालाच सत्य मानून केलेले त्यासंबंधीचे सर्व विचार, आचार, दृष्टी, ज्ञान व अनुभव हे या नारायणापासून दूर व म्हणून अधोगतीला नेणारे आहेत.  त्यामुळे या विश्वासंबंधी प्रगटणाऱ्या सर्व विषयांची दिशा, आशय व त्याचा परिणाम हे साहजिकपणे क्लेशकारक व म्हणून नकारात्मकच असणार.  त्याचप्रमाणे नारायणाचे सर्वव्यापी अस्तित्व, त्याचे माहात्म्य, त्याचे सगुण चरित्र, त्याचे प्रेम, त्याची भक्ती आणि त्याच्याशी एकरूपतेचा अनुभव यासंबंधीचे सर्व विषय अत्यंत आनंददायी व म्हणून खऱ्या अर्थाने होकारात्मकच असणार हेही अगदी तेवढेच साहजिक आहे.

हे लक्ष्मी, तीन गुणांच्या प्रकृती स्वभावाने बांधल्या गेलेल्या सामान्य जीवांकडून घडणाऱ्या कर्मांचे विश्लेषण मी जेव्हा केले तेव्हा ते तुला नकारात्मक वाटले.  कारण त्या विवेचनात सामान्य जीवांची अगतिकता मान्य केलेली असून तेथे प्रयत्नाला कोणताही वावच नाही असे तुला जाणवले.  परंतु मुळात नारायणाचे माहात्म्य हा माझ्या वर्णनाचा विषय आहे हे तू निश्चितपणे जाणून असल्यामुळे, तुझ्या लगेचच लक्षात आले की माझे सांगणे अजून पूर्णपणे सांगून झालेले नाही.  हे जे तुझ्या लक्षात आले ना, ते अगदी

बरोबर आहे आणि त्याचेच मला अत्यंत कौतुक वाटत आहे. कारण वस्तुस्थितीचे वर्णन हा विषयाचा एक प्राथमिक भाग झाला. त्यातून काही मार्ग काढणे हा पुढचा भाग झाला. त्या मार्गाने वाटचाल करणे हा त्याच्याही पुढचा भाग झाला आणि ती वाटचाल यशस्वीपणे पूर्ण करणे हा अंतिम भाग झाला.

तेव्हा हे लक्ष्मी, सर्व जीव तीन गुणांच्या बंधनात अडकून त्यानुसार घडणाऱ्या कर्मबंधनात पडलेले आहेत ही वस्तुस्थिती आहे हे खरेच आहे. त्यातून सुटण्याचा मार्गही असणे शक्य आहे. पण तो मार्ग काढणे तेव्हाच शक्य होईल जेव्हा त्या बंधनातून सुटण्याची तीव्र इच्छा ज्या त्या जिवाच्या स्वतःच्या ठिकाणीच निर्माण होईल. ते बंधन स्वतःचे स्वतःला जाणवेल व स्वतःलाच त्यातून सुटावेसे वाटेल, तरच त्यातून मार्ग निघेल. कारण इच्छा आहे तेथे मार्ग हा आहेच. त्यामुळे दुसऱ्यांच्या स्वभावाचा व कर्माचा आपल्याला त्रास होत आहे म्हणून दुसऱ्याच्या वागण्यात व स्वभावात बदल व्हावा असे आपल्याला कितीही वाटले तरी त्याला तसे वाटल्याशिवाय कोणालाही काहीही करता येणे शक्य नाही. परंतु आपले काही चुकत आहे असे मुळातच कोणालाही वाटत नसते हीच तर खरी अडचण आहे. प्रत्येकाला दुसऱ्याची अडचण वाटते, पण आपलीही अडचण दुसऱ्याला होत असेल हे कोणाच्याच लक्षात येत नाही. बरे, एखाद्याने तसे लक्षात आणून दिले तर कोणीही ते मानत नाही. आणि एखाद्याच्या स्वतःच्याच लक्षात आले तरी तो त्याची पर्वा न करता स्वतःच्याच स्वभावानुसार हट्टीपणाने वागतच रहातो.

हे लक्ष्मी, मुळात एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेव, की जेव्हा एखाद्या व्यक्तीला सत्त्वगुणी, रजोगुणी किंवा तमोगुणी असे म्हटले जाते, तेव्हा त्याचा अर्थ एवढाच आहे, की त्या व्यक्तीच्या ठिकाणी सत्त्व, रज किंवा तम हा गुण प्राधान्याने आहे. म्हणजे त्याच्याठायी इतर दोन गुण अजिबात नसतात असे मात्र नव्हे. ते काही प्रमाणाात असतातच. कारण मुळात सर्व जीव हे त्रिगुणात्मकच आहेत. त्यामुळे त्यांच्या ठिकाणी तीनही गुण निश्चितपणे असतातच. फक्त ज्या गुणांचे प्राबल्य व्यक्तींच्याठायी असते त्या गुणाने त्यांचा उल्लेख करण्याची एक पद्धत आहे एवढेच. परंतु एखादी व्यक्ती केवळ अमुकच एका गुणाची आहे असा तिच्यावर कायमचा शिक्का मारणे हे योग्य नव्हे, तर चूकच आहे. म्हणून अशा व्यक्तींना फारतर सत्त्वगुणप्रधान, रजोगुणप्रधान व तमोगुणप्रधान म्हणून संबोधणे अधिक बरोबर ठरेल.

जीवनाच्या दृष्टीने विचार केला तर सामान्य जीवाला या तीनही गुणांची आवश्यकता आनंदाने जीवन जगण्यासाठी ही आहेच. ईश्वराविषयी आस्तिक्य भाव, त्याच्या नियतीवर दृढ श्रद्धा, त्याच्या सगुण

चरित्रांविषयी अत्यंत प्रेम आणि त्याच्या सगुणभक्तीचे माहात्म्य, यासाठी सत्त्वगुण असणे अतिशय आवश्यक आहे कारण ही सर्व सत्त्वगुणाची लक्षणे आहेत. ईश्वरी भावामुळेच सामान्याचेही जीवन शांतीचे, समाधानाचे व आनंदाचे होते आणि ईश्वरी भाव हेच सत्त्वगुणाचे मूळ आहे.

कोणत्याही भावाचा अनुभव हा कृतीमुळेच येऊ शकतो. ईश्वरी प्रेमाचाही अनुभव हा कृतीशिवाय घेताच येणार नाही. प्रेमभावाने ईश्वरासाठी घडणारी कृती म्हणजेच भक्ती होय. ही कृती करण्यासाठी मनाठायी केवढातरी उत्साह हवा. एखादी कृती हवी तशी जमली नाही, तर पुन्हा पुन्हा ती करणे, त्यासाठी सतत प्रयत्नशील रहाणे घडावयास हवे. वेळप्रसंगी मूळ कृती बदलून दुसरीही कृती एखादेवेळेस करणे आवश्यक ठरले, तर त्यासाठी उमेद हवी. हा उत्साह, ही उद्यमशीलता, ही उमेद ही सर्व रजोगुणाची लक्षणे आहेत. त्याचेही सहाय्य जीवन जगताना आणि अगदी ईश्वराच्या भक्तीसाठी सुद्धा आवश्यकच आहे.

जीवनात केवळ योग्य गोष्टी करीत राहिल्यानेच समाधान व शांती प्राप्त होणार नाही, तर अयोग्य गोष्टींचाही त्याग घडावयास हवा. त्यामुळेच योग्य गोष्टींचा आवश्यक तो परिणाम होऊ शकेल. जसे औषध घेत असताना पथ्य न पाळता कुपथ्य घडले तर औषधाचा अपेक्षित परिणाम होणार नाही, अगदी तसेच जीवनातही आहे. सत्कर्मे करून सद्भाव जागा ठेवीत असताना, असत् कर्मांचा त्याग केल्याशिवाय असद्भावाचा नाश व सद्भावाची वाढ होणारच नाही आणि शांती समाधानाचा अनुभवही येणार नाही. ईश्वराच्या भक्तीविषयी सुद्धा हाच नियम लागू आहे. ईश्वराविषयी प्रेम आहे, पण संसाराविषयीची आसक्ती व मोह जर नष्ट पावले नाहीत, तर त्या प्रेमाचे रूपांतर भक्तिभावात होणार नाही आणि आनंदाचाही अनुभव येणार नाही. या असत् व अयोग्य गोष्टींचा त्याग जर मनाकडून व मनापासून घडायचा असेल तर मनाच्याठायी त्यांच्याविषयी एक प्रकारचा राग व चीडच निर्माण व्हावयास हवी. असा राग, अशी चीड हीच तर तमोगुणाची लक्षणे आहेत. म्हणजे तमोगुणही जीवनासाठी व ईश्वराच्या भक्तीसाठीही अत्यंत आवश्यकच आहे.

तेव्हा हे लक्ष्मी, तीनही गुणांचे अस्तित्व हे सहजपणे आहे आणि ते अत्यावश्यकही आहे. फक्त त्यांचा समतोल असणे हे जरुरीचे आहे. त्या तीन गुणांचा समतोल जेव्हा बिघडतो, तेव्हा मनही बिघडते आणि त्याचा तोल ढळतो. आता हा समतोल कशामुळे नाहीसा होतो, तर गुणाठायी जेव्हा अहंकार निर्माण होतो तेव्हा! गुणांचा अहंकार हेच त्याचे बंधन आहे. हा अहंकार हाच मानवाचा शत्रू आहे आणि त्याचा

नाश करण्यासाठी केवढातरी पराक्रमच घडावा लागतो. तेव्हा तीन गुण हे मानवासाठी हितकारकच आहेत. परंतु त्यांचा अहंकार हाच मानवाच्या अधोगतीचे एकमेव कारण आहे. हे तीन गुण त्यांच्या अहंकाराच्या बंधनातून एकदा का सुटले, की तेच तीन गुण मानवाच्या प्रगतीला सहाय्यभूत होतात हे अगदी खरे आहे.

हे लक्ष्मी, आता महत्त्वाचा प्रश्न असा आहे की या अहंकाराचे निर्मूलन कसे होईल? त्याचा मुळासकट नाश कसा होईल? असा पराक्रम कशाने घडेल व कोण करील? तर या सर्व प्रश्नांचे उत्तर एकच आहे, की या अहंकाराचे समूळ उच्छेदन केवळ ईश्वराच्या सगुण भक्तीनेच शक्य आहे. ईश्वराची भक्ती ही त्याच्याविषयीच्या आत्यंतिक प्रेमानेच घडू शकेल. कारण भक्ती हे तर प्रेमाचे रूप आहे. म्हणून हा ईश्वरी प्रेमगुण मानवाच्या ठिकाणी निर्माण होणे अत्यंत आवश्यक व महत्त्वाचे आहे. या प्रेमगुणानेच तीनही गुणांचा अहंकार नष्ट होऊन त्यांचा योग्य समतोल राखला जाईल. त्या तीन गुणांच्या सहाय्यानेच ईश्वराची भक्ती घडून त्याची प्राप्ती होईल आणि ईश्वराची प्राप्ती म्हणजेच नित्य आनंदाची अनुभूती होय.

हे लक्ष्मी, तरीही एक मुलभूत प्रश्न शिल्लक रहातोच. तो म्हणजे हे ईश्वरी प्रेम सामान्याच्या ठिकाणी निर्माण व्हावे कसे? फार पूर्वी म्हणजे या सृष्टीच्या सुरुवातीच्या काळात सर्वांच्या ठायी त्या ईश्वरी प्रेमाची सहजपणे जागृती असे. त्यामुळे तीनही गुणांचे अस्तित्व असूनही निरहंकारी वृत्ती असे आणि त्या तीनही गुणांद्वारे ईश्वराचीच भक्ती नित्य घडून, ईश्वराच्या अस्तित्वाचा आनंददायी अनुभव घेता येत असे. त्यानंतरच्या काळात ही जागृती जेव्हा हळुहळू सुप्त होऊ लागली, तेव्हा ईश्वराचे नामस्मरण, जप, ध्यान अशा काही साधनांद्वारे उपासना करून ती ईश्वरी प्रेमाची जागृती पुन्हा आणता येत असे. त्यानंतरच्या काळात जेव्हा या बाह्य साधनांचाही उपयोग होईनासा झाला, तेव्हा त्या ईश्वराचे गुण संकीर्तन व सगुणकथांचे गायन करून ईश्वरी प्रेम जागे होत असे, पण तेही थोडावेळच, म्हणजे तेवढ्या कृतीपुरते व काळापुरतेच रहात असे व नंतर पुन्हा जणु ते गुप्तच होत असे. पण पुढे पुढे काळ जसा जसा अधिकाधिक प्रतिकूल व कठीण होऊ लागला, तसतशी सामान्य जीवांची अंतर्मुखता कमी होऊन बहिर्मुखता वाढू लागली आणि ते जास्तीत जास्त विषयासक्त होऊ लागले. त्यामुळे तर त्यांच्याठायीचे ईश्वरीप्रेम लुप्तच पावू लागले. त्याच्यावरती एकच उपाय व मार्ग शिल्लक राहिला आणि तो म्हणजे ईश्वरी प्रेमाच्या अनुभवाने ज्यांचे अंतःकरणच प्रेमस्वरूप होऊन राहिले आहे अशा महात्म्यांच्या नित्य सहवासात राहणे हाच होय!

हे लक्ष्मी, काळाच्या ओघात अशा प्रेमस्वरूप महात्म्यांचे अस्तित्व दुर्मीळ होऊ लागले हे जरी खरे असले, तरी अजिबात नाहीसे झाले नाही ही त्या नारायणाचीच कृपा होय. त्याची नियतीच अशी आहे की काळ कितीही प्रतिकूल व कठीण होत चालला तरी त्याच्याप्रत येण्याचा भक्तिमार्ग कुठे ना कुठे तरी व कोणत्या ना कोणत्या रूपात प्रगट असतोच. त्याचा पूर्ण लोप कधीच होत नाही. महात्म्यांच्या अंतःकरणातच या प्रेमभक्तिमार्गाचे मूळ असते आणि त्यांच्याच सर्व जीवनाद्वारे तो भक्तिमार्ग प्रगट असतो. मात्र अशा महात्म्यांचे माहात्म्य जाणणे व त्यांना यथार्थाने ओळखणे हे काळाच्या ओघात दुर्लभ होऊ लागले. त्यांची जवळीकता साधणे हेही दुर्गमच होऊ लागले. याच दृष्टीने विचार केला असता कृष्णचरित्राचे विशेषत्व केवढेतरी जाणवते. जन्मतःच प्रेमस्वरूप असलेल्या कृष्णाकडून हा ईश्वरी प्रेमाचा गुणच त्याच्या सर्व जीवनातून प्रगट झाला. एवढेच नव्हे, तर त्याच्या प्रेमस्वभावामुळे तो सामान्यातील सामान्यासाठीही सुलभ व सुगम होऊन राहिला. आपला प्रेमळ सहवास त्याने सर्वांना देऊ केला व तो सर्वांसाठी सर्वकाळ स्वतः उपलब्ध राहिला, हेच त्याच्या जीवनचरित्राचे आगळे वेगळेपण ठरले. त्याच्या ठायीच्या प्रेमगुणामुळेच त्याचे ईश्वरी प्रेम सर्वसामान्यांच्याही जवळ जाऊन पोहोचले. त्या प्रेमाचा कोणाला किती लाभ झाला आणि त्या प्रेमाचा कोणी किती व कसा उपयोग करून घेतला हे जाणून घेणेसुद्धा तेवढेच बोधकारक व आनंददायी ठरणार आहे.

हे लक्ष्मी, कृष्णचरित्रातील आणखी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेव, की कृष्णावतार हा केवळ कंसवधासाठी झाला नव्हता, तर त्या निमित्ताने झाला होता. जन्मतःच कंसाचा वध करून लगेच अवतार समाप्ती करण्यापुरतेच कृष्णाचे चरित्र मर्यादित नव्हते, तर केवढे तरी व्यापक व सखोल असे कृष्णाचे जीवनचरित्र प्रगट झाले. त्यामुळेच भिन्न अवस्थेतील व भिन्न भिन्न स्वभावाचे अनेक जीव कृष्णाच्या जीवनात सामावले जाऊ शकले आणि त्यांना त्यांच्या उद्धाराची केवढीतरी संधी उपलब्ध होऊ शकली. मुख्य म्हणजे कोणतीही गोष्ट योग्य वेळ आल्याशिवाय घडू शकत नाही. ती वेळ येईपर्यंत सर्वांनाच वाट पहात थांबावे लागते आणि तयार रहावे लागते. कंस वधासाठीसुद्धा योग्य वेळ येणे हे आवश्यकच होते आणि तोपर्यंत थांबणे व योग्य प्रकारे तयार होऊन रहाणे हे कृष्णासाठीही जरुरीचेच होते.

हे लक्ष्मी, तमोगुणाने प्रबल होऊन अधोगतीचे टोक गाठलेल्या कंसाला स्वतःच्या कर्मांचा पश्चात्ताप वगैरे होणे तर शक्यच नव्हते आणि अहंकाराने ग्रस्त झाल्यामुळे कोणा महात्म्यांचा सहवास करणे वा त्यांचे

काही मार्गदर्शन घेणे याची सुतराम शक्यताही कंसाच्या बाबतीत मुळीच नव्हती. त्यामुळे स्वतःच्या कुकर्मामुळे तो स्वतःहूनच स्वतःच्या मृत्यूकडे वेगाने वाटचाल करीत होताच. तरीही त्याच्या मृत्यूची प्रत्यक्ष वेळ येण्यास नारायणाच्या नियतीनुसार अजूनही अवकाश होता. परंतु तेवढ्या वेळच्या काळात कृष्णाचे केवढेतरी मनमोहक व रमणीय असे बालचरित्र गोकुळात प्रकट झाले. तेच खरे श्रवणीय व आनंदाचे कारण आहे. त्याचे वर्णन करण्याची माझी आतुरता जशी वाढत आहे तशीच ती तुझ्याठायी श्रवणासाठीसुद्धा वाढत असणार याची मला पूर्ण खात्री आहे.''

नारदाचे बोलणे ऐकून लक्ष्मीच्या ठायीच्या सर्व वृत्ती पूर्ण उल्हसित पावल्या. तिचे मुख उत्साहाने पूर्ण फुलले आणि नारदाच्या मुखातून स्त्रवणाऱ्या प्रेमवचनगंगेत सर्वांगाने सचैल स्नान करण्यासाठी ती आतुर होऊन राहिली. तिची ती प्रेमपूर्ण भक्तिभावाची अवस्था पाहून नारदाचाही भक्तिभाव कळसावर पोहोचला आणि कृष्णाच्या सगुणचरित्रातील प्रेमरस शब्दरूपाने त्याच्या मुखातून वाहू लागला.

''हे लक्ष्मी, वसुदेवाने बालरूप कृष्णाला अत्यंत विश्वासाने व खात्रीने गोकुळाधिपती नंदाच्या स्वाधीन केले आणि तो मथुरेला परत फिरला. हा कथाभाग सांगताना मी प्रथम वसुदेवाचे मथुरेला गमन व तेथे झालेला कंसाचा प्रक्षोभ आणि त्याची प्रगटलेली पराकोटीची आसुरी वृत्ती हे सूत्र मुद्दामच आधी हाती धरले व सांगून सोडून दिले. कारण त्या भागात कोठेही ईश्वराचे माहात्म्य, प्रेम वा भक्ती यांचा जराही लवलेश नव्हता. एवढेच नव्हे, तर त्या ठिकाणी साधी दया, माया वा माणुसकीचा अंशही नव्हता हे मी जाणून होतो. खरे तर, कंसाच्या बाबतीत तशी अपेक्षा चमत्कार म्हणूनही धरता येत नाही. परंतु तो मनाला न मानवणारा, बुद्धीला न पटणारा आणि श्रवणालाही न रूचणारा, पण प्रत्यक्षात वस्तुस्थिती असलेला भाग आधीच सांगून संपवल्यामुळे, आता त्याच कथाभागाचे दुसरे सूत्र जे नंदाच्या रूपाने होते, त्याचे वर्णन विस्तृतपणे व मोकळेपणाने करण्यास आता आपण मोकळे झालो.

तेच सूत्र महत्त्वाचे आहे. कारण तेच सूत्र कृष्णाच्या सगुण प्रेमाचे आहे आणि त्याच प्रेमसूत्राच्या आधारे कृष्णाचे सगुण चरित्ररूपी वस्त्र आपल्याला गुंफायचे आहे. त्या सुंदर व सुरेख वस्त्राची शोभा काही औरच आहे. त्याच्यासारखे रमणीय, स्मरणीय व अविस्मरणीय या त्रिभुवनात दुसरे काही असणे शक्यच नाही. कारण ते सगुण चरित्र प्रत्यक्ष या नारायणाचे आहे. तो सगुण प्रेमाचा व आनंदाचा आविष्कार साक्षात या नारायणाचा आहे. जसे या नारायणासारखे या विश्वात दुसरे काहीही असणे संभवत नाही, त्याच्यासारखा

एकमेव तोच आहे, अगदी तसेच त्याच्या सगुण अवतारचरित्रांचे आहे. त्यांच्यासम तेच आहे. एवढेच नव्हे, तर प्रत्येक सगुण चरित्ररूपी वस्त्रही एकासारखे दुसरे नाही. त्या प्रत्येक वस्त्राचा रंग वेगळा, त्याचा पोत वेगळा आणि त्याची शोभाही काही वेगळीच! म्हणूनच नित्य नवीन नवीन सौंदर्याने पण उत्स्फूर्तपणे प्रकटणारे नारायणाचे सगुण चरित्र हे मनोवेधक व चित्ताकर्षक असते. त्याच्या श्रवणाने व गायनाने त्याच्याविषयीचे प्रेम मनाठायी निर्माण होते आणि चित्ताठायी त्याच्याच भक्तीचा ध्यास कायमचा लागून रहातो. या भक्तिभावाचीच परिणती व पूर्ती त्याच्याशी एकरूप होण्यात होते आणि त्या ऐक्यातच आनंदाची परमावधी होते. म्हणूनच त्या कृष्णप्रेमाच्या सूत्राच्या आधारानेच आता पुढील चरित्र श्रवण करण्यासाठी आपण उभयतां सादर होऊया.''

*****



# कृष्णजन्माचा आनंदोत्सव

''हे नारायणप्रिय लक्ष्मी, मागे वर्णन केल्याप्रमाणे वसुदेवाने स्वाधीन केलेल्या त्या लहान अर्भकाला नंदाने यशोदेच्या कुशीत ठेवले. यशोदा त्यावेळेस अर्धवट शुद्धीत होती. त्यामुळे घडलेल्या प्रसंगाविषयी ती अगदी पूर्णपणे अनभिज्ञ होती. परंतु कृष्ण तिच्या कुशीत येताच मात्र त्याच्या कोमल व दैवी स्पर्शाने ती हळुहळू देहभानावर आली. भुकेने व्याकूळ होऊन रडणाऱ्या कृष्णाला तिने केव्हा स्तनपान सुरू केले हे तिच्याही लक्षात आले नाही. तिच्या ठिकाणी निसर्गतः निर्माण झालेल्या वात्सल्यभावाचेच ते द्योतक होते. कृष्णही यशोदेच्या दुग्धरूपी वात्सल्याचे सेवन करून हळुहळू तृप्त व शांत झाला. त्याच्या सुंदर मुखावर मोहक स्मित हास्य विलसू लागले. हे भावपूर्ण दृश्य नेत्राद्वारे नंदाच्या मनात साठवले जात होते आणि तोही सद्‌गदित होत होता. तशाच अवस्थेत त्याने स्वतःला सावरले व पुढे होऊन तो पलंगावर यशोदेच्या सन्निध येऊन बसला. एका हाताने यशोदेचा हात आपल्या हातात धरून आपल्या दुसऱ्या हाताने तो यशोदेचे मस्तक हळुवारपणे थोपटू लागला. त्या स्पर्शातील आपलेपणा व कौतुकाचा भाव यशोदेला जाणवला आणि तिनेही आपले नेत्र उघडून नंदाकडे स्मितहास्यपूर्वक नजरेने पाहिले. क्षणार्धात ती लाजून चूर झाली. तिच्या गौरवर्णीय चेहऱ्यावर लज्जेची लाली पसरली आणि ती आपला हात नंदाच्या हातातून सोडवून घेण्याचा प्रयत्न करू लागली. परंतु नंदाने तिचा हात अधिकच घट्ट धरला आणि खाली वाकून त्याने यशोदेच्या भाळावर आपले ओठ अलगदपणे टेकले. तिच्या मस्तकावर ठेवलेला त्याचा हात तिच्या मृदू केसांमधून हळुवारपणे फिरू लागला. नंदाच्या प्रेमाचे सुख अनुभवून यशोदा अधिकच लज्जित होत होती पण खुशीतही येत होती. त्या खुशीतच तिने स्वतःला नंदापासून थोडे अलग केले आणि कृष्णाला आपल्या छातीशी धरलेल्या अवस्थेतच उठून बसली. शांत व गाढ झोपलेल्या कृष्णाला तिने नंदाच्या हातात ठेवले आणि कृष्णाकडे ती कौतुकाने एकटक पहातच राहिली. नंदानेही कृष्णाला आपल्या हृदयाशी अत्यंत जवळ धरले व त्याच्या गालांवर आपले ओठ पुन्हा पुन्हा स्पर्शीत करून आपले पुत्रप्रेम तो व्यक्त करू लागला. त्याच प्रेमाने त्याने कृष्णाला पुन्हा यशोदेच्या स्वाधीन केले आणि यशोदा व कृष्ण या उभयतांवरील आपल्या प्रेमाची अतृप्तता कायम ठेवून नंद त्वरेने यशोदेच्या महालाबाहेर आला.

बाहेर येताक्षणीच नंदाने स्वतःहून महालाच्या बाहेर पाठवलेल्या दासींना पुन्हा महालात बोलावून घेतले आणि त्यांना पुत्रजन्माची आनंदवार्ता सांगितली. दासींना यशोदेची व नवजात बालकाची योग्य शुश्रूषा

करण्यास सांगून त्या उभयतांची विशेष काळजी घेण्याच्या सूचनाही नंदाने त्यांना कटाक्षाने दिल्या. स्वतः नंदाने राजवाड्यात फिरून सर्वांना ही पुत्रजन्माची आनंदाची बातमी व्यक्तिशः सांगितली आणि आपल्या सेवकांकरवी ती वार्ता सर्व गोकुळवासीयांनाही कळीत केली. आनंदाची ती गोड बातमी सांगताना त्याचबरोबर साखर वाटून सर्वांचे तोंडही गोड करण्यात येत होते.

सर्व गोकुळातच अत्यंत आनंददायी व एक प्रकारच्या विशेष उत्साहाचेच वातावरण निर्माण झाले होते. पुत्रजन्माचा आनंद एकट्या नंदाचा वा यशोदेचा न रहाता, तो सर्व गोकुळवासीयांचाच झाला होता. त्यामुळे साहजिकच सर्व जन त्या आनंदात सहभागी झाले. स्त्री-पुरुषांचे जथेच्या जथे नंदाच्या राजवाड्याकडे लोटू लागले. नवीन सुंदर सुंदर वस्त्रे लेवून व सुरेख सुरेख अलंकारांनी सजून असंख्य गोकुळवासी नंद व यशोदा यांचे अभिनंदन करण्यासाठी आणि नवजात बालकाचे मुखावलोकन करण्यासाठी तत्परतेने निघाले. त्या सर्वांच्या उत्साहाला आवर घालणे नंदाच्या सेवकांना कठीणच जात होते. पण ते आवश्यक असल्यामुळे नंद स्वतः आपल्या राजवाड्याच्या बाहेर आला. त्याने आपले दोन्ही हात उंचावून सर्वांच्या अभिनंदनाचा स्वीकार केला. त्याचबरोबर आपले दोन्ही हात जोडून सर्वांना आपापल्या घरी जाण्याची विनंती केली. यशोदेला व तिच्या नवजात पुत्राला अत्यंत आवश्यक असलेली विश्रांती मिळणे अतिशय जरुरीचे आहे असे त्याने समस्त जनांना प्रेमाने समजावून सांगितले. अर्थात सर्वांच्याच ठिकाणी यशोदेच्या व तिच्या पुत्राच्या क्षेमकुशलाची काळजी असल्यामुळे सर्वांचीच सहजच समजूत पटली आणि सर्वजण अत्यंत संतोषाने व समाधानाने आपापल्या घरी परतले. पण तरीही त्यांचा उत्साह मात्र जराही कमी न होता अधिकच वाढत होता आणि तो दिवस ते आपापल्या परीने एखाद्या सणासारखाच साजरा करीत होते.



* * *

# लेखक परिचय - श्रीपरमानंदस्वामी



श्रीपरमानंदस्वामी - श्री.अविनाश मोरेश्वर लिमये यांनी मुंबई विद्यापीठातून M.Sc. with Research ही पदवी घेतली. आय.आय.टी. पवई, मुंबई या सुप्रसिद्ध संस्थेत मेटॅलर्जिकल इंजिनिअरिंग या विभागात ते दीर्घकाळ सेवा करून निवृत्त झाले आहेत.

गृहस्थाश्रमात राहूनच भक्तिमार्ग कसा साधता येतो व सद्गुरु कृपेने ईश्वरप्राप्ती कशी करून घेता येते याचा आदर्श त्यांच्या जीवनाद्वारे प्रत्यक्ष साकार झालेला आहे.

त्यांनी प्रदीर्घ काळ, अखंडपणे व प्रेमभावाने त्यांचे पूज्य पिता व सद्गुरु श्रीअवधूतस्वामी यांची सेवा, भक्ती व त्यांचे कार्य करून तसेच स्वतःची साधना करून सर्वश्रेष्ठ असा आत्मानुभव घेतला.

श्रीअवधूतस्वामी यांच्या महानिर्याणानंतर श्रीपरमानंदस्वामी यांनी तरुण वयातच या दत्तपरंपरेच्या कार्याची धुरा अत्यंत समर्थपणे सांभाळली आणि सर्वसामान्यांना व भक्तांना अचूक मार्गदर्शन केले व आजही करीत आहेत.

श्रीपरमानंदस्वामी यांनी लिहिलेला प्रभूरामाच्या अंतःकरणाच्या अवस्थेचे दर्शन घडविणारा अनुभवसिद्ध ग्रंथ 'हा राम माझा' २००० साली व कृष्ण व राधा यांच्या भक्तिऐक्याचे स्वानुभूतीतून मनोहारी दर्शन घडविणारा ग्रंथ 'कृष्ण सखा माझा' २००४ साली प्रकाशित झाला. तसेच नारद व लक्ष्मी यांच्या संवादातून उलगडलेले कृष्णाच्या अंतरंगातील गूज प्रकटविणारा ग्रंथ 'कृष्ण परमात्मा' २००८ मध्ये प्रकाशित झाला. या ग्रंथास मराठी साहित्य परिषद, पुणे यांचा 'मृत्युंजय' पुरस्कार प्राप्त झाला आहे. तसेच दत्तात्रेयांच्या अवतार मालिकेतील चरित्रांचे रहस्य प्रकट करणारा ग्रंथ 'दत्त हाचि अवधूत' २०१० साली प्रकाशित झाला असून, श्रीपरमानंदस्वामी यांच्या भक्तिकाव्यांचा संग्रह 'आनंदाचे डोही' २०११ मध्ये प्रकाशित झाला आहे. 'दत्तात्रेय वामन भिडे - एक शोध आनंदाचा' ही आध्यात्मिक कादंबरी २०१४ साली प्रकाशित झाली, तर त्याच आध्यात्मिक कादंबरीचा पुढील भाग म्हणजे 'दत्तात्रेय वामन भिडे - एक प्रवास आनंदाचा' हा २०१५ मध्ये प्रकाशित झाला आहे. त्यापुढील भागाचे लेखन श्रीपरमानंदस्वामी यांचेकडून घडतच आहे.

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान आपल्या वाचकांसाठी कृष्णसखा माझा या सुंदर पुस्तकाचे पाच भाग आणत आहे. सौ. प्रतिमा प्रविण आठवले यांच्या अथक परिश्रमांतून हे साकार होत आहे. त्यातला हा पहिला भाग. हा तुम्हाला कसा वाटला ते सांगा. पाचवा भाग कृष्णाष्टमी ला प्रसिद्ध होईल. याच दरम्यान महाभारत (मूळ “जय” हा ग्रंथ) येत आहे.

२०१६ हे वर्ष ई साहित्यासाठी फ़ारच उत्साहाने सुरू झाले. या वर्षाची सुरुवातच मुळी लिओ टॉलस्टॉय, पॉल ब्रन्टन, आणि मनुस्मृतीने झाली. धर्माकडे पहाण्याचे तीन विविध दृष्टीकोन यांत आहेत. २०१५ मध्ये ई साहित्य मधून संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, संत नामदेव, संत बहिणावाई, संत कान्होपात्रा, संत चोखामेळा, गीतारहस्य, भगवद्‌गीता, अशा अनेक मौल्यवान ग्रंथांची ई निर्मिती करण्याचा योग आला. २०१६ ची सुरुवात बायबल, मनुस्मृती पासून झाली आणि त्यात कुराण, बौद्धमत, जैनधर्म, ज्यू, पारशी, वेद, उपनिषदे अशा विविध धर्मशास्त्रांची भर पडावी असा योग दिसतो आहे. योग दिसतो असे यासाठी म्हणतो की ही पुस्तके गेल्यावर्षीही आम्ही कुठे मुद्दाम शोधायला गेलो नव्हतो. श्री विजय पांढरे, डॉ. श्री अशोक धांडे, श्री अविनाश नगरकर, श्री अरुण फ़डके, श्री रत्नाकर महाजन, श्री फ़्रान्सिस आल्मेडा, श्री मधुकर सोनावणे, श्री अशोक कोठारे, श्री अरुण काकतकर या व इतर अनेक विद्वानांनी हे साहित्य मोठ्या विश्वासाने आमच्या हाती सोपवलं. आणि आम्ही फ़क्त पोस्टमनगिरी केली. आमच्या सुदैवाने प्रचंड मोठ्या वाचकवर्गाने या साहित्याचा आस्वाद घेतला. या महानुभावांच्या श्रमाचे काही प्रमाणात चीज झाले.

ई साहित्य प्रतिष्ठान निर्माण झाले नवीन साहित्यिकांसाठी एक व्यासपीठ म्हणून. ते तसेच आहे. आणि तसेच राहील. साधारण ८० टक्के पुस्तकं ही नवसाहित्यिकांचीच असतील. पण सुमारे वीस टक्के पुस्तकं नावाजलेली, वाचकप्रियही असावीत. म्हणजे वाचकांचा ओघ वाढता आणि वाहता रहातो.

मराठीतल्या महान प्रकाशकांच्या तुलनेत ई साहित्य अगदीच नगण्य आहे. आणि त्यांच्याशी तुलना वा स्पर्धा करण्याचा मानसही नाही. परंतू दर्जाच्या बाबतीत मात्र आम्ही तोडीस तोड राहू. हे वर्ष अत्यंत दर्जेदार कथा, कादंबऱ्या आणि काव्य-विनोद-शास्त्र पुस्तकांचे असेल याची आम्ही ग्वाही देतो.

आपण या साहित्य यज्ञात यथाशक्ती इंधन पुरवावे ही विनंती. आपल्या ओळखीच्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आमच्याकडे पाठवा. आम्ही तुम्हाला आमचे VIP सभासद करू. याशिवाय या कामात इतर अनेक तऱ्हांनी आपण सहभागी होऊ शकता. वेबसाईटला भेट तर देतच रहा. खंबीरपणे पाठीशी उभे रहा. मग बघाच काय काय चमत्कार घडतील ते.

आपले विश्वासू

टीम ई साहित्य

